# ऊन्ह आणि सावल्या

ना. सी. फडके

यांच्या

निवडक कथांचा सोळावा संग्रह.

किंमत दोन रुपये

प्रकाशक :

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४.



आवृत्ति पहिली
ऑक्टोबर १९५५







मुद्रक :

वि. ग. माटे,
'विश्वकर्मा' मुद्रणालय,
१५/९ सदाशिव पेठ, पुणें २.

# अनुक्रमणिका

# १ . . . . . . . मीरा

वळवाच्या सरी आल्या. घटकाभर अगदी जोराची वृष्टी झाली. मीराच्या घरापुढच्या रस्त्यांत साचलेल्या पाण्याचा लोंढा कडेच्या गटारांतून खळखळून वाहू लागला. उन्हाळ्यांत सांचलेला पालापाचोळा, केरकचरा, चिंध्या, कागदाचे कपटे पाण्याबरोबर वाहून गेले. त्यांतच एका फोटोचा एक मोठा तुकडा वाकडया तिकडया गिरक्या घेत, पाण्यांत बुडया मारीत गेला व दिसेनासा झाला !

फोटोचा हा तुकडा गटाराच्या एका भेगेंत किती तरी दिवस अडकला होता. वाऱ्याच्या झोताबरोबर तो फडफडत असे. फडफडूं लागला कीं एखाद्या नागाच्या फणीप्रमाणें दिसत असे. परंतु कितीहि जोराचा वारा आला तरी त्याची त्या भेगेंतून सुटका होत नसे. आज त्याची सुटका झाली ! पावसाच्या पहिल्या सरीचं पाणी गटारांतून खळखळ वाहूं लागलं, त्या पाण्याबरोबर फोटोचा तो तुकडा वहात गेला ! बाकीचे तुकडे वाऱ्याबरोबर पूर्वीच उडून गेले होते ! हाच एक कपटा भेगेंत अडकून राहिला होता तोही आज गेला ! दिसेनासा झाला ! मीराच्या नृत्यकलेंतील प्राविण्याची उरली सुरली अखेरची साक्ष नाहींशी झाली ! एके काळीं मीरा फार सुंदर नाचत असे, आणि ही मोठी नर्तिका होणार असं लोक म्हणत, याची अखेरची खूण अदृश्य झाली !

मीरा नऊ वर्षांची होती तेव्हां नृत्य हेंच तिचं जीवन होतं. इतर मुलींप्रमाणे ती शाळेंत जात असे. परंतु गणित, इतिहास, भूगोल, भाषा इत्यादि विषयांत तिचं कलासक्त मन रमत नसे. दरवर्षी ती कशीबशी पास होई इतकंच. तिच्या बाई मुंबई इलाख्यांतील भागांतल्या पिकांची माहिती सांगत, ती ऐकतांना छोटी मीरा मनांतल्या मनांत तबल्याच्या तालाच्या

एकाद्या तुकड्याची उजळणी करीत असे. "तत्तत् थुन् थुन् दिगदा. . . " बाई तिला प्रश्न विचारीत त्या वेळी ती भानावर येई आणि प्रश्नाचं उत्तर देणं तिला जड जाई. बाई तिला रागानं विचारीत, "मीरा, तुझं लक्ष कुठे होतं ?" मीराला उत्तर देता येत नसे. बाई एखाद उदाहरण फळ्यावर लिहून दाखवीत असल्या की बाकाखालची मीराची चिमुकली दोन पावलं नाचाचं प्रॅक्टिस करीत असत. वार्षिक परीक्षेंत मीरा कशी पास होत असे कोण जाणे ? नटराजाचीच कृपा म्हणावयाची !

मीराच्या बाईंना व मुख्याध्यापकाना मीराचं नृत्यशिक्षण मुळीच पसत नव्हतं. त्याच्याकडून मीराच्या वडिलाना नेहमी चिठ्या येत असत की मुलीचं अभ्यासांत असाव तितकं लक्ष नाही. परंतु दादासाहेब त्या चिठ्यां-कडे लक्ष देत नसत. नृत्यकलेची गोडी आणि नृत्यकौशल्य मीराच्या अंगी जात्याच आहे आणि योग्य शिक्षण व संधि मिळाल्यास नर्तिका म्हणून ती नांव मिळवील याची त्याना खात्री होती. मीरा आईबापाच्या उत्तेजनाच पुरेपूर चीज करीत होती. वयाच्या दहाव्या वर्षीच तिच्या नृत्यांतील नैपुण्याचा खूप बोलबाला झाला. तिच्या नृत्याचे जाहीर प्रयोग होऊं लागले. तिला बक्षिस, पदक मिळूं लागलीं. वृत्तपत्रात तिची प्रशसा होऊं लागली.

मीरा अठरा वर्षांची झाली तेव्हा नर्तिका म्हणून तिची खूपच कीर्ति झाली होती. शाळेंतला अभ्यास पूर्ण करून ती आता कॉलेजात शिकत होती. परंतु कॉलेजात देखील तिचा लौकिक होता तो हुशार अभ्यासू विद्यार्थिनी म्हणून नव्हे तर नृत्यविशारद मुलगी म्हणून. तिच्या नृत्याचे जाहीर प्रयोग आतां केवळ पुण्यांतच नव्हे तर इतर शहरीदेखील होत असत, आणि दूर-दूरच्या ठिकाणांहून तिला आमंत्रणं येत असत तिचे सर्व ठिकाणचे कार्यक्रम अत्यंत यशस्वी होत असत. लोक तिच्या नृत्यकौशल्यावर खूष होते. तिला नृत्य शिकवणारे तिचे गुरु तिच्यावर खूष होते. तिची आई आणि तिचे वडील खूष होते. मीरा आतां नेहमी अशीच नृत्यकलेची उपासना करणार आणि अधिकाधिक नांव व पैसाहि मिळविणार याबद्दल त्यांना शंका नव्हती. तिचा भविष्यकाल त्याना दिसत होता तो येवढ्यापुरताच. तिच्या आईला बायका विचारीत " मीराचं लग्न केव्हा करणार तुम्ही ? " मीराची आई

त्यांना म्हणे " बघूं सावकाश. इतक्यांत काय घाई आहे ? अजून लहान आहे मीरा. "

खरोखरच मीरा लहान आहे अशीच तिच्या आईबापांची समजूत होती. त्यांच्या नजरेला ती विशीच्या जवळ जाऊं लागलेली नवतारुण्यांतली किशोरी नव्हे तर नऊ दहा वर्षांची मुग्ध बालिकाच भासत होती. मीराच्या त्या बालवयांत त्यांनीं ज्या प्रेमानं तिचं कौतुक केलं होतं त्याच प्रेमानं तीं आताही तिच्याकडे बघत होतीं. मीरानं नृत्यकलेंत जी प्रशंसनीय प्रगती केली होती ती उघडच दिसत होती. पूर्वीं ती लहान होती व आतां शरीरान आणि मनान वाढली ही गोष्ट मीराच्या आईबापांच्या प्रेमानं आंधळ्या झालेल्या डोळ्याना जणूं दिसतच नव्हती. पूर्वींप्रमाणेंच अजूनहि ती 'बेबी'च आहेसं त्याना वाटत होतं. पूर्वीं ज्याप्रमाणें मीरा अभ्यासाकडे बेताचंच लक्ष देत असे आणि तिचं सारं चित्त नृत्यशिक्षणांत केंद्रित झालेलं असे, त्याप्रमाणेंच आताहि तिचं लक्ष नृत्याखेरीज दुसऱ्या कोणत्याच गोष्टींत रमत नसेल अशी तिच्या आईची व बाबासाहेबांची कल्पना होती.

कॉलेजांतल्या अभ्यासात मीराचं मन रमत नव्हतं हें खरं, परंतु नृत्याखेरीज दुसऱ्या कशांतही गोडी न वाटण्याच तिचं वय केव्हांच संपलं होतं. तिच्या मनाला आकर्षित करणाऱ्या अनेक गोष्टी तिच्या लक्षात येऊं लागल्या होत्या. समवयस्क मैत्रिणींचा सहवास तिला हवासा वाटूं लागला होता. पुरुष मित्रांची प्रशंसा तिच्या मनाला विशेष सुखाची वाटूं लागली होती. तरुणांच्या तोंडच्या शाबासकीच्या उद्गारापेक्षांही त्यांच्या नजरेंतील भावाकडे ती अधिक उत्सुकतेनं बघूं लागली होती. ते तरुण तिच्याशीं उघड बोलत त्याहूनही त्याना जें बोलावयाचें असे त्याचा शोध तिचं मन घेऊं लागलं होतं. ज्याचं वर्णन करतां येणार नाहीं असं कांहीं तरी तरुणांच्या सहवासांत आपल्याला गवसतं असं तिला वाटूं लागलं होतं, आणि त्याचा मोह तिला अधिकाधिक पडूं लागला होता. पूर्वीं बालवयांत नृत्य करतांना जे हावभाव केवळ यांत्रिकपणानं ती करीत असे ते करतांना आतां तिच्या अंतःकरणांत कसल्या तरी नवीनच भावनांच्या लहरी उठत असत. केवळ प्रत्यक्ष नृत्याच्या वेळींच या भावना व्यक्त केल्यानं तिचं समाधान होत नसे. त्या भावनांचं स्फुरण तिच्या अंतर्यामीं चालूच राही, आणि जिचं स्वरूप

तिलाच नीट कळत नव्हतं अशी एक चमत्कारिक हुरहुर तिच्या अनुभवास येई.

तिच्या नृत्यशिक्षकांनीं तिची साथ करण्यासाठीं एक निष्णात व्हायोलिन वाजविणारा आणला होता. साथीत त्याच्या वादनाची भर पडल्यापासून मीराच्या नृत्याला काहीं एक विशेषच खुलावट मिळाल्यासारखी झाली होती. रोजच्या सरावाच्या वेळेस, किंवा कधीं कधीं जाहीर कार्यक्रमाच्या वेळीं सुद्धां एखाद्या ठिकाणी माधव आपल्या व्हायोलिनमधून कौशल्यानं असे कांहीं स्वर काढी की मीराच्या नृत्यावर एकदम झळाळून प्रकाश पडल्यासारखा पहाणाराला वाटे, आणि माधवकडे बघून 'वाहवा !' म्हटल्याखेरीज नृत्यशिक्षकांना रहावत नसे माधवच्या या कौशल्याच्या जागा हळूहळू ठरून गेल्या. परंतु कित्येकदा अशी एखादी सुंदर जागा त्याच्या गजांतून स्फूर्तीनं निघाल्याप्रमाणें अकस्मात् निघे. ती निघाली कीं मीरा माधवकडे बघे. तो तिच्याकडे पाही. तो हसे. तीही हसे. तिनं मनांतल्या मनात 'शाबास' म्हटलेलं त्याला कळत असे. त्यानं न उच्चारलेला 'शाबास' शब्द तिला ऐकू येत असे. साऱ्यांनीं माधवच्या साथीची प्रशंसा करावी. ती ऐकली कीं मीराला आनंद होत असे. तिनं माधवला म्हणाव,

" लोकांना तुझं वाजविण फार आवडतं."

त्यानं विचारावं, " म्हणजे तुला आवडत नाही वाटत ? "

" लोकांत मी आलेच की ! "

" तशानं माझं नाही समाधान व्हायच. तुझी निराळी स्वतंत्र प्रशंसा हवी मला. माझं वाजविणं तुला कितीस आवडतं, सांग. "

" सांगायचं बाकी ठेवलय का रे मी ? स्टेजवर नाचतांनासुद्धां नजरेच्या इशाऱ्यानें मी तुला शाबासकी देतें ना ? तुझी साथ नसेल तर माझा नाच रंगणार नाहीं."

तो म्हणे, " छे ! ही भलतीच स्तुती झाली. तुझं नृत्याचं कौशल्य अजब आहे म्हणून माझ्या वाजविण्याची शोभा. तुझ्या कलेच्या सौदर्यावर अलंकार चढविणं येवढं माझं काम. त्या अलंकाराकडे लोकांचं लक्ष जातं तें तुझ्या गुणांमुळें. तुझी साथ करणं म्हणजे एक अपूर्व आनंद आहे."

" पुरे पुरे ! उगीच नको मला हरभऱ्याच्या झाडावर चढवूंस ! "

पुण्यास एक मोठी संगीत परिषद झाली. जवळचे दूरचे नामांकित गायक वादक, नर्तक परिषदेला आले होते. नृत्य विभागातलं पहिल्या क्रमांकाचं सुवर्णपदक मीराला मिळालं. तिच्यावर अभिनंदनाचा वर्षाव झाला. माधव तिला म्हणाला,

" तुला फार शाबासकी द्यावीशी वाटते. पण संकोच वाटतो."

मीरानं हसून विचारलं, " संकोच कशाबद्दल ?"

" सारं जगच तुझी तारीफ करीत आहे. त्यांत माझ्या प्रशंसेचं तुला काय महत्त्व वाटणार ? "

" असं म्हणूं नकोस. उलट तूं माझी पाठ केव्हा थोपटशील म्हणून मी वाटच पाहतें आहे. "

" खरं ? " जें ऐकावयास मिळेल अशी त्याची अपेक्षा नव्हती तें ऐकल्याप्रमाणें माधवचा चेहरा आनंदानं उजळला. तो हंसला, आणि तिची पाठ थोपटून म्हणाला, " किती सुंदर नाचलीस तूं ! या सोन्याच्या पदकावर हिरेमाणकंच जडवायला हवी होतीं. "

" लागलास का तूं मला हरभऱ्याच्या झाडावर चढवायला ! " ती हंसली आणि आपले डोळे मोठाले करून तिनं त्याला दटावलं.

तो क्षणभर गप्प राहिला, आणि नंतर म्हणाला, " माझी एक विनंती मान्य करशील का ? तुझं नुसतं कोरडं शाब्दिक अभिनंदन करून माझं समाधान होत नाहीं. मी तुला एक फीस्ट देणार आहें. येशील का ? "

" तुझ्या घरीं ? "

" मला घर आहे कुठें ? मला आईबाप कुणीच नाहींत – "

" अरे ! – " मीरानं दुःखाचा उद्‌गार काढला.

" चांगल्या हॉटेलांत जाऊं आपण. दोन घटका मजेंत घालवूं. येशील का ? बाबासाहेबांना मी विचारूं का ? "

मीरानं एकदम तळहातानं तोंड झाकलं, व मान हालविली. " नको, नको. बाबा परवानगी द्यायचे नाहींत. त्यांना अगदीं विचारूं नकोस. "

" परंतु माझी तर फार इच्छा आहे तूं यावंस म्हणून. माझी निराशा करणार का तूं ? "

त्याचा स्वर तिच्या कोवळ्या प्रेमळ अंतःकरणाला एकदम धारेसारखा बोचला. निराशेचं दुःख त्याला देण्याची शक्ति तिच्या ठिकाणीं नव्हती. वडिलांची संपत्ती मिळण्याचा संभव तिला दिसत नव्हता. उलट सुलट भावनांच्या पेचांत सापडण्याचा तिचा हा पहिलाच प्रसंग होता. तिच्यासारख्या नवतारुण्यांतल्या भावनावश मुलीला जें केव्हां तरी सुचतंच तें तिला सुचलं. कपट ! मीरा स्वतःशींच दचकली. परंतु क्षणभरच ! तरुण मुलींच्या मनात कपट प्रथम आलं की त्याच्याबरोबरच नवीनच धीटपणाहि येतो. आणि आईबापाना कळू न देता स्वतःच्या मनाची एखादी इच्छा पूर्ण करण्यांत साहसाचं जें आकर्षण असतं त्याची ओढहि वाटते. मीरा माधवला म्हणाली,

" तुझी निराशा काय म्हणून करीन मी ? मी येईन. म्हणशील तिकडे. घरांत न विचारतां-- "

" थँक्स ! " असं हंसत हळू आवाजात म्हणताना माधवन तिचे दोन्ही हात धरले.

पहिलं कपट करताना मीरा मनाशी म्हणाली होती, आईला अगर बाबांना विचारल्याशिवाय पुन्हां असं कांही करायचं नाही. परंतु तरुण मुलीचे असले निश्चय सहसा पार पडत नाहीत. पहिल्या खेपेस जें कपट अवघड वाटतं तें पुढं सोपं वाटूं लागत. गुप्त सुखाची गोडी लागते. त्या सुखाची ओढ आवरत नाहीं. कपट कठीण वाटण्याऐवजी त्याच्या आकर्षणांत मन अधिकाधिक गुतत जातं....माधवच्या सहवासाची मीराची भूक वाढत गेली. आपण एकमेकांच्या प्रेमात सापडलों आहोंत हें दोघांनींहि ओळखलं. त्यांच्या चोरट्या भेटी वारंवार होऊं लागल्या. अशा भेटींत मीरानं माधवला म्हणावं,

" बाबांना कळलं तर रे ? "

त्यानं म्हणावं, " छे ! त्यांना कशानं कळतंय ? "

" तरी पण मला भीति वाटते. आणि हा चोरटेपणा नकोसा वाटतो. "

एकदां माधव तिला म्हणाला, " मलादेखील या चोरटेपणाचा कंटाळा आला आहे. माझ्या मनांत कितीदां तरी येतं कीं सरळ बाबासाहेबांना

सांगावं कीं माझं मीरावर प्रेम आहे."

तिनं आपल्या पजानं त्याचं तोंड झाकलं आणि ती म्हणाली, " नको रे नको. असला काहीं वेडेपणा करशील तर माझ्या गळ्याची शपथ आहे तुला--"

" पण हा चोरटेपणा किती दिवस चालायचा ?"

" चालेल तितके दिवस ! वेळच आली तर पुढें पहातां येईल. "

माधवला अस सांगतांना मीराची अशी कल्पना होती कीं साऱ्या गोष्टी बाबासाहेबाना सांगण्याचा प्रसग लवकर येणार नाही. तो दूर आहे. आणि जोंपर्यंत तो दूर आहे तोंपर्यंत चोरट्या गाठीभेटीच सुख मिळेल तितकं घ्यायला हरकत नाही.

परंतु एके दिवशीं तिला नृत्य शिकविणारे शिक्षक नित्याप्रमाणें आले, ती पायात घुगरं बांधू लागली. शिक्षकानी तबला सुरांत मिळविला आणि म्हटलं, " हु. सुरू !" ती त्यांना म्हणाली, " माधव येऊ दे ना ? "

" तो येणार नाही. " ते म्हणाले.

" का ? "

" बाबासाहेबानीं त्याला नको म्हणून सांगितलं आहे. व्हायोलिन वाजविणारा दुसरा कोणी तरी पहावयास हवा. मिळेल लौकरच. वाजविणारांना काय तोटा ? हवे तेवढे आहेत. माधवपेक्षां चांगला आणूं आपण. हू. सुरू ! "

मीराला क्षणभर वाटलं पायांतील घुगरं फेकून द्यावींत व मास्तरांना सांगावं मला नाचायचं नाही, जा तुम्ही ! परंतु तिन आपलं मन आवरलं. असा देखावा करण्यात अर्थ नव्हता, तिनं मास्तरांना फक्त एवढंच विचारलं, " बाबांनी सांगितलं माधवला नको म्हणून ? कां ?"

मास्तर म्हणाले, " तें मला काय माहीत ? ते मला एवढंच म्हणाले दुसरा व्हायोलिनवाला बघा. माधवला मी नको म्हणून सांगितलं आहे."

मीरा कांहीं बोलली नाहीं. नित्याप्रमाणें तिनं शिकवणी पार पाडली. परंतु शिकण्यांत तिचं चित्त मुळींच नव्हतं. आपण केव्हां एकदां माधवची भेट घेऊं, आणि काय झालं आहे तें आपल्याला केव्हां एकदां कळेल असं तिला झालं होतं. त्याच्या भेटीसाठीं तिचा जीव तळमळत होता. तिला

घरांत राहवेना. आईची आणि बाबांची आपल्यावर पाळत आहे अशी तिला शंका आली. ती चुकवून माधवकडे जायला हवं होतं. कॉलेजांत जाताना तिनं आईला सांगितलं, " आज कॉलेजांत एक व्याख्यान आहे. मला घरी यायला उशीर होईल. " तिची आई म्हणाली, " फार उशीर नको करूं " " नाही करणार " असं आईला हंसत सांगून ती घराबाहेर पडली आणि कॉलेजात जाण्याऐवजी ती माधवच्या खोलीवर गेली.

तो भेटल्याबरोबर त्याच्या गळ्यात पडून ती रडूं लागली. हुदके देत ती म्हणाली, " आता कस रे करायचं ? "

तिला थोपटीत तो म्हणाला, " मीरा, तू अगदी घाबरू नकोस. आपली ताटातूट कोणी करू शकत नाही. "

" पण बाबांना कळल कस ? "

" कोण जाणे ! "

" ते तुला काय म्हणाले ? "

" त्यांनी फक्त मला मारायचच शिल्लक ठेवलं– "

" तू त्यांना काही बोललास का ? "

" मीं त्यांना फक्त एवढंच सागितलं, मीरावर माझ प्रेम आहे, मी तिच्याशी लग्न करणार आहे. त्यानी मला बजावल तू तिची पुन्हां गाठ घेशील तर खबरदार ! "

" मग आता पुढे कसं करायचं !" मीरा पुन्हां हुदके देऊन रडूं लागली. " तुझ्यावाचून मी जिवत राहणं शक्य नाही. "

" पण तशी वेळ मी तुझ्यावर येऊं देईन का ? " तिला कुरवाळीत माधव म्हणाला, " तुझ्या घरचा कितीहि विरोध असला तरी मी तुला सोडणार नाही. आपण कुठें तरी पळून जाऊं म्हणजे झाल. "

त्याचे ते शब्द ऐकल्याबरोबर मीरा भीतीनं आणि आश्चर्यानं ग्रसकली. " पळून कस जातां येईल आपल्याला ? " असं म्हणून तिनं माधवला दोन्ही हातांची मिठी घातली.

माधवनं तिला छातीशीं घट्ट धरल आणि " सांगतों. ऐक. " असं म्हणून पळून जाण्याचा बेत रचण्यासाठी अर्धवट स्वत:शी बोलल्याप्रमाणें तो बोलूं लागला.

माधवच्या खोलीवरून मीरा परत जावयास निघाली तेव्हां तिची मन:स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. आपण लवकरच माधवबरोबर दूर कुठें तरी जाऊं या कल्पनेचा आनंद तिच्या अंत:करणांत भरला होता; परंतु त्याबरोबरच घरांतल्या माणसांना कायमचं सोडून जावं लागणार या विचाराचं दु:ख आणि पळून जाण्याचा आपला बेत फसणार तर नाहीं अशी शंका तिच्या हृदयाला घायाळ करीत होती.

नंतरच्या दोन दिवसांत ती धड शुद्धीवरच नव्हती. ज्या घरांत आपण वावरत आहोत तें घर आपल्याला लवकरच कायमचं सोडायचं आहे ही जाणीव तिच्या मनात सतत होती. उलट माधवबरोबर आपण पळून गेलों कीं सारी अनिश्चितता, सारा विरोध, सारा मनस्ताप संपेल या विचारानं तिला समाधान होत होतं. आणि दोन दिवस उरले, एक दिवस उरला, अर्धा उरला, अशा प्रकारें घटका मोजतांना आशा-निराशेचे हेलकावे तिच्या मनाला बसत होते. आणि सगळ्यांत अधिक ताण तिच्या मनाला बसत होता तो आपल्या गुप्त बेताची शंका कुणालाही येऊं नये यासाठीं कराव्या लागणाऱ्या प्रयत्नाचा ... परंतु ' लवकरच हें सारं संपेल ! लवकरच !' असं ती स्वत:ला सारखं सांगत होती. त्या शब्दांचा मंत्र जपीत होती. शुक्रवारी तिचे बाबा कचेरीत गेल्यावर कॉलेजांत जावयासाठीं ती बाहेर पडणार होती, आणि माधवच्या खोलीवर जाणार होती. आपलं आयुष्य त्याच्या स्वाधीन करणार होती. पुन्हा कधीं परत येणार नव्हती.

परंतु शुक्रवारीं बाबासाहेब कचेरींत गेलेच नाहीत. ते केव्हां जातात त्याची मीरा वाट बघत होती. ते जाईनात तेव्हां तिला चमत्कार वाटला. ती गोंधळून गेली. शेवटी तिला राहवेना. तेव्हां तिनं त्यांना विचारलं, " आज कचेरींत नाहीं का जायचं तुम्हांला ? "

ते म्हणाले, " आज मला बरं वाटत नाहीं. "

तिनं सहजगत्या विचारलं, " काय होतंय तुम्हांला ? "

ते म्हणाले, " पश्चात्तापाचं दु:ख होतं आहे. "

ते शब्द ऐकतांच मीरानं चमकून त्यांच्याकडे पाहिलं.

त्यांनीं हळूच तिचा हात धरला आणि म्हटलं, " चल माझ्या खोलींत जाऊन बसूं. मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे."

...२

त्यांच्याबरोबर त्यांच्या खोलीत जातांना मीराच्या तोंडाला कोरड पडली. तिची छाती धडधडूं लागली. तिनं ओळखल की काही तरी घात झाला आहे. आपला बेत आतां फसणार आहे. आपल्या आणि माधवच्या गुप्त बेताचा सुगावा कसा कोण जाणे परंतु आपल्या वडिलांना लागला आहे.

खोलींत गेल्यावर तिला अगदी जवळ बसवून घेऊन तिच्या पाठीवर हात फिरवीत बाबासाहेब म्हणाले, " मीरा, आम्ही तुला नकोशी झालों आहोंत काय ? "

त्यांचे ते शब्द ऐकतांच मीरा रडू लागली.

बाबासाहेब म्हणाले, " तुला लग्नच करायचं होतं तर आम्ही तुला उत्तम स्थळ बघून दिलं नसतं का ? माधवसारखा नवरा तुला कसा हवासा वाटतो ? त्याच्यावर कशी भाळलीस ? तो श्रीमंत आहे, का देखणा आहे ? कोणता गुण तू बघितलास त्याच्यात ? "

तो प्रश्न ऐकल्याबरोबर मीराच्या मनाची निराळी प्रतिक्रिया झाली. तिला माधवचं प्रेम हव होतं, परतु त्यासाठीं घर सोडावं लागणार याचं तिला दुःख होत होतं, कारण आईबापांची ममता तिला हवी होती. त्यामुळें " आम्ही तुला नकोशी का झालो आहोंत ? " हा बापाचा प्रश्न ऐकल्या-बरोबर तिचं स्वतःचं गुप्त दुःख डिवचल्यासारखं होऊन तिला हुंदका आला होता. बापाला मिठी मारावी अशी देखील इच्छा तिला झाली होती. परंतु आतां तिचे बाबा जेव्हां माधवविषयी वाईट बोलू लागले तेव्हां तिची प्रीति आणि निष्ठा जागी झाली व रडण्याऐवजी भांडण्याची इच्छा तिला झाली. तिच्या डोळ्यांत नवे अश्रू आले नाहीत. उलट तिची नजर एकदम बदलून कठोर झाली. ती म्हणाली,

" माधवचे गुण तुम्हाला कसे दिसणार ? तुम्ही त्याच्या विरुद्ध आहांत ना. तुम्हाला तो वाईटच दिसणार. परंतु माझं त्याच्यावर प्रेम आहे."

बाबासाहेब म्हणाले, " पण आमच्यापासून चोरून कां ठेवलंस सारं ? त्याची तितकी लायकी नाही असं तुला वाटल म्हणूनच कीं नाहीं ? "

ती आवेशानं म्हणाली, " मुळीच नाहीं ! "

" मग सरळ का नाही सांगितलंस मला किंवा आईला ? "

या प्रश्नाचं उत्तर मीराला चटकन् सुचेना. ती क्षणभर गोंधळली, पण

मग म्हणाली, " सांगितलं असतं तर तुम्ही संमती दिली असती काय ?"

आतां चटकन उत्तर न सुचल्यामुळें गोंधळण्याची पाळी मुलीऐवजीं बापावर आली. आपल्या मनाच्या गोंधळाचा बाबासाहेबांना राग आला व त्यांनीं आवाज उंच चढवून विचारलं, " खुशाल घरांतून पळून जाण्याचा बेत करतांना तुला कांहीं शरम नाही वाटली ? "

त्यांच्या या शब्दांनीं प्रेमाचं बोलणं एकदम संपलं, आणि भांडणाला तोंड लागलं. मीराच्या अंगांत एकदम कोठून अवसान आलं कोण जाणे, तिनंहि आवाज चढवून विचारलं, " शरम काय म्हणून ? कोणता गुन्हा मी केला किंवा करणार होतें ? माधववर माझं प्रेम बसलं यांत लाज वाटण्यासारखा कांही अपराध माझ्या हातून घडला असं मला मुळींच वाटत नाही. "

बाबासाहेब एकदम कडाडले, " कसं वाटेल ? पुरती गाढव बनली आहेस ना तूं ! "

बाबासाहेब संतापानं खूप बोलत राहिले. मीराहि सारी मर्यादा सोडून कडाकड उत्तरं देऊं लागली. मीराची आई खोलीत आली. तिनं मीराला पोटाशीं धरलं. परंतु मीराचा कैवार तिनं घेतला नाही. माधवशीं लग्न करण्याच्या मीराच्या बेताविषयी तिनं नापसंती दाखविली. त्यामुळें भांडणांतले शब्द तेवढे थोडे नरम झाले इतकंच. भांडणामागचा विरोध कायम राहिला. मीरानं बापाला सांगितलं,

" तुम्ही कितीहि नको म्हटलं तरी माझा निश्चय कायम आहे. मी माधवशींच लग्न करीन. "

बाबासाहेब म्हणाले, " कसं करतेस पहातों. आजपर्यंत तुझ्यावर प्रेम केलं, तुझ्या अंगच्या कलेचं कौतुक केलं, त्याचे उपकार फेडलेस म्हणायचे. आमचं चुकलंच ! परंतु तूं अशी नाचूं लागशील याची कल्पना नव्हती. बरं झालं वेळेवर डोळे उघडले आमचे. अजून चूक सुधारतां येईल आम्हांला. उद्यांपासून तुझं घराबाहेर जाणं बंद ! आणि नृत्याचं शिक्षणहि बंद ! पुष्कळ झाली कलेची उपासना ! "

त्यांच्या तोंडचे हे शब्द ऐकून मीराला किंचित् दचकल्यासारखं झालं. परंतु मोठीशी भीति वाटली नाहीं. तिच्या मनांत आलं, लेकीवर संतापणारे

सारे बाप रागाच्या ऐन भरांत असेच बोलतात, त्या बोलण्याप्रमाणें ते वागतात थोडंच ? तसंच वागणं वाटतं तितकं सोपं नाहीं . . . बापाच्या खोलीतून बाहेर पडून ती आपल्या खोलींत गेली व अथरुणावर अंग टाकल्याबरोबर माधवची जोरानं आठवण झाल्यामुळं रडूं लागली. परंतु तिच्या मनाची पुरती निराशा झाली नव्हती. माधवबरोबर पळून जाण्याचा बेत आजच्यापुरता फसला, पण केव्हां तरी संधि येतांच आपण तो पार पाडूं असं तिला वाटत होतं. एकीकडे तिला रडण्याचे हुंदके येत होते, परंतु दुसरीकडे शक्य तितक्या लवकर माधवची गाठभेट घेण्यासाठी काय करावं त्याचा विचार ती करीत होती. आपल्या मनाप्रमाणें आपल्याला वागता येईल याबद्दलची तिची आशा संपली नव्हती.

नंतरच्या दिवसात मात्र तिची ती आशा वेगानं नष्ट होऊं लागली. बाबासाहेबांनी दोन महिन्याची रजा घेतली व मीराचं घराबाहेर जाणं अजिबात बंद करून तिच्यावर जातीनं पहारा ठेवला. माधव पुणं सोडून मुंबईस गेल्याचं तिला कळलं. तिचं नृत्यशिक्षणहि बाबासाहेबांनी बंद केलं. घरातील पेटी तबला इत्यादि वाद्यं मास्तरांना देऊन टाकली. तिचीं घुंगरं फेंकून दिली. तिच्या नृत्याशी ज्यांचा संबंध होता अशा वस्तू एकामागोमाग एक घरांतून नाहीशा केल्या.

सुमारे एक वर्षानंतर बाबासाहेबांनी मीरासाठीं एक चांगलं स्थळ पाहिलं. मीरानं नाही म्हटलं नाही. प्रेमासाठी झुंज करण्याची तिची इच्छा केव्हांच नाहीशी झाली होती. लग्नाची हौस तिला मुळीच उरली नव्हती. परंतु तिला त्याबद्दल तिटकाराहि वाटत नव्हता सुख-दुःखाच्या दृष्टीनं लग्नाकडे ती बघतच नव्हती जशी मुलाची मुंज होते तसंच मुलीचं लग्न केव्हां तरी व्हायचंच, त्यात सुखदुःखाचा काय संबंध, असं वाटण्याजोगी तिची विचित्र मनोवृत्ती तयार झाली होती. तिचा नवरा श्रीमंत होता, मोठा एंजीनिअर होता. संगीताची त्याला किंचित्‌हि गोडी नव्हती. परंतु एरवी तो मोठा हौशी होता. लग्न झाल्यानंतर लवकरच त्यानं एक सुंदर बंगला बांधला. त्या बंगल्यात श्रीमती संसार थाटून मीरा राहूं लागली.

नवरा कामावर गेला असला आणि घरांत ती एकटीच असली कीं मीराला पूर्वीच्या आठवणी होत असत. तिच्या नृत्याचे जे कार्यक्रम गाजले होते ते

आठवत. लोकांनीं केलेलं कौतुक आठवे. माधवची आठवण होई. नाचाच्या वेळी जे उंची कपडे ती करीत असे ते तिनं नवऱ्याच्या घरीं रहावयास येतांना आणले होते, ते ती कपाटांतून बाहेर काढी व त्यांकडे पाहात राही. फोटो हातात घेई आणि त्यांकडे बघत राही. तिच्या मनात येई, एके काळी नृत्याबद्दल लोकानी माझी वाहवा केली हें कुणाला सांगितलं तर खरं तरी वाटेल का ? माझं मला देखील खरं वाटत नाहीं ! जणु मीराचा तो अवतार संपलाच ! तिचं नृत्य गेल ! त्या नृत्याचे एकेक अवशेष गेले ! व्यक्तीच्या आयुष्याची एकेक तऱ्हा अशीच क्षणभंगुर असते काय ? तिचा अंत होतो काय ? त्या त्या तऱ्हेपुरती ती व्यक्ति मरते काय ? यालाच मरण म्हणायच काय ? आणि असंच मरण थोड्या फार अशानं सगळ्याच माणसाच्या वाट्याला येतं काय ? . . .

नाचाच्या वेळी ज्या सुदर साड्या ती नेसत असे त्याकडे पाहताना तिला कधी कधी वाटे त्यातली एक नेसावी, आरशांपुढें उभं रहावं, आणि एके काळचं आपलं तें रूप आपणच पहावं. विस्मृतीत गडप झालेल्या—एका अर्थी मेलेल्या—नाचणाऱ्या मीराला पुन्हा जिवंत करून तिच्याकडे बघावें. ती मीरा जगाला आतां पुन्हा कधीच दिसणार नव्हती. परंतु घराच्या एकांतांत तिचं चोरून दर्शन घ्यायला तिची तिला कोणती हरकत होती ! परंतु लगेच तिच्या मनांत येई, काय करायच आहे त्या मीराला पुन्हां बघून ? तिला बघण्यांत जें समाधान मिळणार तें चोरटंच ! त्या चोरट्या समाधानाची इच्छा हवी आहे कशाला ? ज्यावर आपला उघड हक्क आतां उरलेला नाही तें समाधान नकोच . . . ती साड्या परत ठेवून देई, बाहेर काढलेले फोटो परत ठेवी, आणि कपाट बंद करून टाकी.

एके दिवशीं मात्र तिच्या मनांत एक कल्पना आली व ती अमलांत आणल्यावांचून तिला रहावलं नाहीं.

खोल्यांच्या दारांना आणि खिडक्यांना लावण्यासाठी पडदे हवे होते. तिनं आपल्या नाचाच्या वेळच्या साड्या फाडल्या आणि दहा बारा पडदे तयार करून ते लावून टाकले. वाऱ्याच्या झुळकेबरोबर खिडक्यांवरचे पडदे थरथरूं लागले, आणि दारावरचे पडदे फुगून मागं पुढे झुलूं लागले. त्यांकडे बघतांना मीराचं अंतःकरण समाधानानं भरून आलं. नाचाच्या वेळेस

गिरक्या मागून गिरक्या घेऊन ती समेवर उभी राही तेव्हां तिच्या अंगा-वरची साडी अशीच फुगून झुलत असे. ते सुन्दर पडदे शोभून तर दिसत होतेच, पण शिवाय त्याकडे पाहिलं कीं मीराच्या मनश्चक्षूना स्वत:ची नृत्य करणारी मूर्ती त्यामागें दिसणार होती.

तिचा नवरा संध्याकाळीं घरीं आला तेव्हां खोलीत उभं राहून तो म्हणाला, "खोली निराळीच दिसते आहे. काय बरं बदल झाला आहे ?"

ती हंसली व त्याच्या खाद्यावर हात टेकून म्हणाली, "काय बदल झाला आहे तें नाही ओळखता येत ?"

आबासाहेब एकदम हंसला आणि म्हणाला, "आत्ता आलं लक्षात. नवे पडदे लावले आहेस दाराना आणि खिडक्यांना."

"आवडले तुला ?"

"कापड केव्हां आणलंस ?"

"नवं कापड नाहीं आणलं."

"मग ?"

"माझ्या नाचाच्या साड्या उगीच कपाटांत पडल्या होत्या त्या फाडल्या आणि पडदे केले."

आबासाहेबाच्या कपाळाला एकदम आठ्या चढल्या.

लग्नाच्या आधीं मीरा नाच शिकत असे, तिनं मोठं नांव मिळवलं होतं, इत्यादि हकीकत आबासाहेबाला माहीत होती. इतकंच नव्हे तर मीराचं आणि माधवचं प्रेमप्रकरणही त्याला ठाऊक होतं तिच्या त्या पूर्वायुष्यांतला तो भाग त्याला मुळीच पसंत नव्हता. तिच्या त्या आयुष्यातील आठवण करून देणारी कोणतीहि गोष्ट त्याला दृष्टीसमोर नको होती. नवरा-बायकोच्या बोलण्यांत हा विषय कधीं निघत नसे. बोलाबसायला, चहा प्यायला येणाऱ्या मित्रानीं तो विषय कधी काढलाच तरी एखाद्या टेबलाचा खण बंद करावा त्याप्रमाणें आबासाहेब तो बंद करी...

तो म्हणाला, "हे पडदे मुळींच शोभत नाहींत. काढून टाक."

दुसऱ्या दिवशी त्यानं स्वतः बाजारांतून कापड आणलं, शिंप्याला बोलावलं, पडदे करून घेतले. मीराच्या साड्यांचे पडदे काढून टाकिले. त्या पडद्यांचं बोचकं कांहीं दिवस घरांत पडून राहिलं. शेवटीं एके दिवशीं

दारावर आलेल्या बोहारणीला ते पडदे देऊन मीरानं कांचेच्या बरण्या घेतल्या. कपाटांत ठेवलेले नाचाचे फोटोही एके दिवशी मीरानं बाहेर काढले, त्यांचे भराभर तुकडे करून तिनं ते खिडकीबाहेर फेकून दिले, आणि वाऱ्याबरोबर उडत जाणाऱ्या त्या कपटयांकडे बघत ती उभी राहिली. सगळे कपटे रस्त्यावरून फरफटत किंवा अंतराळांत गिरक्या घेत दूर दूर गेले व दिसेनासे झाले ! एका फोटोचा एक मोठा कपटा मात्र गटाराच्या भेगेंत अडकून राहिला.

नंतर किती दिवस तरी दुपारच्या रिकाम्या वेळेस मीरा खिडकींत उभी राहिली की गटाराच्या भेगेंत अडकलेल्या त्या कपटयाकडे बघत राही. तिच्या नृत्यकलेंतील नैपुण्याचा, आणि माधववर तिनं केलेल्या प्रेमाचा तो अवशेष बघताना तिला कांहीं एक सूक्ष्म समाधान होत असे. तिला वाटे, खाली धावत जावं, गटाराच्या भेगेंत अडकलेला तो कपटा काढून घ्यावा, आणि वर आणून तो जपून ठेवून द्यावा. परंतु तिला पुन्हा वाटे, काय करायचा आहे तो कपटा तरी जपून ठेवून ? ती फक्त वाऱ्यावर फडफड-णाऱ्या त्या तुकडयाकडे नजर लावून खिडकीत उभी राही !

मीराच्या फोटोचा तो तुकडा धूळ खात तसाच अडकून पडला होता. उन्हानं तापत होता. पाल्यापाचोळयानं झांकला जात होता. वारा आला कीं फडफड करीत होता. त्या भेगेंतून मात्र त्याची सुटका होत नव्हती.

परंतु आज वळवाच्या सरी आल्या. घटकाभर अगदीं जोराची वृष्टी झाली. गटारांतून पाण्याचा लोंढा खळखळून वाहूं लागला. फोटोचा तो तुकडा भेगेंतून सुटला, वाकडया तिकडया गिरक्या घेत गेला व दिसेनासा झाला ! मीराच्या नृत्यकलेंतील प्राविण्याची आणि तिच्या व माधवच्या प्रेमाच्या दिवसांची उरली सुरली अखेरची खूण अदृश्य झाली !... माणसाचं आयुष्य अंशा अंशानं असंच संपतं ! मनुष्य अंशा अंशानं असंच नष्ट होत असतं ! अशा या मरणालाच म्हणतात जीवन !

# २ . . . . . . . घाव

जेवण आटोपल्यावर शिवरामन ताटातच हात धुतले, चूळ केली, आपल्या ऐटबाज मिशावरून हात फिरवला धोतराच्या सोग्यानं तोंड आणि हात पुसले, आणि उठून भिंतीच्या खुंटीला अडकविलेल जाकीट अंगावर चढविण्यासाठी हातात घेऊन तो आपल्या भावजयीला म्हणाला, " रंगा-दादाची पंगत साधली नाही याच मला वाईट वाटतं. पण जेवण फर्मास घातलस ! "

त्याच्यासमोर उभी राहिलेली रंगाची बायको अंबू म्हणाली, " साधी भाजी-भाकर तर केली होती. "

" पण फार गुळचट लागली. "

तिनं मुरका मारला व हंसून म्हटलं, " गोड करून घेणारं माणूस असल की वेडावाकडा सैपाकदेखील गोड लागतो, दुसरं काय ? "

शिवरामनं विचारलं, " आतां रंगादादा जेवायला घरी येणार तरी कधी ? रात्रीचे अकरा वाजायला आले की ! "

अंबू म्हणाली, " गावाच्या कामापुढें जेवणाखाणाकडे लक्ष असत म्हणतां काय त्याचं ? त्याची मीटिंग आटपेल तेव्हां येतील. म्हणूनच मी तुम्हाला आग्रह केला तुम्ही जेवून घ्या म्हणून. त्यांचा काय भरंवसा ? कधी कधी जेवण तयार ठेवून मी वाट बघत बसतें आणि याचा निरोप येतो की—"

तितक्यात कोणी तरी बाहेरच्या दारातून हाक मारली, " अंबूताई ! ओ अंबूताई ! "

अंबूनं विचारलं, " कोण आहे ? "

" मी दामू. दादांचा निरोप घेऊन आलों आहे. "

अंबू पुढें झाली आणि म्हणाली, " काय ? "

" धामणी गांवांत खून पडल्याची बातमी आली, म्हणून मीटिंग आटपल्याबरोबर दादा दोन–चार कार्यकर्त्यांना घेऊन बैलगडीनं तिकडे जाणार आहेत. जेवायला घरीं येणार नाहींत. धामणीहून घरी यायला त्यांना उद्यां संध्याकाळ होईल."

निरोप सांगतां सांगतां दामू पाठमोरा झाला आणि गेलासुद्धां !

अंबू परत वळली आणि शिवरामला म्हणाली, " असा निरोप येतो, पाहिलंत ? आतां उद्यां संध्याकाळपर्यंत तरी येतील अशी खात्री आहे म्हणतां काय ? "

शिवराम हंसला आणि म्हणाला, " मोठ्या भाग्याची आहेस तूं अंबू. तक्रार कसली करतेस ? रंगादादा मोठा कार्यकर्ता झाला आहे. काकांची इस्टेट मिळाल्यामुळे श्रीमंत तर झालाच तो, पण आतां गांवांतच नव्हे तर जिल्ह्यांतसुद्धां मोठा मान आहे त्याला. अशा माणसाची बायको व्हायला नशीब लागतं."

अंबूनं मान झटकली आणि म्हटलं, " सारं गांव मला हेंच सांगतंय. तुम्हीसुद्धां हेंच सांगणार काय ? "

तो प्रश्न विचारतांना अंबूनं ज्या नजरेनं शिवरामकडे बघितलं तिचा अर्थ त्याच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाही. आणि तो अर्थ लक्षांत आल्याबरोबर त्याला हर्ष झाल्यावांचूनहि राहिला नाहीं. गेल्या पंधरा दिवसांत थोरल्या भावाच्या घरी वरचेवर आल्यावेळी अंबूशीं एकटीशीं बोलण्याची संधि त्याला जेव्हां जेव्हां मिळाली होती, तेव्हां तेव्हां आपल्याविषयीं तिची वृत्ति अजमाविण्याचा प्रयत्न त्यानं केला होता. तिच्याविषयींचा आपल्या मनांतला हेतु साधेल असं त्याला एखादवेळेस वाटलं होतं; परंतु खात्री मात्र वाटली नव्हती. आत्तांची तिची नजर पहातांच त्याला खात्री वाटली.

त्यानं तिच्याकडे अर्थपूर्ण नजरेनं पाहिलं.

तिनं एकदम नजर वळवली, व स्वतःशीं पुटपुटल्याप्रमाणें ती म्हणाली, " मला वाटलं होतं, निदान तुम्ही तरी मला भाग्याची म्हणणार नाहीं." तिच्या डोळयांत एकदम आंसवं आलीं आणि डोळे पुसाण्यासाठीं तिनं कमरेला

खोचलेला पदर ओढला.

शिवराम म्हणाला, "अंबू, रडूं नकोस. तू सुखात आहेस असं सारं गांव म्हणत असेल; पण मी नाही तसं समजत. मघाशी मी बोललों तें खोटं. तुझं मन पहाण्यासाठीं. या पधरा दिवसांत तुझं माझं बोलणं थोडंच झालं, पण मी ओळखलं की मी येतों, बसतो, बोलतों, यामुळें तुला बरं वाटतं."

अंबूनं ओल्या डोळ्यांनीच एकदम वर पाहिलं आणि म्हटल, "फार बर वाटतं. किती तें तुम्हांला कसं सागू ?"

"नकोच सांगूस. मला कळतंय् सारं." शिवरामनं हातातल जाकीट अंगांत चढवल आणि खुटीवरची गांधी टोपी काढून डाव्या तळहातावर तिची घडी मारीत तो म्हणाला, "आता खर म्हणजे या घटकेला कंपनीच्या बिऱ्हाडापर्यंत अर्धा मैल पायपीट करण्याचं जिवावार आलं आहे."

त्याच्या हातातील टोपी काढून घेत अंबू हंसली आणि म्हणाली, "जिवावर आल आहे तर जायला कुणी सांगितलं आहे ?"

शिवरामन तिला जवळ ओढण्यासाठी एकदम तिचे दोन्ही हात धरले.

ते सोडवून घेऊन दूर होत अबू म्हणाली, "दार उघडं आहे."

शिवरामनं चटकन् पुढं पावलं टाकून दार लोटून घेतल, कडी लावली, आणि परत वळून तिला धरीत तो म्हणाला, "अबू !"

तिनं त्याला घट्ट मिठी घातली !

पहाटे कोंबडा आरवल्यावर शिवराम अंबूला म्हणाला, "सोड मला. खोलीवर जायला हवं ना."

अबू म्हणाली, "तुम्हाला सोडायचं जिवावर येतं. पण कुणाच्या दृष्टीस न पडतां तुम्ही जावं हे चांगलं. पण थांबा, तुम्हांला चहा करून देतें. मग जा."

कांही वेळानं शिवराम आपल्या थोरल्या भावाच्या घरांतून बाहेर पडला व रस्त्याला लागला. वर आभाळांत चांदण्यांचे थवेच्या थवे चमचम करीत होते. मृग नक्षत्राचा मोठा चौक पश्चिमेकडे दिसत होता. व्याधाचा ठळक तारा एखाद्या दिव्यासारखा भासत होता. पायांखालची वाट उजळणारा

मंद प्रकाश जिकडे तिकडे भरला होता. पहांटेच्या गार वाऱ्याची झुळूक सुटली होती. दूरच्या टेकड्याच्या माथ्यांची जाड काळी रेघ आभाळावर स्पष्ट उठलेली दिसत होती. शिवरामचं अंतःकरण एका नव्याच सुखाच्या समाधानानं हलकं झाल होतं. त्याच्या हातांना अंबूच्या अंगाचा स्पर्श अजून आठवत होता. त्याच्या ओठाना तिच्या मुक्यांचा वास अजून येत होता. सुखाच्या वेळचे तिचे निःश्वास आपण अजूनहि हुंगीत आहोंत असं त्याला वाटत होतं....

अंबू कांही मोठी देखणी नव्हती. काळीसावळी आणि साध्याच नाका-डोळ्यांची होती ती. परंतु ती तरुण होती, आणि मूल न झाल्यामुळें तिचा कोवळेपणा अजून कायम होता. उत्तम आरोग्यानं रसरसलेली तिची काया कुणालाहि मोह पाडील अशी होती.

मात्र शिवरामच्या मनाला मोह पडला होता तो केवळ तिच्या रसरशीत तारुण्याचा नव्हे. या पहांटेच्या वेळेस वाट चालतांना त्याच्या मनांत समाधान भरलं होतं तें एका तरुण स्त्रीशी रममाण होतां आलं येवढ्याच विचाराचं नव्हे. अंबू त्याच्या थोरल्या भावाची लग्नाची बायको नसती तर कदाचित् ती त्याला हवीशी वाटलीहि नसती, तिच्या तरुण कायेची अभिलाषा त्याच्या मनांत उत्पन्न झालीहि नसती. ती त्याच्या दृष्टीस कुठें पडली असती तर मुद्दाम वळून पुन्हा तिच्याकडे बघावंसं त्याला वाटलंहि नसतं. ती रूपानं सामान्य होती. अंबूला आपलीशी करण्याची इच्छा शिवरामला झाली होती ती कामुकतेमुळें नव्हे, तर थोरल्या भावाबद्दलचा जो द्वेष त्याच्या मनात होता त्यामुळें. रंगाची बायको आपण बिघडविली, जें त्याच्या मालकीचं सुख तें आपण हिरावून आपलंसं केलं, याचं समाधान त्याला हवं होतं ! आतां रस्त्यानं चालतां चालतां हेंच समाधान त्याच्या मनांत भरलेलं होतं. अगदीं पहिल्यांदां अंबू त्याच्या नजरेस पडली तेव्हांच त्यानं मनाशीं ठरविलं होतं, की हिला वश करायचं. तिचं मन चंचल झालेलं त्याला दिसलं तेव्हां तो मनाशीं म्हणाला होता, 'ठीक आहे, ही केव्हां ना केव्हां तरी माझी इच्छा पूर्ण करील.' रंगापासून तिला मूल झालेलं नव्हतं, त्यामुळें ती कांहींशी अतृप्त होती हें उघड होत. तिच्या त्या असमाधानाचा पूर्ण फायदा आपल्याला घेतां येईल हें शिवरामनं ओळखलं होतं. पंधरा

दिवस त्यानं योग्य संधीची वाट बघितली होती. शेवटी काल रात्री त्याचा बेत सिद्धीस गेला होता....आतां ती त्याच्या जाळ्यात पुरती सांपडली होती. हळूहळू तिचं मन वळवून तिला घरातून काढून पळवून नेणं फारस अवघड नव्हतं. रंगाचा सारा लौकिक, अभिमान, आणि सुख नष्ट करण्यांत यश मिळालं तर शिवरामच्या मनातला भावाविषयीचा द्वेष सतुष्ट होणार होता....

हा द्वेष फार जुना होता. त्याचीं पाळंमुळं फार खोल होती.

शिवराम आणि रंगराव याचा बाप ते दोघे लहान असतांनाच वारला. त्या दोघांना लहानाचं मोठं केल त्याच्या चुलत्यानं —गणोजीन. गणोजीची मोठी शेती आणि सावकारी होती. गावचं पुढारीपणहि त्याच्याकडे होतं. त्याला मूलबाळ नव्हतं. भावाचे दोन्ही मुलगे त्यानं आपलेच समजून सभाळले. लहानपणापासूनच दोघा भावाच्या स्वभावात अतर दिसू लागलं. रगा सरळ वृत्तीचा, उद्योगी, समजूतदार व आज्ञाधारक होता. उलट शिवरामचा सारा कल उनाडक्या करण्याकडे होता. त्याच्या हजार कागाळ्या गणोजीकडे येत. त्यानं त्याला बोलून पाहिल, मारून पाहिलं, पण तो कांहीं सुधारला नाही. शेवटी गणोजीन त्याला घरांतून हांकून दिलं. त्या वेळीं शिवराम सुमारें अठरा वर्षांचा असेल. तो कुठे गेला, काय करतो, याची गणोजींनी कधी विचारपूस केली नाहीं. आपल्या भावाचा एक मुलगा चांगला निघाला व दुसरा मुलगा उडाणटप्पू निघाला याचं त्यांना फार वाईट वाटे. परतु त्याला सुधारण ब्रह्मदेवाच्याहि हाती नाहीं याबद्दल त्याची खात्री पटली होती. त्यांनी त्याचं नाव टाकून दिलं होतं.

—आतां बारा वर्षांनंतर शिवराम गांवीं परत आला होता. एका नाटक कंपनीबरोबर. कंपनीचा मॅनेजर म्हणून. मध्यंतरी गणोजी वारले होते. त्यांनीं आपली सारी इस्टेट रंगाच्या नावानं करून दिली होती. एक चांगली मुलगी पाहून त्याचं लग्नहि लावून दिलं होतं. नातवंड पहाण्याची त्यांना फार इच्छा होती. परंतु तेवढी इच्छा अपुरी राहिली होती.

चुलत्यानं सगळी इस्टेट रंगाला दिली, आपल्याला पैदेखील ठेवली नाहीं, मरतांना आपली आठवणदेखील काढली नाही, याची शिवरामला मनस्वी चीड वाटली होती. आपल्या गांनींच चुलत्याचं प्रेम आपण घालविलं हा

विचार त्याला वास्तविक सुचायला हवा होता. परंतु शिवरामसारख्या माणसांना तो सुचत नाहीं. आपल्या भावाचे चुलत्यानं फार लाड केले व आपल्याशीं मात्र चुलता फार दुष्टाव्यानं व अन्यायानं वागला असंच शिवरामला वाटलं.

मेलेल्या चुलत्याचं कोणतं पारिपत्य तो करूं शकणार होता? परंतु थोरल्या भावाचा कांहीं तरी सूड त्याला घेतां येण्यासारखा होता. त्याला चुलत्याकडून मिळालेल्या इस्टेटीचा वाटा मागणं शक्य नव्हतं. परंतु त्याचं कांही तरी वाईट करणं शक्य होतं खचित.

नाटक कपनीबरोबर शिवराम गांवीं आल्यावर त्याला लवकरच समजलं की रंगा चुलत्याच्या कृपेनं श्रीमंत तर झाला आहेच, परंतु शिवाय त्याचा लौकिक आणि मानसन्मान मोठा आहे. बायकोशीं तो सुखानं संसार करीत आहे. लग्न होऊन आठ वर्षं झालीं तरी अंबूला मूल झालं नव्हतं, एवढीच काय ती त्यांच्या समाधानांत उणीव होती. नाटक कंपनीच्या बिऱ्हाडीं गप्पा आणि चहा झोडावयासाठी गांवांतले लोक येत, ते सारे रंगाच्या मोठेपणाच्या गोष्टी सागत. त्या ऐकतांना शिवराम वरकांती मोठा हर्ष झाल्याचं दाखवी. मनांत मात्र त्याचा द्वेष उसळे, आणि तो स्वतःशीं म्हणे, 'नाहीं लवकरच रगाच्या तोंडाला काळं फासलं तर नांवाचा शिवरामच नव्हे!'

तो भावाच्या घरीं प्रथम गेला तेव्हां म्हणाला, "मला आलेला पाहून तुला आनंद न होणं साहजिक आहे. तुला वाटत असेल, कशाला ही ब्याद पुन्हा आली."

रंगानं दोन्ही हात त्याच्या खांद्यावर ठेवले व त्याला लोडाशीं बसवीत तो म्हणाला, "असं बोलूं नकोस. बारा वर्षांनी भेटलास. फार आनंद झाला मला. तुझी तब्येत कशी आहे सांग."

शिवराम हंसला आणि म्हणाला, "तब्येतीच्या गोष्टी सांगण्यापूर्वीं ज्या कामासाठीं आलों आहें तें आधीं सांगूं दे."

"सांग."

"मी तुझ्याकडे आलों आहे तो केवळ तुझा भाऊ म्हणून नाहीं, तर नाटक कंपनीचा मॅनेजर म्हणून. पहिला खेळ तुझ्या अध्यक्षतेखालीं करायचं ठरविलं आहे. आतां तं फार मोठा पुढारी झाला आहेस ना! कदाचित् तूं

नकार देशील. पण माझा तुझ्यावर स्पेशल हक्क आहे. माझं आमंत्रण तुला स्वीकारलंच पाहिजे. उद्यांच्या पहिल्या खेळाला अध्यक्ष होशील ना ? "

" तुला मी नाहीं म्हणेन काय ? "

" थँक्स. माझं मोठं काम झालं ? "

" काम झाल ? मग आतां आंत घरांत चल. " रंगानं त्याला उठवून आंत नेल, आणि माजघरांत गेल्यावर त्यानं बोयकोला हांक मारली, "अबू ! ए अंबू ! बाहेर ये. तुझे धाकटे भावोजी आले आहेत. नमस्कार कर त्यांना. "

डोक्यावरचा पदर सांवरीत पुढें येऊन दाराच्या चौकटीत अंबू उभी राहिली. शिवरामची आणि तिची पहिली दृष्टादृष्ट झाली ती अशी. त्या दालनांत उजेड बेताचाच होता. परंतु तेवढ्या उजेडांत तिचं रूप सामान्यच आहे हें जसं शिवरामच्या लक्षात आलं त्याप्रमाणेच तिचा सुंदर बांधा, उत्तम तब्येत आणि तारुण्याची कोवळी टवटवी त्याच्या नजरेनं टिपली. ती वांकून त्याला नमस्कार करूं लागली तेव्हां तो म्हणाला, " हें काय ? मला कसला नमस्कार करतेस ? रंगाचा धाकटा भाऊ आहे मी. "

त्याचं न ऐकतां तिनं नमस्कार केला. ती हसली व क्षणभर उभी राहिली. मग ती म्हणाली, " फराळ केल्याशिवाय जायचं नाहीं बरं कां ! चहा करूं की कॉफी ?

ती स्वैंपाकघरांत जायला वळली त्या वेळेस तिची पाठमोरी आकृति शिवरामला फार मोहक वाटली. तिचा चेहरा साधासुधा होता, परंतु तिची अंगलट भरदार आणि रेखीव होती. आणि अधिक महत्त्वाची गोष्ट ही, होती की ती रंगाची बायको होती. तिच्याकडे पाहतां पाहतां शिवरामनं निश्चय केला, की एक दिवस हिला आपल्या मिठीत धरावयाची....

काल रात्री त्याचा तो हेतु पूर्ण झाला होता. अंबूच्या मिठीत त्यानं सुखाच्या घटका काढल्या होत्या. तिच्यापासून जें समाधानाचं सुख त्यानं लुटलं होतं तें तर त्याच्यासारख्या ऐन जवानींतल्या पुरुषाला संतुष्ट करणारं होतंच, परंतु शिवाय रंगाच्या बायकोला आपण बिघडविली, आणि आपलीशी केली याचा शिवरामला अधिक हर्ष होत होता. त्या हर्षानं त्याचं अंतःकरण या घटकेला भरलं होतं. वाऱ्याची गार झुळुक

अंगावर घेत, मधूनच माथ्यावरच्या चांदण्यांच्या थव्याकडे बघत तो चालला होता, आणि मनांतल्या मनांत पुढचे बेत करीत होता. अबूला घरातून काढून पळवून नेल्याशिवाय त्याच्या मनाचं खरं समाधान होणार नव्हतं.

दुपारीं जेवण आटोपल्यावर अंबूकडे जाण्याची त्याला फार इच्छा झाली. रात्रीं उपभोगिलेल्या सुखाची त्याला तीव्रतेनं आठवण झाली आणि तें आता पुन्हा घेण्याची विलक्षण आतुरता त्याला वाटली. रंगाला दु:खी करून त्याच्यावर सूड उगविण्यासाठी अबूला त्यान वश केली होती, परतु मनातला तो हेतु सोडला तरी अंबूच्या समागमाचं सौख्य विशेष होतंच. तें मिळेल तितकं घ्यावं असं शिवरामला वाटलं तर त्यांत नवल नव्हत. जें रात्री घेतलं तें आतांही घेतां येईल याची शिवरामला खात्री होती. अंबूकडे धांव घेण्याची त्याला फार इच्छा झाली; परंतु त्यानं आपलं मन आवरलं. आपल्या खोलींतच तो निजून राहिला. तिसरा प्रहर उलटून गेल्यावर मात्र तो अंबूकडे गेला. पुढच्या ओटीवरच एका खांबाला टेकून उभी असलेली ती त्याला दिसली. त्या क्षणी त्याच्या नजरेला ती फार मोहक भासली. ओटीच्या पायऱ्या चढतां चढतां त्यानं हंसून विचारलं, " काय चाललंय् ? "

तिनं उत्तर दिलं नाही. ती हंसलीहि नाहीं. उलट ती फणकाऱ्यानं आंत निघून गेली. शिवराम तिच्या मागोमाग गेला. उजव्या अंगाच्या निजावयाच्या खोलीत शिरून ती दार लोटू लागली तेव्हां शिवरामनं तिचा हात धरला आणि म्हटलं, " हें काय ? "

रागाचा चेहरा करून अंबू म्हणाली, " हात सोडा माझा. माझं डोकं फार दुखतंय्. मी घटकाभर पडणार आहे. जा तुम्ही ! "

शिवराम म्हणाला, " माणसाचं स्वागत करण्याची ही काय रीत झाली ? "

" तुमची तरी ही काय रीत झाली ? "

" मीं काय केलं ? "

" कांहीं नाहीं हो. माझाच वेडेपणा ! "

" म्हणजे काय ? नीट सांग. "

" मला वेडीला आपलं वाटलं होतं, दुपारचे याल. मी घरांत एकटी असेन हें तुम्हांला माहीत नव्हतं ? किती वाट पाहिली मी तुमची. सोडा मला. तुमच्या नादीं उगीच लागलें मी ! "

" अंबू ! " त्यानं हाताची मिठी घालून तिला जवळ ओढलं.

त्याबरोबर तिची वृत्ति पालटली. तिनं त्याच्या खांद्यावर डोकं टेकलं आणि ती रडूं लागली.

तें पाहून शिवरामला फार आनंद झाला. ज्या हेतूनं दुपारीं यावंसं वाटूनहि तो तिच्याकडे आला नव्हता, तो त्याचा हेतु पुरा झाला होता. ती आपली खरोखरच वाट पहाते की नाही हे त्याला बघायचं होतं. तिनं वाट बघितली होती. आणि आतां त्यानं तिला मिठीत घेतल्याबरोबर सारा राग विसरून ती रडत होती. सर्वस्वी प्रेमाच्या आधीन होऊन शरण आलेल्या कामातुर स्त्रीप्रमाणें ! शिवरामच्या दुष्ट मनांत आलं, आतां ही पूर्णपणान माझी झाली खचित. आणखी थोडे दिवस हिला सुखाची चटक लावली की नवऱ्याच घर सोडायला ही फारसे आढेवेढे घेणार नाही.

नंतरच्या दिवसात अबूची लंपटता आणखीच वाढली. शिवराम तिच्या नादी लागला म्हणण्यापेक्षा तीच त्याच्या नादी अधिक लागली होती. रंगाच्या गैरहजेरीची एकदेखील संधि तिनं वाया जाऊं दिली नाही. रात्र दिवस असा फरक तिन होऊ दिला नाही. एकदा शिवराम तिला म्हणाला, " आता चार दिवसानी मी जाणार. "

तिचा चेहरा एकदम चकित आणि दुःखी झाला. तिनं विचारलं, " म्हणजे ? हें काय सागतां ? "

" कपनीचा मुक्काम हलणार ना. मग जायला नको मला ? "

तिच्या डोळ्यांत पाणी तरारलं. ती म्हणाली, " आणि मी काय करूं? "

काही बोलण्याऐवजी त्यानं फक्त तिचा मुका घेतला.

तिनं त्याचं तोंड दूर लोटलं आणि विचारलं, " मला टाकून जाणार तुम्ही ? तुमच्यावांचून जिवंत-तरी राहीन का मी ? " ती हुंदके देऊन रडू लागली.

शिवरामला मनांतल्या मनांत फार समाधान झालं. याच घटकेची तो वाट बघत होता. तिला कुरवाळतां कुरवाळतां तो म्हणाला, " तुला टाकून

जाणं सुखाचं का होणार आहे मला ? "

" मग जातों कसं म्हणतां ? मी काय करूं ? "

त्यानं तिला अगदीं जवळ घट्ट धरली आणि विचारलं. " माझी एक गोष्ट ऐकशील ? "

" म्हणाल तें ऐकेन. "

" बघ हं ! नाहीं म्हणशील– "

" बघितलं. सांगा काय करूं ? "

आपल्या नजरेनं तिची नजर खिळवून धरूत तो हळू आवाजांत तिला म्हणाला, " माझ्याबरोबर चल. सोड हें घर. "

त्याचे ते शब्द ऐकल्याबरोबर अंबू धसकली. तिनं आपली छाती दोन्ही हातांनी दाबून धरली, खालचा ओंठ दातांखालीं दाबला, डोळे भ्याल्यासारखे केले, मान जोरजोरानं हालवीत ती अगदीं स्तब्ध राहिली. मग पुन्हा मान हालवीत ती म्हणाली, " छे ! छे ! तें शक्य नाहीं ! "

ती चटकन् हो म्हणेल अशी शिवरामनं अपेक्षा केली नव्हतीच. किती झालं तरी ती रंगाची बायको होती. त्याच्याबरोबर तिनं आठ वर्षं संसार केला होता, हें शिवरामला कळत होतं. वासनेच्या आहारीं जाऊन त्याच्यावर भाळून पतिव्रतेचं इमान तिनं सोडलं होतं. परंतु घर सोडण्याची कल्पना तिला सहज पटण्यासारखी नव्हती. तिच्या मनावर कित्येक वर्षं जे संस्कार झाले होते ते त्या कल्पनेनं हादरून जाणंच साहजिक होतं. आपण ' चल ' म्हटल्याबरोबर ' ठीक आहे, येतें ' असं ती म्हणेल असा शिवरामचा अंदाज नव्हताच.

पण तिचा तो विरोध कसा घालवायचा याचा विचार शिवरामनं आधींच करून ठेवला होता. नवऱ्याला सोडून घरांतून कायमच उठून जाण्याचं अंबूला भय वाटत होतं हें जसं खरं, त्याचप्रमाणें आपण ज्या सुखाची तिला चटक लावली तें सुख कायमचं हातचं जाऊं देतांना तिचा जीव कासावीस झाल्यावांचून रहाणार नाहीं, हें शिवरामला उघड दिसत होतं. आठ वर्षं ज्याच्याशीं संसार केला त्या नवऱ्यापेक्षांहि ज्यानं चोरटया परंतु उच्छृंखल प्रेमाची अवीट गोडी तिला दाखविली, त्या धाकटया दीरावर तिचा जीव अधिक जडला होता. पतीपेक्षां प्रियकर तिला अधिक प्यार होता. त्याला कायमचा

दूर जाऊं देण्यास ती सुखासुखी तयार होईल असा सभव नव्हता. घरांतून उठून गेल्यावर होणाऱ्या दुर्लौकिकाची भीति, आणि प्रियकरावाचून एकटं निष्प्रेम आयुष्य कठण्याची भीति – या दोन भीतीतला लढा अंबूच्या मनांत सुरू होणार हें शिवरामला ठाऊक होत. त्याच्या बेताला तिचा रुकार ताबडतोब मिळणं शक्य नव्हत, परतु तो मिळविणं त्याला कठीण वाटत नव्हतं, आणि तो मिळविण्यासाठी काय केल पाहिजे, काय बोलल पाहिजे, कसं वागलं पाहिजे, हें त्याला कुणी सांगायला नको होतं.

त्यामुळें अंबूचा विरोध त्यान अखेर जिंकला. आपल्या बेताला त्यानं तिची समति मिळविली.

जिल्ह्याच्या गावी मोठ्या प्रमाणावर शेतकी प्रदर्शन भरणार होतं. त्यांत रंगराव पुष्कळच गुतणार होता. त्याची घरी गैरहजेरी होणार होती. शिवरामबरोबर निघून जाण अबूला अगदी सहज शक्य होणार होतं. कंपनीचा मुक्काम रविवारी हालणार होता. शिवरामनं मालकाकडून महिन्याची रजा मिळविली होती. कपनी मुक्काम करीत करीत साताऱ्याला पोंचणार होती, तेव्हा तो कामावर परत रुजू होणार होता. कपनीचे पडदे व इतर सामानसुमान घेऊन एक माल मोटार रविवारी पहाटेच सुटणार होती. माणसं दुपारच्या मोटारनं जाणार होती. शिवराम त्याच्याबरोबर जाणार नव्हता. मागे रहाणार होता. त्यानं एक स्वतंत्र टॅक्सी ठरविली होती. रविवारी रात्री तो अबूकडे जाणार होता. तिला घेऊन तो निघणार होता. गांवांतल्या मुख्य वस्तीपासून दूर असलेल्या राम–मंदिराच्या पटांगणांतल्या झाडाखाली वाट बघत थाबण्यास त्यानं मोटारवाल्याला बजावलं होतं. अंबूला घेऊन तिथपर्यंत तो चालत जाणार होता. मग मोटारींत बसून तिच्यासह बेळगावला जायचं त्यानं ठरविलं होतं.

रविवारी चार वाजतां कंपनीची सारी माणसं मोटारीतून निघून गेलीं. बिऱ्हाडाच्या जागीं शिवराम एकटाच राहिला. त्यानं आपलं सारं सामानसुमान बांधून तयार ठेवलं होतं. रात्र केव्हां पडते याची वाट पाहण्याखेरीज त्याला दुसरा उद्योग नव्हता. त्याचा तो रिकामा वेळ जातां जाईना. त्याचं सारं चित्त अंबूकडे होतं ..... कालची रात्र त्यानं अंबूच्या सहवासांत काढली होती. साऱ्या रात्रभर एकमेकाना बिलगण्याखेरीज आणि आपल्या साहसी

बेताची पुनः पुन्हा उजळणी करण्याखेरीज दुसरं कांहींच त्यांनीं केलं नव्हतं. अंबूचा सारा विरोध आतां नाहींसा झाला होता. तिचं भय संपलं होतं. शिवरामबरोबर पळून जाण्याचा तिचा विचार आतां पक्का झाला होता. तिच्या शंका-कुशंका सरल्या होत्या. सुखाचेच मनोरथ ती रचीत होती. रात्रीं अगणित वेळां तिनं शिवरामला मिठी घालून विचारलं होतं,

"मी तुम्हांला फार आवडतें ?"

प्रत्येक वेळेस शिवरामनं तिचा मुका घेतला होता व उत्तर दिलं होतं, "होय."

"नुसतं होय नका म्हणू !"

"मग काय करूं ?"

"किती आवडतें तें सांगा."

"खूप खूप !"

"माझा कधीं कंटाळा येणार नाही तुम्हांला ?"

"छट् !"

"मला कधीं टाकून देणार नाही ना तुम्ही ?"

"भलतंच काय विचारतेस ?"

"तुम्हां पुरुषांचा काय नेम ? कांही दिवस मी तुम्हांला हवीहवीशी वाटेन; पण मग नकोशी झालें की मला खुशाल दूर लोटाल. तसं केलंत की माझी अवस्था कुत्रा खाणार नाहीं–" तिला एकदम हुंदके आले. रडत ती म्हणाली, "तुमच्यावर सर्वस्वी विश्वास टाकून घर सोडायला निघालें आहे मी–"

शिवरामनं तिला छातीशीं घट्ट धरलं आणि म्हटलं, "अंबू ! तुला कधीं अंतर देणार नाहीं मी."

"माझ्या गळ्याची शपथ घ्या."

"तुझ्या गळ्याशपथ."

तिचे हुंदके एकदम थांबले. तिच्या गळ्यांतून हसूं फुटलं. त्याचा मुका घेऊन ती म्हणाली, "माझे शिवराम ! माझे लाडके शिवराम !"

त्या वेळच्या तिच्या मिठीचं सुख किती अपूर्व होतं. तें घेतांना शिवरामच्या मनाचा दुष्टपणा लोपला. गोड गोड बोलण्याच्या जाळ्यांत तिला पकडण्याचा

प्रयत्न शिवरामनं सुरू केला तेव्हां फक्त तिला वश करून घरांतून काढण्याचा त्याचा हेतू त्याच्या मनात होता. रंगाच्या प्रतिष्ठेवर आणि सुखावर त्याला घाव घालायचा होता. त्यासाठी रंगाची बायको त्याला हवी होती. थोरल्या भावावर घाव घालायचं साधन, एवढ्याच दृष्टीन ती त्याला हवी होती. मनान तो गुतलेला नव्हता. इतकच नव्हे तर तिच्यापासून मिळणाऱ्या शरीरसुखाची चटक आपल्याला फारशी लागेल असहि त्याला वाटलं नव्हतं. परतु आतां त्याला आढळून आलं होतं की नाकाडोळ्यानीं फारशी चांगली नसलेल्या अबूच शरीर म्हणजे सुखाची खाण होती. तिची कामवासना अनावर होती. रतिसौख्याच्या घटकेला पुरुषाला तृप्ति देण्याच्या साऱ्या तऱ्हात ती निष्णात होती. तिच्यापासून मिळणाऱ्या सुखाची त्याला आतां अमर्याद चटक लागली होती. आणि त्यामुळे मनानदेखील तो तिच्या ठिकाणी पुरता गुतला होता. त्यामुळे तिन मागितल्याबरोबर त्यानं गळयाची शपथ दिली त्या वेळी त्याच्या मनात प्रतारणा बिलकुल नव्हती. त्यानं तिला ओढून मिठीत धरली तेव्हां तो अगदी मनापासून म्हणाला, " माझी अंबू ! माझी लाडकी अंबू ! "

मात्र त्या वेळेसहि प्रेम करताना त्याच्या मनाला हर्ष झाला होता तो या विचारानं, की थोरल्या भावावर जो घाव आपल्याला घालायचा आहे त्याची पूर्ण तयारी झाली.

आता नाटक कपनीच्या बिऱ्हाडी रात्र पडण्याची वाट बघत तो बसला होता तेव्हांदेखील अबूसारखी स्त्री आपल्याला कायमची मिळाली या विचारापेक्षां त्याच्या मनांत जो विचार अधिक येत होता तो हा, कीं रंगावर सूड घेण्याचा आपला हेतु साधणार. उद्या अबूनं घर सोडलेलं असेल. रंगा जेव्हां परत येईल तेव्हां ती गेल्याचं त्याला आढळून येईल. रंगराव सुर्व्यांची बायको घरांतून पळून गेली याचा बोभाटा व्हायला वेळ लागायचा नाहीं. साऱ्या गांवांत, साऱ्या जिल्ह्यात, लोक म्हणूं लागतील ' अंबू छिनाल निघाली, घरांतून उठून गेली. रंगरावाला तिला संभाळतां आलं नाहीं. असला कसला दुबळा दादला ? लग्नाची बाईल ताब्यांत ठेवतां येईना आणि गांवचे कारभार उपसतोय् ! थूः त्याच्या मोठेपणावर ! आठ वर्षांत मूलबाळ झालं नाहीं, आणि आतां तर काय बायकोच कुणाचा हात

धरून नाहींशी झाली ! ....' बदलौकिकाच्या या घावानं रंगा घायाळ होणार होता. जें जें रंगरावाला मिळालं होतं आणि शिवरामला मात्र मिळालं नव्हतं त्याची फिटंफाट होणार होती.

अखेर दिवस बुडाला. रात्र पडली. जिकडे तिकडे दिवे लागले. मग मात्र खोलीत बसून राहणं शिवरामला अशक्य झालं. त्यानं ठरविलेली भाड्याची मोटार वेळेवर आली. शिवरामनं आपलं सामान मोटारीत घातलं. राम-मंदिराच्या पटांगणांत वाट बघण्याबद्दल त्यानं ड्रायव्हरला बजावलं. गाडी फर्रर्र आवाज करीत निघून गेली, आणि शिवराम रंगाच्या घराकडे निघाला. त्याची खात्री होती की, अंबू त्याचीच वाट बघत असेल. चालतां चालता तो मनाशी म्हणत होता, आता फार तर अर्ध्या घटकेचा अवकाश, अबूला घेऊन आपण बेळगावच्या वाटेला लागलेले असूं.

रंगरावाच्या घरापुढे गर्दी जमलेली पाहून त्याला चमत्कार वाटला. कशासाठी हे इतके लोक या वेळेस इथ जमलेले असावेत ते त्याला कळेना. तो गर्दींत घुसला आणि लोकांना विचारूं लागला, " काय, झालं काय ? " कुणी तरी त्याला सागितल, " रंगराव सुर्वे मेला नव्ह काय ! " तें सागणाऱ्या माणसाला शिवरामन गदगदा हालविल आणि विचारलं, " काय, म्हणतां काय ?" तो इसम म्हणाला, " खोटं सांगतों काय ? घटकेपूर्वींच रगरावाचं प्रेत गाडीतून आणलं लोकानी. प्रदर्शनाच्या जागी मोठा अपघात झाला म्हणे ! " शिवराम म्हणाला, " अपघात ? सांगा तरी सारी हकीकत."

आजूबाजूच्या चार लोकांनीं मिळून ती हकीकत शिवरामला सांगितली. प्रदर्शन भरायला अजून दोन दिवसांचा अवकाश होता; तिसऱ्या प्रहरी वादळ झालं होतं. सोसाट्याचा वारा सुटला होता. छपराचे कांहीं पत्रे उसकटले जाऊन उडाले होते. त्यांतला एक पत्रा भिरभिरत येऊन रंगरावाच्या डोक्यावर धडकला होता. त्याच्या कवटीची उजवी बाजू पार चिरली गेली होती. त्याला जागच्या जागीं मरण आल होतं. ....." काळानं कशी झडप घातली बघा ! आणि कुणावर ? तर साऱ्या जिल्ह्यांतल्या लोकांना जो प्राणाहून प्यार त्या रंगरावावर ! देवाच्या घरीं न्याय आहे असं कसं म्हणायचं सांगा ? "

तितक्यांत घरांतून रडारडीचा कल्लोळ ऐकूं आला.

गर्दीतले लोक म्हणाले, "शेजारणीपाजारणी येत आहेत अंबूची समजूत घालायला. नव्या बाया आल्या की पुन्हा मोठी रडारड सुरू होते. ऐकलात अंबूचा हंबरडा ! तिची समजूत कोणी कशी घालायची ? कपाळच फुटलं बिचारीचं ! मूल नाहीं, बाळ नाहीं; आणि आतां रंडकी झाली. नवरा-बायकोचं फार प्रेम एकमेकावर ! हें प्रेमळ आणि सुखी जोडपं म्हणजे आमच्या गावचं भूषण होतं."

ते शब्द शिवरामला ऐकवेनात.

त्याच्याशीं बोलणाऱ्या माणसांना त्यानं जोरानं ढकलून दिलं. गर्दीतून वाट काढीत तो पुढे झाला आणि घरात शिरला.

आंतहि लोकांची गर्दी होतीच. तो पुढें झाला नाही. लोकांच्या दाटीतच उभं राहून टांचा उंचावून त्यान डोकावून पाहिलं.

नवऱ्याच्या प्रेताला कवटाळून अबू त्याच्या अंगांवर पडली होती, आणि हंबरडा फोडून ओरडत होती, "मला टाकून कसे गेलात हो ! इतकी माया केलीत आणखी शेवटी अस फसविलंत मला. आतां मी कोणाच्या तोंडाकडे बघूं ? जिवंत कशी राहूं !" बायका तिला प्रेतापासून दूर करीत होत्या. 'अबू, वेडी का तू ?' 'किती रडशील बाई ?' 'फार जीव होता पोरीचा नवऱ्यावर आणि देवानं तिला रंडकी केली !' असे उद्‌गार त्यांनी काढले. तिला जवळ धरायसाठी उठविण्याचेहि यत्न केले. पण अबू त्यांना झिडकारीत होती आणि रडण्याचे हेल काढीत ओरडत होती, "मी नाही सोडायची यांना ! कधी नाही सोडायची !"

तो प्रकार पाहून शिवराम हतबुद्धच झाला !

अंबूचं नवऱ्यावर प्रेम नव्हतं, तें आपल्यावर होतं, ही त्याची कल्पना पार ढांसळून पडली ! तिनं त्याला ऐन प्रेमाच्या घटकेलासुद्धां कधीं घातली नसेल अशी घट्ट मिठी तिनं नवऱ्याच्या मृत शरीराला घातलेली त्याला दिसत होती. मत्सरानं काळीज चिरल्यासारखं शिवरामला वाटलं. रंगाची बायको त्याला आपलीशी करतां आली नव्हती. ती अजूनहि रंगाचीच होती! रंगा जिवंत असतांना होती त्यापेक्षांहि तो मृत झाल्यानंतर आतां ती अधिकच पूर्णपणानं रंगाचीच होती ! आपण रंगावर घाव घातला ही

कल्पना म्हणजे केवळ आपला वेडा भ्रम होता असं शिवरामला वाटलं ! अंबूबरोबर त्यानं जो एकांत अनेकदां केला होता, तिच्या शरीराशी जी क्रीडा केली होती, ती सारी कवडीमोलाची त्याला वाटली ! ती एक थट्टा झाली ! ती मनान अजून नवऱ्याचीच होती ! आणि शरीरानंसुद्धां ! आणि तिचं मन किंवा शरीर कांहीचं आता शिवरामला नकोसं झालं ! त्याची आसक्ति एकदम संपली ! जें मिळालंसं त्याला वाटलं होत तें त्याला मिळालेलं नव्हतं. आणि आतां तें मिळविण्याची इच्छाहि त्याच्या मनात उरलेली नव्हती ! ....

अंबूला घरातून काढून पळवून नेण्याची त्याची उत्सुकताहि आतां संपली ! त्या पळवून नेण्याला आतां अर्थ कुठें उरला होता ? मानहानीचा आणि बदलौकिकाचा घाव रगावर आतां थोडाच पडणार होता ? तो फार दूर गेला होता ! जिथे असले घाव पोंचत नाहीत तिथें ! ....सूडाचं फळ पिकलं आणि आतां अगदी हाताशी आलं असा हर्ष ज्या शिवरामला दोन घटकापूर्वी झाला होता, त्याच शिवरामला आतां कळून चुकलं की, त्या रसरशीत गोड फळाची एका क्षणांत राखुडी झाली आहे !

लोकांच्या त्या दाटींत तो थोडा वेळ उभा राहिला. कुणी आपल्याला बघण्यापूर्वींच इथून जायला हवं असं त्याच्या मनांत आलं. खालीं मान घालून तो दूर झाला. घराबाहेर पडला. रस्त्यावरच्या गर्दीला वळसा घालून तो चालू लागला !

# ३ . . . . . उद्यांची बात

खोलीच्या दारांत डोकावून सदाशिवची आई म्हणाली, "सदा ! अरे जेवायला चलतोस ना ? वाट बघते आहे मी."

सदाशिवनं अंथरुणाच्या उशीत झाकलेलं डोकं वर उचललं नाहीं, उत्तर दिलं नाहीं.

त्याची आई म्हणाली, "चल ऊठ. अन्न बघ निवून जात ना."

"मला जेवायचं नाहीं. तूं जेवून घे."

"म्हणजे रे काय ? ' असा उद्‌गार काढून सदाची आई त्याच्या जवळ आली. तिच्या मनांत आलं, अंथरुणांत असं मुसमुसत पडायला या मुलाला काय झालं ? कित्येक दिवसांच्या प्रयत्नानंतर पोस्टांतली नोकरी याला काल लागली. आज सकाळी उठून चागला आनंदानं हा कामावर गेला. आणि आता हा अथरुणात पडून राहिला आहे आणि जेवायचं नाहीं म्हणतो ! याचा अर्थ तरी काय ? नोकरीचा पगार पस्तीस रुपये होता, पण भत्ता-बित्ता सर्व मिळून चांगले शंभर रुपये महिना मिळणार होते. नोकरीचा हुकूम आल्याबरोबर सदाच्या वडिलानी आनंदानं पेढे वाटले होते. स्वतः सदादेखील मोठ्या हर्षानं साऱ्या लोकाना सांगत सुटला होता, 'मला नोकरी मिळाली'. आज सकाळीं लवकर उठून ताजी दशमी खाऊन व चहा पिऊन तो पोस्टांत गेला तेव्हां तो किती आनंदांत होता. आणि आतां उशींत तोंड खुपसून पडला आहे आणि म्हणतो जेवायचं नाहीं ! चमत्कारच आहे म्हणावयाचा ! ....

तिनं त्याच्या अंगावरून मायेनं हात फिरवला आणि म्हटलं, "ऊठ, ऊठ. जेवायला चल. कामानं दमला असशील. जेवलास कीं बरं वाटेल."

सदानं उताणं होऊन आईकडे पाहिलं. त्याला वाटलं तिला सांगावं,

' अग आई, मी शरीरानं दमलों नाहीं. मनानं जखमी झालों आहे. शरीर-कष्ट काय वाटेल तितके आनंदानं करीन मी. ते करायला माझी तयारी होती, आणि आहे. पण या नोकरीत जें काम मला करावं लागणार आहे तें कसं करूं ? मला त्यांत फारच मानहानी वाटते ' .... परंतु आईला हें सांगण्याचा विचार त्याने लगेच बदलला. तिला तें सांगण्यांत काही अर्थ नव्हता. जें त्याला वाटत होतं तें तिला समजण्यासारखं नव्हतं — कुणालाच समजण्यासारख नव्हतं. आणि कुणाला सांगण्यांत कांहीं फायदा नव्हता. त्याच्या अंतर्यामीच्या जखमेवर त्याचा त्यानंच विचाराचा फुंकर घालायला हवा होता. तो घालण्याचा प्रयत्न तो सारखा करीतही होता. परंतु त्या फुंकरानं दु:ख थांबत नव्हत, उलट वाढतच होतं. पोस्टांत जें काम त्याला सांगण्यांत आलं होतं, आणि मनातली सारी चीड गिळून जें त्यानं आज सकाळीं पांच तास केलं होतं, त्या कामाची त्याला मनस्वी लाज वाटत होती. हें असलं काम करण्यापेक्षा बेकार राहिलेलं पुरवलं असं त्याला वाटत होतं....

त्याच्या तोंडावरून हात फिरवीत आईनं पुन्हां विचारलं, " दमला आहेस काय फार ? "

" हुं. "

" मग जेव म्हणजे बरं वाटेल. तुझं आणि माझं दोघांची ताटं घेतलीं आहेत मी. चल, ऊठ."

सदानं विचार केला आईला त्रास देण्यांत कांही अर्थ नाही. त्यानं दोन्ही हातानी चेहरा चोळल्यासारखा केला आणि अंथरुणावरून उठत तो म्हणाला " चल. " त्याची आई हंसली आणि चालूं लागली. तिच्या मागोमाग तो सैंपाकघरांत गेला. नेहमींप्रमाणं आईशी गप्पा–गोष्टी करीत आनंदांत जेवण्याचं मात्र त्याला कांहीं केल्या साधेना. त्याला खुलविण्यासाठीं आई सारखी बोलत होती. परंतु तो फक्त ' हुं हुं ' करीत होता.

जेवण आटोपून तो परत आपल्या खोलींत गेला. पुन्हां दुपारीं दोन वाजता पोस्टातल्या ड्यूटीवर त्याला जायचं होतं. तोंपर्यंत तो स्वस्थ पडून राहाणार होता. त्यान अंथरुणावर अंग टाकल आणि डोळे मिटले. आतां मघांप्रमाणें त्याला रडू आलं नाही. परंतु ज्या विचारांमुळे त्याला मघांशीं रडू आलं होतं ते विचार त्याच्या मनांत पुन्हा घोळूं लागलेच.

....५

'इतका शिकलों–सवरलों आणि आतां हें असल काम करूं ? ' – हें त्याच्या मनात घोळणाऱ्या विचाराच पालुपद होत. पोस्टांत साध्या कारकुनाची नोकरी करावी लागली तर ती करायला तो राजीखुषी होता. परंतु पत्राचा बटवडा करण्याचं काम त्याला सांगण्यांत आलं होतं. 'पोस्टल-प्यून' – 'टपालाचा शिपाई ' हा हुद्दा होता ! अगाला मुळीच न होणारा खाकी गणवेष त्याला देण्यात आला होता ! या नोकरीचे महिना चागले एकशेंदहा रुपये मिळणार होते. परतु ते मिळविण्यासाठी कुणाच्याच अगचा न बेतलेला असा तो गबाळा खाकी गणवेष घालून व सैल होणारी खाकी टोपी डोक्यावर चढवून दिवसातून दोन वेळा शेकडों लोकांची शेकडो पत्रं वांटण्यासाठी त्याला रस्त्यातून व गल्ल्यातून हिंडावं लागणार होत, चाळीच्या जिन्यांची चढउतर करावी लागणार होती. पिल्ले, अय्यर, साळुंके, जगदाळे अशा नांवांचा पुकारा करावा लागणार होता !

– हें काम त्याला फार लाजिरवाणं वाटत होतं. गळचात कातडी पिशवी, हातांत पत्राची भली मोठी चवड, आणि अंगावर टपाल–शिपायाचे कपडे अशा वेषात ओळखीच्या कुणी माणसान आपल्याला बघितल तर तो काय म्हणेल अशा भीतीन आज सकाळी पांच तास तो खाली मान घालून पावलं भरभर उचलीत हिंडला होता ! असच आता रोज दोन वेळां त्याला हिंड़ाव लागणार होत ! तोंड लपवून ! शरमेन कासावीस झालेला जीव मुठीत धरून !....कॉलेजच्या दोन परीक्षा तो पास झाला होता. चंगीभंगीपणाची संवय त्याला लागली नव्हती, परतु साध्याच का होईना पण स्वच्छ परीटघडी कपड्याची हौस त्यान केली होती. प्रतिष्ठित तरुणाच्या रुबाबात तो आजपर्यंत शहराच्या रस्त्यांतून वावरला होता. आणि आतां पोस्टखात्याचा तो खाकी बोंगा पोषाख करून टपालाचा बटवडा करणाऱ्या शिपायाच्या अवतारांत हिंडणं त्याच्या वाट्याला आलं होतं ! यांत भयंकर मानहानी होती ! त्या मानहानीनं त्याच्या काळजाला अगदीं खोल जखम केली होती.

● ● ●

अगदीच स्वप्नाळू स्वभावाची कित्येक तरुण शिकलेलीं मुलं असतात त्यापैकी सदा नव्हता. त्याचं डोकं ठिकाणावर होतं. वस्तुस्थितीच्या मर्यादा

तो ओळखीत होता व मानीत होता. त्याच्या आईबापांना त्याच्या समजूतदारपणाचा अभिमान वाटत असे. त्याला चार बहिणी व एक भाऊ अशीं सहा भावंड होती. त्याचे वडील पेन्शनीत निघाले त्याबरोबर नऊ माणसांच्या त्या कुटुंबावर शक्य तितक्या काटकसरीन रहाण्याचा प्रसंग आला. तो आल्यावर पहिली कुऱ्हाड पडली सदाच्या कॉलेजशिक्षणाच्या खर्चावर. कॉलेज सोडतांना त्याला अतिशय वाईट वाटल, परतु त्यानं तक्रार केली नाहीं. निदान आपल्या पोटापुरते पैसे आपल्याला आतां मिळविले पाहिजेत हें तो उमजला. दहा प्रकारच्या दहा नोकऱ्या त्यानं केल्या, परंतु कुठेंही तीस चाळीस रुपयांच्यावर त्याला पगार मिळाला नाही. शक्यतों सरकारी नोकरी मिळवायला हवी असं त्याला वाटू लागलं. बघितली वर्तमानपत्रांत एखादी सरकारी नोकरीची जाहिरात की टाक अर्ज असा त्यानं सपाटा सुरू केला.

कांही नोकऱ्यांसाठी त्याला मुलाखतीचीं बोलावणीं आली; परंतु तो गेला म्हणजे त्याला आढळून येई की त्या जागेसाठी शेकडों बी. ए. एम्. ए. वाल्यांनी अर्ज केले आहेत. त्या मुलाखतींतून काही निष्पन्न होत नसे. दोन वेळां मुलाखतीत तो पास झाला, पण वैद्यकीय परीक्षेंत गळला. या पोस्टाच्या नोकरीच्या बाबतीतच साऱ्या अडथळ्यांमधून त्यानं यशस्वी रीतीनं उडी मारली. 'जिंकली एकदाची नोकरीची शर्यत' असा आनंद त्याला झाला.

पण त्या आनंदावर आतां नोकरीच्या पहिल्या दिवशीच साफ बोळा फिरवला गेला होता! स्वतःच्या शिक्षणाची मर्यादा सदाला कळत होती. आरामशीर काम आणि भरपूर दाम अशा थाटाच्या नोकरीची त्यानं आशा केलीच नव्हती. नोकरी म्हटली की कष्ट आलेच हें त्याला कबूल होतं. परंतु जें काम त्याला या नोकरीत मिळालं होतं तें त्याला भयंकर लाजिरवाणं वाटत होतं. आजपर्यंत ज्या प्रतिष्ठेनं आपण लोकांत मिरवलों त्या प्रतिष्ठेच्या अगदी चिंध्या उडवणारं हें काम आहे असं त्याला वाटलं. एखादा वाईट गुन्हा करून तो तुरुंगांत गेला असता तर तिथला वेष अंगावर चढवितांना त्याला जितकी खंत आणि किळस वाटली असती तितकीच टपालखात्याचा तो गबाळा खाकी पोषाख घालतांना त्याला वाटली. आजपर्यंत आपण या शहरांत वावरलों कोणत्या ऐटीत, आणि आज आपल्या नशिबांत

आलं आहे हें कोणतं सोंग, या विचारानं त्याच्या जिवाला अगदी असह्य चटके बसले !

भलता स्वप्नाळूपणा त्याच्या स्वभावांत नव्हता. ज्याप्रमाणें तरुण उपवर मुली आपल्याला नवरा कसा मिळेल याची कल्पनाचित्रं रेखाटतात त्याप्रमाणेंच तरुण बेकार मुलगे आपल्याला मिळणारी नोकरी कशी असेल याची स्वप्नं रंगवीत असतात. ती स्वप्न रंगवितांना सदान कधी भडक रंग वापरले नव्हते. बेतानच कुंचला चालविला होता. तथापि त्याची कल्पना होती की आपण आजपर्यंत गरीबीतच का होईना, परंतु ठाकठिकीत व ऐटीनं राहिलो तसंच यापुढेही आपल्याला राहतां येईल अशीच आपल्याला मिळणारी नोकरी असेल.

त्याची स्वतःची वृत्ति चंगीभंगी नसल्यामुळें त्याचे मित्रही तसे नव्हते परंतु रंगेलपणा सोडला तरी अधूनमधून काही ना काही चैन तरुण मुलांना करावीशी वाटतेच. सदा आणि त्याचे दोस्त हॉटेलात जात, एखादा चित्रपट बघत, एखाद्या ठिकाणची सहल काढीत, थोड्या खर्चांत होणारे परंतु ऐटबाज कपडे करीत, केसाची झुलप राखीत, वासाची तेलं लावीत, भांग पाडीत, मसाल्याची पानपट्टी खात, अगदी हद्द म्हणजे क्वचित् कुणी ' पिवळा हत्ती ' ओढीत.

ऐन विशीच्या जवळ आलेल्या गरिबांच्या मुलानी देखील सदा व त्याचे मित्र करीत तशी बेतशीर चैन करावी हेंच योग्य. नवतारुण्याच हें वय आयुष्यांत एकदांच येतं. तरुण मुलानी थोडासा उच्छृंखलपणा करायलाच हवा, नाटकं पहायलाच हवीत, सभासमेलनात भाग घ्यायलाच हवा, मस्ती करायलाच हवी, कथा–कादंबऱ्या गोडीन वाचायलाच हव्यात, आणि बैठक विशेष रंगली तर आपल्या चोरट्या प्रेमप्रकरणांच्या गप्पांचं हितगुज करायला हवं !

सदाच्या मित्रमंडळींत कधीं कधीं असल्या गप्पा रंगत असत. मुलींची चर्चा होत असे. त्याचे कांही मित्र आपल्या प्रेमाचे पराक्रम सांगत असत. गोडबोले नांवाच्या त्याच्या एका दोस्ताचं एका मराठा मुलीवर प्रेम बसलेलं होतं. तो आपल्या प्रेयसीची वर्णनं करी, तिचे फोटो दाखवी, तिच्याशी लग्न करणं किती अवघड आहे त्याचा पाढा वाचून टाकी, आणि मग निश्चयानं

म्हणे कीं, 'करीन तर तिच्याशींच लग्न करीन !' सदाचे मित्र त्याला वारंवार खोदून विचारीत, 'तू कधींच काहीं सांगत नाही हें रे काय ? तुझं नाहीं का एखाद्या मुलीवर प्रेम बसलेलं ?' परतु सदा फक्त हसे, गप्प बसे.

आपल्या प्रेमप्रकरणांची वाच्यता ही मुलं कशी करतात याचं त्याला आश्चर्य वाटे. कधी कधी तो स्वतःशी म्हणे, उघड सांगायची लाज वाटते ही कदाचित् माझीच चूक असेल. प्रेम करणाऱ्यान निकटवर्ती मित्रांजवळ त्याबद्दल प्रौढी मिरवावी हेंच कदाचित् साहजिक असेल. परंतु त्याला स्वतःला तें साधत नसे एवढ खर. त्याला लाज वाटे. शशिकलेच्या नांवाचा उच्चार मित्राजवळदेखील करण्याचा त्याला सकोच वाटे. शशिकलेविषयी आपल्या मनात ज्या भावना आहेत त्या पवित्र आहेत अस त्याला वाटे. त्या उघड बोलून दाखविण्यान त्याचा उपमर्द होईल अशी त्याची समजूत होती.

शिवाय शशिकलेच्या बाबतीत त्याच मन अजून काहीसं शंकेन आणि भीतीनं दबलेलं होत. तो तिच्यावर फार प्रेम करीत होता हें खर, परंतु तिच्याशी आपल्याला लग्न करता येईल असा भरंवसा त्याला वाटत नव्हता. किंबहुना त्याच्यात आणि शशिकलेंत लग्नाचा विषय कधी निघाला नव्हता. दोघं एकमेकाना भेटत, बोलत, बसत, मनातल्या प्रेमाचा स्पष्ट उच्चार न करतां तें फक्त पर्यायानं ज्यात प्रगट होईल अशी बोलणी करीत, थट्टा-विनोद करून हंसत, एखादे वेळी धडधडत्या अतःकरणानं हॉटेलांत जात, क्वचित् नव्या पुलावरून हिंडत इतकच ! चार पाच वेळां सदा शशिकलेच्या घरी गेला होता, आणि एकदा त्यानं तिला घरी आणली होती. कथा-कादबऱ्यांतली वर्णनं वाचून त्याची कल्पना झाली होती की प्रेम करणाऱ्या तरुण माणसांत चुबनाचा प्रकार अगदी सहजासहजीं घडतो. परंतु त्याचा स्वतःचा अनुभव अगदीच वेगळा होता. काही वेळां शशिकला अगदी एकटीच त्याला सांपडली होती, परंतु तिचा मुका घेण्याचा विचार मनात आल्याबरोबर त्याची छाती धडधडूं लागली होती, हातपाय कापूं लागले होते. तिचा मुका घेणं दूरच राहिलं, परंतु तिच्याशीं धड बोलणंही त्याला अशक्य झालं होतं. एकदां चित्रपट पाहतांना त्यानं तिचा हात हळूच धरला होता व तिनं तो बराच वेळ त्याच्या हातांत राहूं दिला होता. एकदां नव्या पुलाच्या कठड्यावरून खालीं पाण्याकडे

पहातांना ती वाजवीपेक्षां जास्त वांकली तेव्हां, ' अग ! अग ! ' असं म्हणून त्यानं दोन्ही हातांनी तिला धरली होती, व जोंपर्यंत ती वांकून खाली बघत होती तोंपर्यंत त्यानं आपले हात तिच्या अगाभोवतीच ठेवले होते. ती मुद्दामच जास्त वेळ खालच्या पाण्याकडे बघत राहिली असं त्याला वाटलं व त्या विचाराचा त्याला आनद झाला होता. परंतु यापलीकडे त्यानं तिच्याशी कधी लगट केली नव्हती. मात्र तिचं आपल्यावर प्रेम आहे याची त्याला खात्री होती. केव्हाना केव्हां तरी ' माझ्याशी लग्न करशील?' असं आपण तिला विचारूं शकू असं त्याला वाटत होतं घाई काय होती ? आपल्याला कुणो प्रतिस्पर्धी आहे अशी शंका त्याला नव्हती.

तो आपल्या मित्रांजवळ शशिकलेविषयी कधीही बोलत नसे. परतु मनातल्या मनात त्यांना उद्देशून तो म्हणत असे. ' एक दिवस मीदेखील तुम्हांला एक गम्मत सांगेन. मग व्हाल चकित आणि म्हणाल – '....



शशिकला त्याला टाळू लागली तेव्हां त्याला आश्चर्य वाटलं. तिच्या घरीं त्यानं जाव, ती बाहेर गेलेली असावी; ती कधी भेटली की त्यान विचारावं, ' फिरायला येणार ? ' व तिनं म्हणावं, ' माझं डोकं फार दुखत आहे. आता घटकाभर पडणार आहे मी. ' असे प्रकार वरचेवर होऊं लागले तेव्हा त्याला चमत्कार वाटला ! प्रथम प्रथम तिच्या सबबी त्याला खऱ्या वाटल्या, परंतु नंतर त्याला शंका येऊ लागली की ती आपल्याला फसवीत आहे. तिच्या वागण्यांत बदल का व्हावा त्याला समजेना.

पण लवकरच एके दिवशी त्याला समजलं.

तो तिच्या घरी गेला तेव्हां झकपक कपडे केलेला एक तरुण कोचावर बसलेला त्याला दिसला. शशिकला त्याच्यासमोर बसली होती. दोघांच्या मधोमध बैठया स्टुलावर चहाची किटली आणि पेले होते.

सदा म्हणाला, " जातों. पुन्हा केव्हां तरी येईन. "

ती आपल्याला बसायला सांगेल, ' चहा तरी घेऊन जा. ' असं म्हणेल, अशी त्याची कल्पना होती. जो कोण फाकडा तरुण कोचावर बसलेला होता त्याची तिनं ओळख करून द्यायला कांही हरकत नव्हती. परंतु शशिकलेनं त्याला फक्त विचारलं, " कांही काम नव्हतं ना ? "

तिच्या त्या प्रश्नाचा त्याला भयंकर राग आला. आपल्या स्वरांतील चिडकेपणा शक्य तितका लपवीत तो म्हणाला, " सहज आलो होतो ! माझं काय काम असणार ? "

तिच्याकडे रागाचा एक कटाक्ष टाकून तो तिच्यापुढून दूर झाला आणि घरी आला.

त्याला हळूहळू साऱ्या गोष्टी समजल्या. आपल्याला कोणी प्रतिस्पर्धी नाहीं ही त्याची समजूत आता दुरुस्त करावयास पाहिजे होती. कोचावर बसलेला जो फाकडा तरुण त्याच्या दृष्टीस पडला होता त्याच नाव पद्माकर कोरडे होतं. नाव कोरडे असल तरी त्याच्या घरी पैशाचा चांगलाच ओलावा होता. त्याच्या बापाच मुंबईला मोठ कापड-दुकान होत. अभ्यासासाठी नव्हे तर 'कॉलेज लाइफ्' 'एजॉय' करायसाठी तो कॉलेजांत जात होता. शशिकला त्याच्या नादी लागली होती. या स्पर्धेत आपला निभाव लागणं सगळ्याच दृष्टीनी कठीण आहे हे सदान लवकरच ओळखल.

शशिकलेच्या घरी जाण त्यान कमी केल. तिच्या भेटीची इच्छा आवरणं त्याला कठीण जाई. तथापि ती तो आवरी. पूर्वी जिथे तिची व त्याची भेट दहा वेळा होत असे, तिथे ती आता एक वेळच होऊं लागली. भेट झाली तरी त्याच दोघांच पूर्वीसारख मनमोकळ बोलणं होईनास झालं. त्याच्या मनात पुष्कळ वेळा येई की पद्माकर कोरडेविषयी तिला एकदा विचारावं. परतु कोरडे आपला प्रतिस्पर्धी आहे याची जाणीव आपल्याला आहे असं दाखवण चुकीच होईल असं त्याला वाटे. तो आपल्या प्रतिस्पर्ध्याचा उल्लेख कधी करीत नसे. एक प्रकारचं 'शीतयुद्ध' त्याच्यांत आणि शशिकलेत चालू राहिलं. दोघानाही एकमेकाच्या मनांतली गोष्ट कळत होती, दोघंही उघड बोलण्याचं टाळीत होतीं.

या 'शीतयुद्धाचा' शेवट जरा चमत्कारिक रीतीनं झाला.

सदाच्या चुलत बहिणीचं लग्न निघालं. त्यासाठीं त्याला कोंकणांत जावं लागलं. तिकडे तो पधरा दिवस राहिला. परत आल्यावर तो शशिकलेच्या घरीं जाऊन पाहतो तों त्या जागेंत दुसरंच नवीन बिऱ्हाड आलं होतं. चौकशी केल्यावर त्याला कळल कीं शशिकलेच्या बापाची तडकाफडकी सोलापूरला बदली झाली होती.

मोठ्या प्रयत्नानं तिचा सोलापूरचा पत्ता मिळवून सदानं तिला पत्र लिहिलं होतं. तिच्या उत्तराची वाट पाहिली होती. शेवटी वाट पाहणं त्यानं सोडून दिल होतं. शशिकलेचा विचारच त्यान अखेर मनातून काढून टाकला होता....

परतु आज आईच्या आग्रहाखातर जेवून आपल्या खोलीत अंथरुणावर पडल्या पडल्या या नव्या नोकरीनं आपल्या वाट्याला केवढी मानहानी आणली, आपले मनोरथ कोणते होते व त्याचा चक्काचूर कसा झाला होता याबद्दलचा खेद जेव्हा तो करूं लागला तेव्हा शशिकलेची त्याला एकदम आठवण झाली.... ती एकाएकी सोलापुरास गेली या गोष्टीला जवळ जवळ सात महिने झाले होते. या काळात ती गेल्याबद्दलचं त्याचं दुःख पुष्कळसं ओसरलही होत. परतु माणसाच मन एका गोष्टीनं तडफडू लागलं की मनावर बसलेले जुने घावही ताजे होतात, आणि अंतःकरणाची व्यथा वाढवितात. आत्तां शशिकलेची आठवण जेव्हा सदाच्या मनात आली तेव्हां आपल्या आयुष्यांतून ती अशी साफ निघून जावी याच त्याला फार वाईट वाटल. पूर्वी क्वचित्च त्याच्या मनात आल असेल इतक्या आवेगानं त्याच्या मनात आत्ता आल की शशिकलेवर आपण फार प्रेम केलं. तिनही उलट केल. तिचं आणि आपल लग्न व्हावयाला हवं होतं. आपल्याला प्रतिस्पर्धी उत्पन्न होण्याच्या आतच आपण तिला लग्नाबद्दल विचारलं नाही, भित्रेपणा केला हे आपल चुकलंच. धिटाई केल्याखेरीज प्रेम साधत नाही म्हणतात तें खोट नव्हे. तो स्वतःला उद्देशून म्हणाला, ' संधि होती तेव्हां गमावलीस! आतां बैस रडत. शशिकलेचं त्या कोरड्याशी लग्न झालं असेल-देखील ! '....शशिकलेला एकदा निदान पहावं अशी त्याला फार इच्छा झाली. अनेक प्रसंगीं ज्या वेषांत आणि जशी ती त्याला दिसली होती, त्या वेषात आणि तशी त्याच्या डोळ्यांपुढें ती आतां उभी राहिली. सदाशिव पेठेतल्या तिच्या बिऱ्हाडाच्या जागेंत ठेंगण्या माडीच्या पुढच्या अरुंद गॅलरीत पुस्तक वाचीत सतरंजीवर बसलेली त्याला ती कितीदां तरी दिसली होती. तिचं तें चित्र त्याला आठवलं. त्या वाड्यांतल्या त्या जागेंत आतां ती त्याला पुन्हा कधींदेखील आढळणार नव्हती....

असले खेदाचे विचार करतां करता सदाचा डोळा लागला.

" अरे तुला जायचंय ना ? " असे आईचे शब्द त्याला ऐकूं आले तेव्हां तो दचकून उठला. त्यानं आधी घड्याळाकडे पाहिलं. उशीर झालेला नाहीं याची खात्री पटल्यावर त्यानं सुस्कारा सोडला. त्यानं सावकाश कपडे केले. तो पोस्टांत गेला. कामाला लागला.

आपल्याला जें लाजिरवाणं वाटावं असं काम आपल्या वांट्याला आलं आहे याबद्दलची चीड पहिल्या दिवशी त्याला वाटली तितकी दुसऱ्या दिवशी वाटली नाही. तिसऱ्या दिवशी ती आणखीच कमी झाली. चवथ्या दिवशीं त्याहूनही कमी झाली. माणसाच्या मनाचं सुख असो वा दुःख असो, काळाच्या कठीण दगडावर तें घासलं गेलं की झिजतं हेंच खरं. शिवाय मानहानी करणाऱ्या त्या नोकरीच्या बाबतींत एक गोष्ट त्यांतल्या त्यांत सदाला समाधान देणारी होती. तो स्वतः रहात होता नारायण पेठेंत. त्याला ओळखणारी माणसं त्याच पेठेत किंवा सदाशिव, शनिवार शुक्रवार पेठांतून रहात असत. पत्रांचा बटवडा करण्यासाठीं त्याला नेमून दिलेला विभाग होता सोमवार पेठेचा. त्या पेठेंतली बहुतेक वस्ती ब्राह्मणेतरांची होती. त्याला ओळखणारी माणसं त्या वस्तींत नव्हती. त्याच्या अवताराकडे पाहून ' हें रे काय सदा ? टपालाचा शिपाई झालास तूं ? ' असं आपल्याला कुणीतरी हटकील अशी दहशत त्याला वाटायचं कारण नव्हतं. सदा मनाशी घोकीत होता, एवढं तरी नशीब म्हणायचं. मानहानीतल्या या कमतरतेचा त्याला आनंद वाटला .... चार पांच दिवसांनी पत्रांचा बटवडा करण्याच्या कामांत तो रुळूं लागला.

सहाव्या दिवशी पोस्टांतल्या वाटोळ्या टेबलाभोंवतीं सॉर्टिंगचं काम करणाऱ्या इतर शिपायांत सदा बसला असतांना त्याच्या समोरच्या शिपायानं एक पाकीट त्याच्या पुढ्यांत फेकीत म्हटलं, ' ब्लॉक नंबर आठ. मुदलियार बिल्डिंग. ' सदानं पुढ्यांत पडलेलं पत्र पालथं होतं तें सरळ करून त्यावरचा पत्ता वाचला :

' आनंदराव बेहरे, ब्लॉक नंबर ८, मुदलियार बिल्डिंग, सोमवार पेठ.'

आनंदराव बेहरे !

– शशिकलेचे वडील !

म्हणजे त्यांची बदली पुन्हां पुण्याला झाली होती म्हणायची !

....६

सोमवार पेठेंत कुठें गेले हे रहायला ?

आयत्या वेळेस गांवांतल्या ब्राह्मण वस्तीत जागा मिळाली नसेल तेव्हां जी मिळाली ती त्यांनी घेतली असेल.

शिवाय मुदलियार बिल्डिंग चांगली होती ! सगळे ब्लॉक नव्या पद्धतीचे होते.

गेल्या पांच दिवसांत आठ नंबरचा ब्लॉक त्यानं पाहिला नव्हता, दुसऱ्या मजल्यावर होता तो आणि आनंदरावाच्या नांवाचं पत्रही गेल्या पांच दिवसांत आलं नव्हतं.

आतां हे पत्र आलं होतं

तें देण्यासाठी जाणं त्याला भागच होतं !

तिथें गेल्यावर शशिकला भेटली म्हणजे ? टपाल-शिपायाच्या वेषांत तिनं आपल्याला पाहिलं म्हणजे ?

'परमेश्वर करो आणि कोरड्याबरोबर लग्न करून ती मुंबईला गेलेली असो ! '

मनातल्या मनांत अशी प्रार्थना करीत त्यानं तें पाकीट पत्राच्या चवडीत घातलं, आणि बाकीची पत्रं तो पाहून जुळवू लागला.

बटवड्याची फेरी करतां करतां मुदलियार ब्लॉक्सपाशी सदा आला तेव्हां त्यांची छाती धडधडू लागली खालच्या मजल्यावरची पत्रं टाकल्यावर जिना चढताना तो मनातल्या मनांत देवाची प्रार्थना करीत होता, 'शशिकला घरांत नसू दे, मुंबईला कोरड्याकडे गेली असू दे ! ' पण पुन्हा त्याला वाटे, ती घरांत असली आणि भेटली तर बरं होईल. तिला एकदां डोळे भरून पाहण्याची त्याला अनावर इच्छा झाली. आपल्याला ती भेटावयास हवी की नको हें त्याच त्यालाच कळेना !

जिना चढून जाऊन उजव्या अंगाला वळून तिथलं जाळीचं दार लोटून त्यानं व्हरांड्यात पाऊल टाकलं आणि पाहिलं तों गॅलरीच्या कठड्याला टेकून शशिकलाच उभी होती ! खालीं वाकून कांही तरी पाहण्यांत ती गुंतली होती.

त्याची चाहूल लागतांच तिनं वळून पाहिलं.

तिची व त्याची दृष्टादृष्ट झाली !

त्याला क्षणभर वाटलं पत्र फेकावं, परत फिरावं, आणि धूम ठोकावी !

परतु तो दृष्टीस पडल्याबरोबर तिनं दोन्ही हातांनी तोंड झाकलं, लगेच हात दूर केले, आणि ती म्हणाली, " तू ! म्हणजे काय ? "

" तुमचं पत्र आहे. घ्या. " असं म्हणून त्यानं पाकीट पुढें केलं. त्याचा चेहरा काहीसा निर्विकार राहिला.

तिनं विचारलं, " मला ओळखलं नाहीस ? "

त्यानं तिच्याकडे रागानं पाहिलं आणि म्हटलं, " वा ! ओळखलं तर ! मुबईचे कापड दुकानदार कोरडे याचे चिरजीव पद्माकर यांच्या सौभाग्यवती ना आपण ? " रागाच्या झटक्यात परत वळण्याचा त्याचा विचार होता.

शशिकला एकदम मोठमोठ्यानं हसू लागली. " शाबास ! कुणी दिली तुला ही अजब बातमी ? " तिनं आपल्या गळ्यावर बोट टेकलं आणि विचारलं, " लग्न झाल्याची खूण दिसते आहे का तुला माझ्या गळ्यांत ? "

सदाची मुद्रा पालटली ! त्याच्या तोंडावर थोडं हंसूदेखील फुटलं. स्वत:शीच बोलल्याप्रमाणें तो पुटपुटला, " मी समजत होतों तुझं लग्न झालं त्या कोरड्याशी. "

ती पुन्हा हंसली. " आणखी काय काय समजत होतास ? "

" सोलापूरच्या पत्त्यावर मी तुला पत्र लिहिलं त्याचं उत्तर तूं धाडलं नाहीस तेव्हां–"

" मला पत्र धाडलस ? मला तर कांहीं मिळालं नाही. पत्ता चुकीचा लिहिला असशील–" एकदम कसली तरी आठवण झाल्याप्रमाणें चेहरा करून ती म्हणाली, " पण इथें बाहेर काय बोलत ठेवलं तुला मीं ? आंत ये कीं. चहा घे."

" नको ! "

" असं काय करतोस ? ये ! "

" पण मला चहा देशील तितक्यांत पद्माकर कोरडे आला म्हणजे ? "

तिनं चटकन् त्याचा हात धरला व म्हटलं, " मला रडविण्याची इच्छा आहे का तुझी ? "–तिच्या डोळ्यांत खरोखरच पाणी आलं. पण तिनं तें लगेच पुसून टाकलं व तोंडावर हंसू आणून ती म्हणाली, " ये. आंत ये. "

" पण या वेळेस खरंच आग्रह करूं नकोस. कारण एक तर ड्यूटीवर असतांना चहा पिणं बरं नाही, आणि शिवाय–"

तो एकदम गप्प झाला म्हणून तिन विचारलं, " शिवाय काय ? "

तो म्हणाला, " कसल्या भयंकर वेषात मी आहे, दिसतंय ना तुला ? मला तू ओळखलंस हेच आश्चर्य आहे. काय विचित्र अवतार दिसत असेल माझा या कपड्यात ! "

ती हंसली आणि म्हणाली, " मला तुझा अवतार दिसलाच नाही. फक्त तू दिसलास ! ये. चहा घे. "

तो म्हणाला. " आत्तां नको. माफ कर. "

" मग केव्हा येशील ?"

" उद्यां पत्र असल तर टाकायला येईन की."

त्यानं थट्टा केली की तो रागावून बोलला तें शशिकलेला ठरवितां आलं नाही. ती साधेपणान म्हणाली, " तसा नको येऊंस, चहा घ्यायसाठी ये. "

" यायलाच पाहिजे का ? "

" होय. तुझ्याशी पुष्कळ बोलायचं आहे मला. "

" इतकी सवड होईल का तुला ?"

तिनं डोळे मोठाले केले आणि म्हटलं, " आतां बघ हं–"

त्याला एकदम हंसू आल. तो म्हणाला, " बरं येईन. "

" केव्हां येशील सांग. "

तो म्हणाला, " उद्या रविवार आहे. सुटी आहे. सकाळी येईन. "

" बघ हं, वाट पाहीन. "

तो तिच्यापासून दूर झाला आणि व्हराड्याच्या दाराकडे जाऊं लागला. तिन हळूच टाळी वाजवून ' शुक् शुक् ' केलं अस त्याला वाटलं म्हणून चार पावलं टाकून तो तिच्याकडे गेला.

तिनं विचारलं, " ही नोकरी केव्हां धरलीस ?"

" फार वाईट दिसतो का ग मी या कपड्यांत ? "

" शी: ! हें रे काय तुझं विचारणं ? मी कांहीं त्या अर्थानं नाहीं विचारलं. वाईट दिसायला काय झालं ? अगदी झक्क दिसतो आहेस. "

" खरं म्हणतेस ! "

" शपथ ! "

तो हंसला, दूर झाला, आणि झपाझप् पावलं टाकीत जाळीच्या दाराबाहेर जाऊन जिना उतरूं लागला.

आतां अगावरच्या कपड्यांची त्याला किंचित्‌ही शरम वाटत नव्हती. पत्रांचा बटवडा करीत हिंडण्याच्या कामाची चीड वाटत नव्हती. उलट त्याच्या मनांत जसा नवा आनंद भरला होता तशीच कृतज्ञताही निर्माण झाली होती. शशिकला कायमची आपल्या आयुष्यातून गेली असं तो समजत होता–ती दुसऱ्याची झाली असं त्यानं मानलं होतं–आपल्या मनांतले प्रेमाचे मनोरथ भुईसपाट झाले अस त्याला वाटलं होतं ! आणि आज अचानक शशिकला त्याला भेटली होती ! ती अजून अविवाहित होती ! आणि तिनं त्याला आग्रहानं बोलावलं होतं ! उद्यां तिच्याकडे गेल्यावर पूर्वीसारखा भित्रेपणा करायचा नाही असं तो मनाशीं ठरवू लागला. अजून त्याला जें हवं तें घडायचच होत. सारी उद्याची बात होती ! परंतु सदाच्या मनांतले प्रीतीचे आणि आशेचे करपलेले सारे अंकुर एकदम टवटवीत झाले होते ! भुईसपाट झालेले त्याचे मनोरथ पुन्हा उभे राहून भरधांव सुटले होते ! त्याच्या मनांत वरचेवर येत होतं, पोस्टांतलं हें काम पत्करलं म्हणून शशिकला पुन्हां भेटली !....

त्या क्षणीं कुणी त्याला हटकून त्याची स्वाक्षरी आणि संदेश मागितला असता तर त्यानं लिहून दिलं असतं. ' पोस्टांत नोकऱ्या धरा ! '

## ४ . . . . . बाप आणि लेक

आपण आपल्या मुलीसाठीं जें कांही करावयास हवं तें आपल्या हातून घडत नाही, या विचाराची रुखरुख अनंतरावांना नेहमीच वाटत असे. मालती त्याच्या दृष्टीस पडली की त्याच्या मनात येई, हिच्या साऱ्या इच्छा मी पूर्ण करीत आहे काय ? हिच मन मी ओळखलं आहे काय ? आपल्या मनातले सगळे विचार ही मला सागते काय ? माझ्यावर हिचा पूर्ण विश्वास आहे काय ?.... मालती त्याच्याशी कांहीं बोलू लागली की अनंतराव एकीकडे तिचं बोलणं ऐकत असत, व दुसरीकडे मनांतल्या या प्रश्नांची उत्तर शोधीत असत.

मालती आवाज उच चढवून त्याना हाक मारीत होती व म्हणत होती, " अण्णा, आमच्याबरोबर मोटारीत येणार नाही तुम्ही ? सुदरचे वडील आम्हांला नेताहेत. येणार का ? "

ती आतां सोळा वर्षांची झाली होती. तिचे लांबसडक केंस, पिंगट डोळे, आणि जराशी रुंद जिवणी, या गोष्टी दिसल्याबरोबर पहाणाराची खात्री पटे की, ती आपल्या आईच्या वळणावर गेली होती. अनंतराव मनाशीं म्हणत, पोर मोठी देखणी होणार. हिच्या हुषारीचं चीज केलं पाहिजे. हिला चांगलं वळण लावलं पाहिजे. हिच्या आवडीनिवडी समजून घेतल्या पाहिजेत....खेदाची गोष्ट एवढीच होती कीं, हें सारं करावंसं अनंतरावांना वाटे, परंतु तें करायला त्यांना फुरसतच होत नसे. मालीची व त्यांची निवांत गांठभेट होत होती कुठे ? त्याचं पाऊल घरांत ठरत होतं कुठें ? उद्योगधंद्यानिमित्त ते सारखे फिरतीवर असत. आज मुंबईला तर उद्यां कलकत्याला ! आज दिल्लीच्या हॉटेलांत तर उद्यां मद्रासच्या !

मालती पुन्हा ओरडून म्हणाली, " चला ना अण्णा ! "

मालतीबरोबर मोटारपर्यंत जातांना अनंतरावांच्या मनांत आलं, झपाझप् पावलं टाकता येत नाहीत आपल्याला. आपलं वय झालं....सुंदरचे वडील भाग्यवान खरे. त्यांना उद्योगधंद्यासाठी फिरती करावी लागत नव्हती. त्याना आपल्या लेकीचे लाड करता येत होते. आपल्या लेकीला व तिच्या मैत्रिणीना मोटारीत घालून कुठे ना कुठे तरी ते नेत असत. वनभोजनाला म्हणा, पोहण्याच्या तलावावर म्हणा, खेळाच्या मैदानाकडे म्हणा. एकदा मालती बापाला म्हणाली होती,

"सुंदरची कशी मजा आहे पहा. तिचे आबा नेहमी इथेच असतात. आम्हांला गाडीतून खूप हिंडवतात." तिला अर्थातच म्हणायचं होतं, 'नाही तर तुम्ही, तुमची निवांत भेट म्हणजे कपिलाषष्ठीचा योग. तुमच्या पायांवर जशी काही भिगरी पडली आहे. कधी कुठे नेता का मला तुम्ही ?'

अनंतरावाना वाटलं होत, तिला जवळ ओढावं आणि म्हणावं,' बेटा, सगळीकडे घेऊन जात असतों मी तुला आणि तुझ्या आईला ! आगगाडींत, हॉटेलांत, मोठमोठ्या कंपन्यांच्या कचेऱ्यात, जिथें मी जाईन तिथे तू माझ्याबरोबर असतेस बेटा ! जो भेटेल त्याला तुझे फोटो मी दाखवीत असतों. तुझ्यापासून आणि तुझ्या आईपासून दूर असल्याची जाणीव मी या युक्तीन मनातून घालवीत असतो, आणि मनाशी म्हणत असतो, आतां लवकरच घरी परत जाईन मी....'

परंतु असं बोलण्याऐवजी ते मालतीला म्हणाले, "केव्हां तरी, लवकरच केव्हां तरी, ज्यासाठी सदा फिरतीवर जावं लागणार नाहीं, असा उद्योग मी पहाणार आहे. सदा तुझ्याजवळ आणि तुझ्या आईजवळ रहाणार आहे. मग मात्र तुम्हां दोघींना वाटू लागेल मी वरचेवर फिरतीवर जात होतों तेंच बरं होतं !"

ही कोटी कांहीं फारशी चांगली नव्हती. त्यांनाहि तिचं हसूं आलं नाही, आणि मालतीहि हंसली नाही. ते घरीं राहिले तर मालतीला व तिच्या आईला त्यांचा कंटाळा येईल हें म्हणणंहि खोटं होतं, आणि ज्यांत सदा फिरतीवर जावं लागणार नाही असा नवा धंदा मिळविण्याची अनंतरावांची आशाहि व्यर्थ होती. फिरतीवर न जाता करतां येईल असा एखादा

धंदा मिळविण्याचा अनंतरावांनीं पुष्कळ प्रयत्न केला होता. परंतु त्यांत त्यांना यश आलं नव्हतं. श्रीमंत होण्याची आणि बायकोला व लेकीला सुखासमाधानांत व ऐषआरामांत ठेवण्याची अनंतरावांची इच्छा होती. ती पूर्ण करण्यासाठी सतत भ्रमंती करणंच त्यांना भाग होतं....

मोटारजवळ गेल्यावर सुदरच्या बापाला अनंतरावांनी विचारलं, " एका आगंतुकाची सोय होईल का गाडीत ? "

सुदरचा बाप हंसला आणि म्हणाला, " अरे, माझ्या गाडींत तुला जागा मिळणार नाही अस कधीं होईल का ? ये . "

अनंतराव गाडीत चढून बसले. गाडी चालू केल्यावर सुदरचा बाप अनंतरावांना म्हणाला, " तुझी भेट किती महाग झाली आहे रे ! "

सुदरचे आबा आणि अनतराव शाळेत आणि कॉलेजात बरोबर शिकले होते. परंतु पदवी मिळविल्यानतर आबा एक चागली नोकरी मिळवून स्थायिक झाले होते; अनतराव मात्र निराळ्या रस्त्यानं गेले होते. लग्न केल्यानंतर त्यांना वाटू लागल होतं की, सदा फिरती करावी लागणं कांहीं बरं नाही. दुसरा एखादा उद्योग पहावा. तो सहज पहातां येईल असंहि त्यांना वाटत होत. परतु दोन वर्षांनी मालतीचा जन्म झाला होता. मुलगी झाली म्हणून त्याना जसा आनद झाला होता, त्याप्रमाणेंच अपत्यसंगोपन किती खर्चाचि असत त्याच ज्ञान होऊन ते काहीसे चकितहि झाले होते. संसाराचा खर्च एकदम दुपटीन वाढला होता. जो उद्योग ते करीत होते, त्यांत त्यांना फार भ्रमती करावी लागत होती, परंतु प्राप्ति भरपूर होती. दुसरा उद्योग पहाण्याचा विचारच त्यांच्या मनांतून हळूहळू नाहीसा झाला. ते विचार करूं लागले, इतका पैसा दुसऱ्या कुठल्या उद्योगांत मिळणार आहे ? आहे तें ठीक आहे. फिरतीवर जाव लागतं खरं, परंतु असेच पैसे सांठवितां आले तर केव्हां तरी निवृत्त होऊन घरी बसतां येईल.

पैसे सांठवून निवृत्त होण्याचा दिवस दूर होता तसाच दूर राहिला होता, आणि वेगानं पुढून जाणाऱ्या एखाद्या मेलगाडीच्या डब्याप्रमाणें दिवसांमागून दिवस आणि वर्षांगागून वर्ष निघून गेली होतीं ! मात्र ज्या ज्या शहरीं अनंतराव धंद्यानिमित्त जात, तिथून तिथून ते बायकोसाठी आणि मालतीसाठीं किंमती वस्तू खरेदी करून आणीत. साड्या, सोन्याच्या पिना, शोभिवंत

कगवे, पुस्तकं, खेळणी ! ....एकदां त्यांनीं मालतीसाठीं फार उंची कापडाचा पंजाबी पोषाख शिवून आणला. परंतु तो इतका लांडा निघाला कीं, तो घातल्यावर मालीचे अर्धे हातपाय उघडे राहिले ! मालतीच्या आईन अनतरावाची थट्टा केली. " तुमची लेक किती वाढली आणि केवढी झाली याचीदेखील दाद नाही ना तुम्हाला ? सदा फिरतीवर जा ! "

अनंतराव फिरतीवर असले म्हणजे बायकोला आणि मालतीला मोठ मोठी पत्रं लिहित. सारा दिवस ते उद्योगात घालवीत, आणि रात्रीच जेवण आटोपल्यानतर हॉटेलच्या खोलीत आरामशीर बसून लाबलचक पत्रं लिहीत. तो त्याचा एक आवडता षौक होता. जी जी नवी स्थळं ते बघत, अथवा जी जी नवी माणसं त्याना भेटत, त्यांची सविस्तर वर्णनं मालतीला लिहिलेल्या पत्रात ते करीत. या शहरातल्या ट्रामगाड्या, त्या शहरांतले विचित्र बाधणीचे टागे, या प्रांतातील धान्याच्या पोत्यानी भरलेले ठेंगण्या चाकांचे मोठमोठे खटारगाडे व त्यांना जुपलेले मस्त मजबूत बैल, त्या प्रातातील शहराच्या रस्त्यातून हिडणाऱ्या खेडूत बायकाचे रगीबेरंगी मळकट घागरे व अगाखाद्यावरील कथिलाचे अलकार, शहरालगतच्या खाडीतील मालवाहू मचवे आणि ते हाकारणारे पिळदार शरीराचे काळेकुट्ट नावाडी, विस्तीर्ण बाजारचौकात एका कडेला उभी राहिलेली रिक्षांची रांग, मोठमोठ्या दुकानाच्या दर्शनी भागापुढे थबकणारी उंची पोषाख केलेलीं जोडपीं – अशा अनेकविध दृश्यांची वर्णनं ते मालतीला लिहिलेल्या पत्रातून करीत असत....

मालती त्यांना क्वचित्‌च पत्र लिहीत असे. बहुतकरून ती एखाद्या कार्डावरच काम भागवी, आणि त्यावर एखादच वाक्य लिहून तिनं चित्रं काढलेलं असे. 'आज मी सर्कशींतला वाघ पाहिला '– आणि त्या वाक्याखालीं वाघाचं चित्र ! त्या चित्राला शेपटी असे आणि अंगावर पट्टे दाखविलेले असत, म्हणूनच केवळ त्याला वाघाच चित्र म्हणणं भाग असे. एकदां अनंतराव दार्जिलिंगला गेले, तेव्हां ज्याच्या पाठीवर वाघाचं रंगीत चित्र छापलेलं होतं असं एक कार्ड त्यांनी तिला पाठविलं. ' इथें खरोखरच निळसर रंगाची झुपकेदार झाडं आहेत. आणि इथली माती खरोखरोच इतकी लाल आहे कीं एखाद्याला वाटेल जिकडेतिकडे तांबड्या

शाईचा सडा टाकला आहे की काय कुणास ठाऊक ! दार्जिलिंगची शोभा तुला एकदा दाखविणार आहे मी ! ....'

गेल्या दोन वर्षात अनंतरावांना फार वाटू लागलं होतं की खऱ्या गृहसौख्याला आपण पारखे झालो आहोत. खरं म्हणजे आपण बायकोबरोबर आणि लेकीबरोबर दोन वेळा जेवायला हवं, महिला-मंडळातल्या मतभेदाच्या गमती बायकोच्या तोंडून ऐकावयाला हव्यात, मालतीला भूगोल शिकवायला हवा, उदाहरणं सोडविण्यात तिला मदत करावयाला हवी. ( बाकी ती सोडवितां येत होती कुणाला ? ) मालतीच्या मैत्रिणी घरी आल्या तर त्यांच्याशी चेष्टामस्करी आणि बातचीत करायला हवी. परंतु हे सारं करायचं तसंच राहून जात होतं वेळ हातातून निसटत होता .... अनंतरावांच्या मनात येई, गेलेला पैसा परत मिळविता येतो; गेलेली वेळ परत आणता येत नाही ! ....

मालती म्हणाली, " मी आणि सुंदर यंदा एस्. एस्. सी. ची परीक्षा पास होऊ. तुम्हाला माहित आहे ना अण्णा ? "

अनंतराव थट्टेनं म्हणाले, " तुम्ही पास होण्याचा पराक्रम करूं शकाल असं मला नाही वाटत ! "

गाडी चालविता चालविता आबा हसले. मागच्या सीटवर बसलेल्या मालती आणि सुंदर दोघीहि हसल्या पण मालती लगेच म्हणाली, " वा वा अण्णा, आम्ही दोघीहि नक्की पास होणार बरं का ! कोणत्या कॉलेजात जायचं तेसुद्धा सुंदरनं आपल्या वडिलांच्या सल्ल्यानं ठरवून टाकलेलं आहे."

" आणि तुझंदेखील काही ठरलंच असेल ? " असं विचारताना अनंतरावांच्या मनात आलं, हिच्या पुढच्या शिक्षणाला लागणाऱ्या पैशाची तरतूद आपण भरपूर करून ठेवली आहे .... या बाबतीत मात्र इतर मुलींच्या वडिलांच्या मागे आपण रेंगाळलो नाही. ....

मालती म्हणाली, " माझं कसं ठरेल अण्णा ? तुमच्याशी निवांतपणें बोलतां यावं अशी तुमची माझी भेट तरी होते का कधी ? "

ती असं बोलून गेली, आणि नंतर तिला वाटलं, उगीच आपण अण्णांना दुखविलं.

शाळेच्या मोठ्या प्रवेशद्वाराखालच्या पोर्चखाली मोटार उभी

राहिल्याबरोबर मालती आणि सुदर दोघीजणी खालीं उतरल्या. परंतु पायऱ्या चढून इमारतींत शिरण्याऐवजी गाडीचं पुढच्या बाजूचं दार उघडून मालती बापाला म्हणाली, "आंत चला ना अण्णा. तुमची जुनी शाळा पुन्हा पाहवीशी नाही का वाटत तुम्हाला ? उतरा. चला."

शाळेच्या दालनादालनातून जातांना अनंतरावांना आपले विद्यार्थीदशेंतले दिवस आठवले. त्या लहान वयात या इमारतीत हंसतखेळत क्रिडतांना व बागडताना पुढच्या आयुष्याची कोणती स्वप्नं अनंतरावांनी रगविली होती ? आपल एका सुदर स्त्रीशी लग्न होईल आणि आपली लेक अशी देखणी आणि अशी हुषार होईल असं स्वप्न त्याना खचित पडलं नव्हतं. मालतीचा अभिमान बाळगण्यात जें सुख होतं, तेहि त्या अल्पवयी अनंताच्या ध्यानीमनी नव्हत, आणि सुंदरचे आबा तिच्या सहवासांत जितके राहतात तितके आपण मालतीजवळ राहूं शकत नाही याबद्दलचा खेद आणि पश्चात्तापहि त्या छोटया अनंताच्या ध्यानीमनीं नव्हता....

"चला अण्णा, तुम्हाला एक गंमत दाखवायची आहे." असं म्हणून मालतीनं त्यांचा हात पकडून त्यांना ओढीत नेलं.

हॉलमध्यें शिरतांना अनंतरावांना आठवण झाली की, त्यांच्या वेळीं या ठिकाणी लायब्ररी होती. परंतु आता त्यानी पाहिलं तों सबंध हॉल रिकामा होता आणि तिन्ही बाजूच्या भिंतीवर चित्र टांगलेली होती. शाळेंतल्या विद्यार्थ्यांनी काढलेल्या चित्रांचं प्रदर्शन आपण पहात आहों हें अनतरावांच्या ध्यानांत यावयास वेळ लागला नाही.

पहातां पहाता एके ठिकाणी ते थबकले, व चकित झाले. एका मोठ्या चित्राखाली 'पहिल बक्षीस' अशी ताबडी चिठ्ठी त्यांना दिसली. त्या चित्रावर त्यांना मालतीची सही दिसली !

ते निरखून बघू लागले.

बक्षिसाच्या चिठ्ठीकडे नव्हे !

--मालतीची पाच-सहा चित्रं लावलेली होतीं त्यांकडे !

धान्याच्या पोत्यानी भरलेल्या ठेंगण्या चाकाचे मोठमोठे खटारगाडे व त्यांना जुंपलेले मस्त मजबूत बैल एका चित्रात त्याना दिसले. दुसऱ्या चित्रांत रंगीबेरंगी मळकट घागरे नेसलेल्या, आणि अंगाखांद्यावर कथिलाचे अलंकार

त्यालेल्या, शहराच्या रस्त्यांतून हिंडणाऱ्या खेडूत बायकाचा घोळका त्याना दिसला. तिसरं एक चित्र शहरालगतच्या खाडीतील मालवाहू मचव्यांचं आणि पिळदार अगाच्या काळ्याकुट्ट नावाड्याचं होतं. चवथ्या चित्रात विस्तीर्ण बाजारचौकातल्या एका कडेला रिक्षांची राग उभी राहिलेली होती....

अनंतराव अत्यत चकित झाले. " वाः ! सुदर ! " असं पुटपुटताना भावनाच्या आवेगाचा घुटका त्याना गिळावा लागला. त्याच्या लक्षात आलं, की त्यानी मालतीला दूरदूरच्या ठिकाणाहून जी पत्र पाठविली होती, त्यांतली वर्णनं तिनं आत्मसात् केली होती आणि त्या पत्राना या चित्राच मोहक रूप दिलं होत. जणू त्याच्या नजरेनं तिनं ती रमणीय स्थळं बघितलीं होतीं.... एकदम मान वर करून त्यानी तिच्याकडे पाहिल आणि तिला विचारल, " माले, तुला मुबईच्या चित्रकलेच्या शाळेत जायचं का ? "

मालतीचा चेहेरा विलक्षण हर्षानं उजळल्यासारखा त्यांना दिसला. तिनं हसून मान हलविली आणि हळूच म्हटल, " मी न सांगताच तुम्ही ओळखलं म्हणायचं, अण्णा ! "

अनंतरावांनी मालतीचा हात घट्ट धरला. त्याच्या मनात एक नवीनच समाधान उचबळून आल.... इतर मुलीचे बाप फिरतीवर जात नसतील, सदैव घरीं रहात असतील. आपल्या नित्य सहवासाच सुख त्याना देत असतील. परतु मालतीला बापाकडून जे मिळालं तेंहि काही कमी मोलाचं नव्हतं. बापाचे विचार, प्रवासातले अनुभव मालतीला मिळाले होते ! एका अर्थी मालती बापाच्या सहवासाला मुकली होती, परतु एका तऱ्हेनं इतर कोण-त्याहि मुलीपेक्षां बापाच्या सहवासांत ती नित्य राहिली होती.... अनंतराव मनाशी म्हणाले, ' सुदरच्या बापान लेकीसाठी जे केल तें मला करतां आलं नाही, असा खेद मी काय म्हणून वाटून घ्यावा ? माझ्या लेकीला मी जें दिल, ते कोणत्या मुलीला तिच्या बापान दिलं असेल ?....'

मालतीपासून नेहमी दूरदूर राहिल्याबद्दलची रुखरुख त्यांच्या मनांतून आतां लुप्त झाली ! त्यांची खात्री पटली की, खरं पहाता ते नेहमी तिच्या सन्निधच होते !....

त्यांनीं मालतीचा हात दाबला आणि म्हटलं, " माले ! तूं आर्टिस्ट होणार खचित ! "

# ५ . . . . टिकेट्स प्लीज

आगगाडीतून प्रवास करणाऱ्या माणसाच्या दोन तऱ्हा असतात. काही माणसं अशी असतात की कुणाशीहि अक्षरदेखील न बोलतां तीं आपल्या जागी अगदी घम्म बसून राहतात, उलट काही अशी असतात की ओळखीचा अनोळखीचा असा पक्तिप्रपच न करतां जो भेटेल त्याच्याशी गप्पा मरण्यांत त्यांच्या तोडाचा पट्टा अव्याहत चालू असतो....

सुमनचे दादा दुसऱ्या वर्गांतले होते. घरांतदेखील त्यांची टकळी चालू असेच; पण बसमधून, आगगाडीतून ते कुठे जायला निघाले, की त्यांच्या बडबड्या स्वभावाला आणखीच भरती आल्यासारख होई. शेजारी बसलेला माणूस त्यांच्या मित्रांपैकी व त्यांच्याबरोबरच निघालेला असला तर मग मुळी प्रश्नच नसे. परंतु तसा तो नसला तरी सुमनचे दादा फार फार तर पाच मिनिटं स्वतः गप्प बसत व त्याला गप्प बसू देत; 'कुठपर्यंत जाणार?' 'कुठे असतां ?', 'नाव काय ?' अशा प्रश्नांचं गिरमिट लावून परकेपणाला ते भल मोठ भोंक पाडीत, आणि मग त्या माणसाशीं त्यांच्या ऐसपैस गप्पा सहज सुरू होत....

आपल्या वडिलांचा हा स्वभाव सुमनला माहीत होता. म्हणूनच दादांच्या आणि समोरच्या बाकावर बसलेल्या किडकिडीत चष्मेवाल्या माणसाच्या गप्पा अगदी रगांत आलेल्या पाहून तिला आश्चर्य वाटलं नाही. त्या गप्पा कानावर येतील तेवढ्या ती ऐकत होती, मधूनच बाहेरच्या देखाव्याकडे खिडकीतून बघत होती, मधूनच हातांतलं पुस्तक वाचीत होती. मात्र या तीन्ही गोष्टींपेक्षां तिचं चित्त खरं गुंतलं होतं तें स्वतःच्या विचारांत.... आपण आपल्या वडिलांबरोबर खरोखरच मुबईस जात आहोंत काय, असं वरचेवर तिच्या मनांत येत होतं, आणि स्वतःच्या जाण्याचं ती मनाशीं

त्यालेल्या, शहराच्या रस्त्यांतून हिंडणाऱ्या खेडूत बायकाचा घोळका त्याना दिसला. तिसरं एक चित्र शहरालगतच्या खाडीतील मालवाहू मचव्यांचं आणि पिळदार अंगाच्या काळ्याकुट्ट नावाड्यांचं होतं. चवथ्या चित्रात विस्तीर्ण बाजारचौकातल्या एका कडेला रिक्षाची रांग उभी राहिलेली होती....

अनंतराव अत्यंत चकित झाले. " वाः! सुंदर ! " असं पुटपुटताना भावनांच्या आवेगाचा घुटका त्यांना गिळावा लागला. त्यांच्या लक्षात आलं, कीं त्यांनी मालतीला दूरदूरच्या ठिकाणांहून जी पत्रं पाठविली होती, त्यांतली वर्णनं तिनं आत्मसात् केली होती आणि त्या पत्रांना या चित्रांचं मोहक रूप दिलं होतं. जणू त्यांच्या नजरेनं तिनं ती रमणीय स्थळं बघितली होतीं....एकदम मान वर करून त्यांनी तिच्याकडे पाहिलं आणि तिला विचारलं, " माले, तुला मुंबईच्या चित्रकलेच्या शाळेत जायचं का ? "

मालतीचा चेहेरा विलक्षण हर्षानं उजळल्यासारखा त्यांना दिसला. तिनं हंसून मान हलविली आणि हळूच म्हटलं, "मी न सांगताच तुम्ही ओळखलं म्हणायचं, अण्णा ! "

अनंतरावांनी मालतीचा हात घट्ट धरला. त्यांच्या मनात एक नवीनच समाधान उचंबळून आलं....इतर मुलींचे बाप फिरतीवर जात नसतील, सदैव घरीं रहात असतील. आपल्या नित्य सहवासाचं सुख त्यांना देत असतील. परंतु मालतीला बापाकडून जे मिळालं तेंहि काही कमी मोलाचं नव्हतं. बापाचे विचार, प्रवासातले अनुभव मालतीला मिळाले होते ! एका अर्थी मालती बापाच्या सहवासाला मुकली होती, परंतु एका तऱ्हेनं इतर कोण-त्याहि मुलीपेक्षा बापाच्या सहवासांत ती नित्य राहिली होती....अनंतराव मनाशी म्हणाले, ' सुंदरच्या बापानं लेकीसाठी जे केलं तें मला करतां आलं नाही, असा खेद मी काय म्हणून वाटून घ्यावा ? माझ्या लेकीला मीं जें दिलं, तें कोणत्या मुलीला तिच्या बापानं दिलं असेल ?....'

मालतीपासून नेहमी दूरदूर राहिल्याबद्दलची रुखरुख त्यांच्या मनांतून आतां लुप्त झाली ! त्यांची खात्री पटली की, खरं पहाता ते नेहमी तिच्या सन्निधच होते !....

त्यांनीं मालतीचा हात दाबला आणि म्हटलं, " माले ! तूं आर्टिस्ट होणार खचित ! "

# ५ . . . . टिकेट्स प्लीज

आगगाडींतून प्रवास करणाऱ्या माणसांच्या दोन तऱ्हा असतात. काहीं माणसं अशी असतात की कुणाशीहि अक्षरदेखील न बोलता ती आपल्या जागी अगदी घम्म बसून राहतात, उलट काही अशी असतात की ओळखीचा अनोळखीचा असा पक्तिप्रपच न करतां जो भेटेल त्याच्याशी गप्पा मरण्यांत त्यांच्या तोडाचा पट्टा अव्याहत चालू असतो....

सुमनचे दादा दुसऱ्या वर्गातले होते. घरांतदेखील त्यांची टकळी चालू असेच; पण बसमधून, आगगाडीतून ते कुठे जायला निघाले, की त्यांच्या बडबड्या स्वभावाला आणखीच भरती आल्यासारखं होई. शेजारी बसलेला माणूस त्यांच्या मित्रांपैकीं व त्यांच्याबरोबरच निघालेला असला तर मग मुळी प्रश्नच नसे. परंतु तसा तो नसला तरी सुमनचे दादा फार फार तर पाच मिनिटं स्वत: गप्प बसत व त्याला गप्प बसू देत; 'कुठपर्यंत जाणार?' 'कुठे असतां ?', 'नाव काय ?' अशा प्रश्नांचं गिरमिट लावून परकेपणाला ते भल मोठ भोंक पाडीत, आणि मग त्या माणसाशीं त्यांच्या ऐसपैस गप्पा सहज सुरू होत....

आपल्या वडिलांचा हा स्वभाव सुमनला माहीत होता. म्हणूनच दादांच्या आणि समोरच्या बाकावर बसलेल्या किडकिडीत चष्मेवाल्या माणसाच्या गप्पा अगदीं रगात आलेल्या पाहून तिला आश्चर्य वाटलं नाही. त्या गप्पा कानावर येतील तेवढ्या ती ऐकत होती, मधूनच बाहेरच्या देखाव्याकडे खिडकीतून बघत होती, मधूनच हातातलं पुस्तक वाचीत होती. मात्र या तीन्ही गोष्टीपेक्षां तिचं चित्त खरं गुंतलं होतं तें स्वत:च्या विचारांत.... आपण आपल्या वडिलांबरोबर खरोखरच मुबईस जात आहोत काय, असं वरचेवर तिच्या मनांत येत होतं, आणि स्वत:च्या जाण्याचं ती मनाशीं

आश्चर्य करीत होती.... दोन दिवसापूर्वी तिला जर कुणी सागितलं असतं की येत्या शनिवारी सकाळच्या मेलनं तू दादांबरोबर मुबईला जाशील तर तिचा त्यावर विश्वास बसला नसता .... आणि ज्या कामासाठी दादा तिला घेऊन मुबईस निघाले होते, त्या कामाच भविष्य कुणी वर्तविल असतं तर ते सागणाराला तर तिन वेड्यातच काढल असत ....

ती म्हणाली असती, " हॅं. ! मी काही अशातली मुलगी नाही हें विसरता तुम्ही. दादा पुष्कळ नेतील मला दाखवायला; पण मी जायला पाहिजे ना ! लग्न जुळविण्याची ही तऱ्हा मला अगदी पसत नाही...."

तिचं हें म्हणण काही खोट नव्हत. आजपर्यंत स्वत·ला दाखवायसाठी म्हणून ती कुणापुढेहि उभी राह्यली नव्हती दाखविण्याचा प्रकार तिला पसंत नव्हता तिच्या आईबापानींहि तिच्या इच्छेविरुद्ध तिला कधी आग्रह केला नव्हता तिच कुणावर प्रेम आहे की काय याच्या चौकशाहि त्यानी केल्या नव्हत्या. तिच कुणावर प्रेम असलं तर आज ना उद्यां ती आपल्याला सागेल याची त्याना खात्री होती, आणि तिच्या लग्नाची त्याना घाईहि नव्हती. तिला पाहण्यासाठी आजपर्यंत कुणी आल नव्हतं. " कशा ग बाई स्वत.ला दाखविण्यासाठी तुम्ही उभ्या राहता ? " अशी काही मैत्रिणीची चेष्टा तिन केली होती.... आणि आज ती आपल्या दादाबरोबर मुबईला निघाली होती ! गाडगीळाच्या घरांतल्या म्हातारीला आपल्या नातवाची भावी वधू पाह्यची होती, आणि तिला अथरुणावरून उठणं शक्य नव्हतं म्हणून ! गाडगीळाच्या चदूची आणि सुमनची दोन चार वेळाच भेट झाली होती, पण त्यानं मला हीच मुलगी पाहिजे म्हणून आपल्या बापाजवळ हट्ट धरला होता. त्याच्या दादानी सुमनच्या दादाना पत्र लिहून मागणी घातली होती. गाडगीळाच स्थळ चटकन् पसंत पडण्यासारखंच होत. सार जवळजवळ ठरलंच होत. पण काल गाडगीळाचं सुमनच्या दादाना पत्र आल होतं की, " अखेरचा निर्णय घेण्यापूर्वी आमची म्हातारी आई म्हणते मला एकदां मुलगी पाहूं द्या. तुम्ही लेकीला घेऊन याल तर बर होईल. " सुमननं प्रथम आढेवेढे घेतले होते, परंतु दादानीं समजूत घातल्यावर तिन आपला विरोध सोडून दिला होता. ती त्याच्याबरोबर मुबईला जायला निघाली होती....

सुमनच्या मनात सारखं येत होत, आता मला मैत्रिणी चिडवतील खास !

म्हणतील– " कशी जिरली एका माणसाची ! स्वतःला दाखवायला मी कधी तयार व्हायची नाही अशी शेखी मिरवत होतीस नाही का ?".... पण केली मैत्रिणीनी चेष्टा तर केली. चदूच्या म्हाताऱ्या आजीनं पाहणं आणि चदून पाहणं सारखं थोडंच होत ? या दोहोंतला फरक मैत्रिणी हिशोबांत घ्यायच्या नाहीत हे सुमन जाणून होती परतु तिचं तिला प्रामाणिकपणे वाटत होत की पुष्कळ फरक आहे. ती मैत्रिणीना म्हणणार होती, चंदूच माझ्यावर प्रेम बसल आहे म्हणून माझ लग्न होणार आहे, माझ्या लग्नात आणि मुलगी पाहून होणाऱ्या लग्नात फरक आहे महाराज !.... मैत्रिणीची चेष्टा बद करण्यासाठी आणखी काय बोलाव आणि चदूच्या कोणकोणत्या गोष्टी मैत्रिणीना सांगाव्या, याचा विचार मनाशी करीत सुमन खिडकीशी बसली होती....

"....हा हा बरोबर आहे. तेच गाडगीळ.... " दादाचे शब्द तिला ऐकू आले.

" मला वाटत त्याना तीन मुलगे आहेत–" दादाच्या समोर बसलेला किडकिडीत चष्मेवाला म्हणाला.

" हं. हा मधला मुलगा. चदू त्याचं नांव. बर्मा शेलमध्यें मोठी नोकरी आहे. "

" छान ! जमू द्या तुमचं."

" जमल्यासारखंच आहे. उगीच म्हातारीच्या समाधानासाठीं मुलगी दाखवायची एवढंच. अथरुणावर खिळून पडलेल्या ऐंशी वर्षांच्या आंधळीला मुलगी काळी की गोरी हें तरी कळेल की नाहीं कुणास ठाऊक ! पण आपलं–" दादा खो खो करून हसले.

तो किडकिडीत चष्मेवालाहि हंसला, आणि म्हणाला, " पण तुमची मुलगी इतकी गोरी आहे की आंधळ्या माणसालादेखील तिचं रूप दिसेल."

त्याच्या तोंडची ती प्रशंसा ऐकून सुमनला बरं वाटलं. तथापि मनांतल्या मनांत तिला दादांचा राग आला होता, तो कांही कमी झाला नाहीं. प्रवासांत भेटलेल्या अनोळखी माणसाला कशाला सांगायचं मुलीला दाखवावयासाठी मुबईला घेऊन चाललो आहे म्हणून ? दादांचा बोलघेवडा स्वभाव मुलखावेगळाच म्हटला पाहिजे असं सुमनला पुष्कळदां वाटे. त्यांचं

आणि त्या किडकिडीत चष्मेवाल्याचं गाडगीळपुराण बंद व्हावं म्हणून दादांना हळूंच एक चांगला चिमटा काढावा असं सुमनच्या मनांत आल्यावाचून राहिलं नाही.... पण तसं करणं शक्य नव्हतं. 'चालू दे तुमचं !' अस मनाशी म्हणून पुस्तकांत तोंड घालण अधिक सोपं. सुमननं तें केलं. मात्र पुस्तकांतल्या मजकुरावरून तिची नजर फिरण्याऐवजी ज्या दोन चार भेटीत तिचा आणि चदूचा परिचय वाढला होता त्या भेटीच्या स्मृतिचित्रांवरून ती फिरूं लागली.

तिच्या कचेरीतल्या मडळीनी स्नेहसमेलनाच्या वळेस नाटक करायचं ठरविलं होतं, आणि नाटकांत काम करण्याचा त्यांचा आग्रह तिला मान्य करावा लागला होता. जिथें रोजच्या तालमी होत ती जागा तिच्या घरापासून दूर होती. परंतु सायकलवरून जाताना येतांना तिला सोबत हवी तेवढी मिळे. नाटकातल्या इतर दोन स्त्री–पात्राची कामं करणाऱ्या तिच्या ऑफिसांतल्या इतर दोन मुली होत्याच, पण शिवाय तिला सोबत करण्याच्या बाबतीत पुरुषपात्राचीसुद्धा अहमहिका लागे. नाटकांतली मुख्य पूरुषभूमिका करणारा बाळ इनामदार तर तिच्याबरोबर जायला आणि यायला सदा एका पायावर तयार असे. तिच्या दोन मैत्रिणी येण्याच्या आधीच अगणात सायकल ठेवताना तो घंटा वाजवी ती ऐकूं येई. आणि मागोमाग त्याची ललकारी उठे, "काय हो, किती अवकाश?" कधी कधी तो येऊन दाखल होई त्या वेळेस तिचं रात्रीचं जेवण चाललेलच असे.

पण एके दिवशी इनामदारान ऑफिस सुटण्याच्या जरा आधी तिच्या टेबलाजवळ येऊन तिला हळूच सागितल, "आज रात्रीं मी उशिरा येईन बरं काय."

सुमनन विचरलं, "मग मी तुमची वाट न पाहतां पुढें जाईन."

"छे छे ! पुढें नका जाऊं. थाबा."

"पण तुम्हाला उशीर होणार आहे ना ?"

"तुमच्या घरी यायला उशीर होणार आहे. पण तालमीच्या जागीं आपण वेळेवर पोचू."

"तें कसं काय ? कांही जादू आहे की काय ?"

"हो ना ! मोटारगाडी घेऊन येणार आहे !"

"तुम्ही ?"

तो हसला आणि म्हणाला, "तुमच्या प्रश्नाच्या स्वरांत अगदी उघड असा अर्थ आहे की माझ्यासारखा भुक्कड माणूस कुठली आणतो मोटार–"

तशा अर्थानेच तिनं 'तुम्ही' असा उद्‌गार काढला होता यांत शकाच नव्हती. परतु त्याच्या बोलण्यानं ती शरमली, आणि हंसून म्हणाली, "इश्श्य ! तसं नाही हो."

तो म्हणाला, "नाही कसं, तसच आहे ! परंतु तुमच्या बोलण्याचा मी राग नाही मानीत. आम्ही बोलून चालून आहोतच गरीब भुक्कड. आमची कितीही इच्छा असली तरी आम्ही कसले आणणार तुमच्यासाठी कधी मोटार ? पण माझी मोटार नसली तरी मोटारवाले दोस्त आहेत ना माझे. याला म्हणतात भाग्य नबर दोन !–"

त्याच्या बोलण्यान सुमनला खुदकन् हंसू आलं. बाळ इनामदाराचं विनोदी बोलणं कधी कधी तिला फार आवडे, आणि तिला एकदम हसूं येई. अशा वेळी तिच्या मनात येई, आपल्याला खूष करण्यासाठी पुढें पुढे करणाऱ्या सगळ्या तरुणात बोलण्याचालण्याचं चातुर्य या बाळच्या ठिकाणींच सर्वांत अधिक आहे ....

बाळ इनामदार पुढे म्हणाला, "माझा मुबईचा एक दोस्त आहे. तो दोन दिवसासाठी येणार आहे. त्याची झक्कपैकी नवी कोरी मोठी गाडी आहे. त्याची गाडी घेऊन येईन मी आज रात्री तुम्हांला न्यायला. म्हणून म्हटलं नेहमीपेक्षा जरा उशीर होईल मला."

"पण मालती आणि पुष्पा येतील ना माझ्याकडे सायकलवर रोजच्याप्रमाणें ?"

"त्याना सांगा आज परस्पर जायला."

त्याच्या स्वरांत मोटरच्या मालकाला शोभेल अशी तुच्छता होती. सुमनला हंसूं आल. तिला वाटलं त्याची चेष्टा करावी, पण तेवढ्यांत "बरं आहे. गाडी घेऊन येतों हं." म्हणून बाळ इनादार दूर गेलासुद्धां !

त्या दिवशी रात्री ती एका मोठ्या मोटारगाडीतून तालमीला गेली आणि तालमीहून परत आली. इतक्या थाटबाज गाडींत ती पूर्वी कधीं

बसली नव्हती. दुसऱ्या दिवशी रविवार असल्यामुळे नाटकाची तालीम दुपारीं झाली. तालीम सपल्यावर गाडीत बसता बसता बाळच्या मित्रान विचारलं,

" जरा दूरची चक्कर काढायची का गाडीतनं ? का यांना घरी जायची घाई, आहे ? "

बाळन आपल्या मित्राचा प्रश्न एखाद्या दलालाप्रमाणें सुमनपर्यंत नजरेनं पोंचविला.

तिनं हसून दलालामार्फत विचारलं, " कुठे जायच ? "

" कुठे तरी. घरी जायची घाई नाही ना ? "

ती म्हणाली, " पण फार उशीर नाही हो होता कामा. "

" बर, बरं " अस म्हणून बाळचा मित्र हसला, आणि गाडीत चढला.

चंदू गाडगीळशी सुमनची पहिली ओळख झाली ती अशी.

चंदू परत मुबईस जाण्यास निघाला तेव्हा बाळने त्याला आमत्रण दिलं, " आमच नाटक पाह्यला ये की. "

" केव्हा आहे ? "

" पुढच्याच्या पुढच्या शनिवारी. "

" अस होय ? "

" येशील ना ? "

" त्याच वेळेस मला कंपनीच्या कामासाठी बडोद्याला जायच आहे. "

" तें आधी कर किवा पुढे ढकल. "

" पाहतों. "

" पाहू नकोस. नाटक पाह्यला ये. "

चंदूशी सभाषण करीत होता बाळ, पण चंदूची नजर होती सारखी सुमनकडे.

बाळ सुमनला म्हणाला, " याला तुमचा आग्रह हवा असं दिसतं आहे. "

बाळला टप्पल मारून चंदू म्हणाला, " चल ! "

सुमन चदूला म्हणाली, " या ना आमचं नाटक पाह्यला. "

" पुढच्याच्या पुढच्या शनिवारी, नाहीं का ?–"

बाळनं त्याला चिमटा घेतला आणि म्हटलं, " अॅं हॅं ! काय लेकाचा

नाटक करतो आहे विचार करण्याचं." हंसतहंसत तो सुमनकडे वळून म्हणाला, " आता त्यान कबूल केल हो ! मला विचारा."

चदू म्हणाला, " हां महाराज, कबूल नाही हं केलं. पण यायचा प्रयत्न करीन एवढच सांगतो."

सुमन बाळकडे पाहून म्हणाली, " बघा–"

बाळन तिला सागितल, " तो तोडान कांही म्हणू द्या हो. तो अगदीं नक्की येणार. माझ भविष्य खर ठरतं की नाही! बघा."

इनामदाराच भविष्य खरं ठरल होत. चंदू गाडगीळ नाटक पाह्यला आला होता. आपल्याला नाटक फार आवडलं अस तो म्हणाला होता. पण खरं म्हणजे त्याला सुमनला सांगायचं होतं मला तुम्ही फार आवडलांत. मग आणखी दोन वेळा तो गाडी घेऊन पुण्याला आला होता. आणि त्यानंतर मागणी घालण्यासाठी त्याच्या बापाच पत्रच आल होत ....

दादानी तिला विचारल होत, " काय करायचं ? हूं म्हणायचं काय ?"

लाजेनं सुमनचे गाल कढत झाले होते. तिनं फक्त मान हलवून रुकार दर्शविला होता ....

आणि आतां ती दादांच्या बरोबर मुबईला निघाली होती !

त्या किडकिडीत चष्मेवाल्या माणसाबरोबर चाललेल्या दादांच्या गप्पा ऐकता ऐकतां, पुस्तकातल्या मजकुरावरून डोळे यांत्रिकपणें फिरवितां फिरवितां, मध्येच खिडकीतून बाहेर पहातां पहातां, सुमनच्या मनांत चदूच्या आठवणी जशा येत होत्या, तसाच एक चमत्कारिक विचारहि येत होता. सुगंधी फुलाच्या हारात उग्र वासाची हिरवट, चरचरीत पानं मधून मधून असतात तसे आठवणीच्या मालिकेत त्या विचाराचे फाटे घुसत होते. चंदूशीं लग्न करायचं तिनं ठरविलं होतं, त्याला आपण आवडलों आणि हीच मुलगी मला हवी असा हट्ट त्यान आपल्या बापाजवळ धरून मागणी घातली याचा तिला अभिमान वाटत होता, परंतु तिला चंदू आवडला होता. काय ? अगदीं सर्व दृष्टीनी आवडला होता काय ? तो जसा तिच्यावर लुब्ध झाला होता तशी ती त्याच्यावर लुब्ध झाली होती काय ? हीच बायको पाहिजे म्हणून त्यानं हट्ट धरला होता तसा हाच नवरा पाहिजे असा तिच्या मनाचा हट्ट होता काय ? ....या साऱ्या प्रश्नांची 'नाही', 'नाहीं' अशीं उत्तरं देणं

तिला भाग होतं, आणि मनांतल्या मनांत सुमनला त्याची फार खत वाटत होती....

चंदूच्या रूपावर ती भाळली नव्हती. त्याच रूप अगदी सामान्य होत त्याच्या बोलण्यावरहि ती भाळली नव्हती. तेहि सामान्य होत. पण तो मोठ्या श्रीमत कुटुबातला होता, त्याला खूप लठ्ठ पगाराची नोकरी होती, तो आपल्या बायकोचे ख्यालीखुशालीचे सारे लाड सहज पुरवू शकेल हे उघड होतं. त्याच्या पैशावर सुमन भाळली होती. ऑफिसातल्या नोकरीचा तिला कटाळा आला होता. ती खर्डेघाशी, ती गुलामगिरी, आणि जो फार वाढण्याची कधी शक्यता नव्हती असा तो पगार, हें सारं एखाद्या कोडीसारखं तिला वाटू लागल होतं. त्या अधाऱ्या कोडीच्या टोकाशी बाहेर पडायची एकच वाट होती—लग्न ! पण सुमनला माहीत होतं, की आपले दादा काही मोठा हुडा देऊ शकणार नाहीत आणि साधारण स्थितीतलाच नवरा आपल्या वाट्याला येणार. आपल गोरपान रूप पुरुषाना मोहून टाकणारं आहे हे तिला कळत होत. परंतु श्रीमतीच्या अभावी त्या रूपाच काय चीज होणार होत ? त्या रूपावर भाळणारा पुरुष फार फार तर दोन तीनशें मिळविणारा, तीन खोल्यात ससार माडणारा, महिन्याकाठी तिला एखाद पातळ घेईल आणि एखादे वेळेस सिनेमाला नेईल असा, आणि मुलबाळं झाल्यावर ज्याला पैशाची काळजी सतत करावी लागेल आणि ज्याच्या डोक्यावरच टक्कल अधिकाधिक मोठ होईल असाच असणार होता.... नोकरीच्या कोडीतून ती बाहेर पडली तरी संसाराच्या निराळ्या कोडीतच सापडणार होती....छे ! लग्नात काही अर्थ नव्हता. म्हणूनच बाळ इनामदारसारख्या कांही तरुणावर तिच प्रेम थोडं फार बसल तरी तिनं आपल मन आवरून धरलं होत....तिला प्रेमाची मौज कळत होती. परंतु श्रीमतीसकट प्रेम तिला हव होत !....

चदूची आणि तिची ओळख झाली, तो आपल्या नादी लागत आहे हें तिच्या लक्षात आलं त्याबरोबर तिला वाटलं की जें कधी मिळणार नाहीसं वाटल होत, तें आपल्याला मिळण्याची शक्यता आहे. चंदूविषयीं तिला प्रेम वाटेना. त्याचं रूप, त्याच बोलणचालणं कशाबद्दल तिला जबरदस्त आकर्षण वाटेना. त्याच्या संगतींत बसल्याबसल्या तिला पुष्कळदां वाटे, छे,

हें काही तरीच. परंतु मनाची ही उसळी ती प्रयत्नान घालवी. तो तिच्यावर अगदी भाळून गेला होता, आणि तो खूप श्रीमंत होता या दोन गोष्टी अगदी निर्विवाद होत्या. त्याच्याशी लग्न केल्यानं ती श्रीमताची लाडकी बायको होणार होती याबद्दल सशयाला जागा नव्हती....! झाल तर, आणखी काय पाहिजे ? माझ प्रेम नसल तरी त्याच तर खूप आहे ना ? प्रेम करण्याचा आनंद मला मिळाला नाही तरी करून घेण्याचं सुख तर अगदी मुबलक माझ्या वाटचाला येईल ना ? झाल तर ! .... तिनं चदूशी लग्न करायच ठरविल.

परंतु एखाद्या पुरुषाच्या प्रेमात सापडून त्याची बायको होण्यांत कांही वेगळीच मजा असणारच असा विचार सुमनच्या मनांत नेहमी येई, तसा आतादेखील पुन्हा पुन्हा येत होता.... इतकंच नव्हे तर ती स्वतःला मधूनच विचारीत होती–ज्याला प्रेम म्हणतात त्याचा अनुभव मला केव्हां बरं आला ? कधी आला की नाही ? एखाद्या पुरुषाला पाहताक्षणीच भाळावं अशी माझी अवस्था कधी झाली की नाही ?....चंदूच्या आजीला दाखवायला म्हणून ती चालली होती, चदूशी तिचं लग्न होणार हें जवळजवळ निश्चित होत, आणि तरीदेखील हे विचार तिच्या मनांत येत होते याचा तिला चमत्कार वाटला. असे विचार करण बरं नाही असदेखील तिला वाटलं. तिनं स्वतःशीच मानदेखील झटकली. पण डिक झाडायसाठीं बोट झटकाव तों तो अधिकच चिकटावा तसे ते विचार तिच्या मनाला अधिकच बिलगले. कोणता बरं पुरुष पाहताक्षणीच तिला आवडला होता ? कुणावर ती भाळली होती ? बाळ इनामदार ? बंडू गोखले ? राजा देशपांडे ? छे ! हे पुरुष तिला कांही ना कांही कारणानं आवडले होते, परंतु ज्याला भाळणं म्हणतात त्याचा अनुभव तिला नव्हता आला ! .... प्रेमात सापडणं असं ज्याला म्हणतात त्याचा अनुभव आपल्याला कधी आलाच नाही असा निष्कर्ष काढण्याच्या बेतात ती होती–

इतक्यात—

" टिकेट्स प्लीज ! " असे शब्द तिला ऐकू आले –

तिन मान वर करून समोर पाहिलं –

बाकांच्या चार रांगांपलीकडे डब्याच्या टोकाशी पांढरा स्वच्छ युनिफॉर्म

"पुष्कळ पुरुषांचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन बोलते आहेस असं जरी मला सांगितलं असतंस तरी मला मत्सर नसता वाटला. तूं तरी मला काय विचारलंस माझ्या स्वत:बद्दल ? "

ती म्हणाली, "तुम्ही विचारलं नाही त्यामुळें मला वाटलं, मी तरी कसा चौकसपणा करू ? कदाचित् तुम्हाला आवडायचा नाही."

"खर सागायचं तर आवडल नसतंच. माझ नाव तुला माहीत झालं आहे, माझा स्वभाव — थोडा का होईना — कळला आहे, मला तुझी संगत हवीशी वाटते. एवढ पुरेसं व्हाव तुला. तुझ नाव 'सुरेखा' आहे. तूं देखणी आहेस, सभाषणात चतुर आहेस, हुशार आहेस, आनदी आहेस, मी मागतों तेवढा तुझा सहवास मला मिळतो आहे, एवढंच मला पुरेसं आहे. एकमेकांविषयी आणखी माहिती तुला आणि मला कशासाठी हवी आहे ? ती न झाली तर चालायच नाही ? इतकंच काय, ती झाली तर कदाचित् आपण एकमेकांना नकोशी वाटूं लागूं ! "

ती एकदम म्हणाली, " हें मात्र मला नाही पटत —"

तिच्या नजरेला नजर देऊन तो हंसला, परतु चर्या गभीर करून गप्पच राहिला. जणूं बोलण्याची त्याची इच्छा नव्हती.... परंतु हसऱ्या नजरेनं तिन विचारल, "बोला ना, बोला !" तें पाहून तो म्हणाला, "चटकन् कुणाला पटायचं नाही असच बोलतो आहे मी, माहित आहे मला. पण तुला सांगू, एक चमत्कारिक प्रयोग करूत पाह्यचा आहे मला."

" प्रयोग ? "

"हा, प्रयोगच म्हणायचा. कारण मला जे करून पाह्यचं आहे ते साधेल किवा साधणार नाही, शहाणपणाचं ठरेल, किंवा वेडेपणाचं ठरेल. म्हणून त्याला 'प्रयोग'च म्हणूं या. एकमेकाच्या पूर्वचरित्राबद्दल किंचित्‌देखील माहिती नसतांना, व भविष्याची मुळीदेखील कल्पना नसताना, केवळ प्रत्यक्ष मिळणाऱ्या सहवासाच्या आनंदासाठी दोन व्यक्ती एकमेकावर प्रेम करूं शकतात की नाही मला पाह्यचं आहे "....तो किंचित् थांबला. जणू त्यानं 'प्रेम' हा शब्द वापरला ते तिला आवडलं कीं नाहीं याचा अदमास त्याला घ्यायचा होता. तिनं हसत मान हालविली. त्याला बरं वाटलं. तोही हसला आणि पुढे म्हणाला, "म्हणजे असं म्हणेनास कीं ज्या प्रेमाला भूत

कालांतलं कांही दिसत नाही आणि भविष्याबद्दल कसलीहि अपेक्षा नाहीं असं, केवळ वर्तमानकाळांतल्या आनंदावर रमणारं प्रेम असूं शकतं कीं नाही मला पाह्यच आहे. चमत्कारिक प्रयोग आहे हा. असला प्रयोग करण्याचं माझ्या मनांत कधीदेखील आलं नव्हत. पण तुझा अकस्मात् परिचय झाला, आणि या प्रयोगाची कल्पना माझ्या मनात आली तो प्रयोग मी करतों आहे. तुलाहि करायला लावतो आहे. या प्रयोगाची अखेरी काय होईल असं तुला वाटतं ? ''

ती एकदम हसली. त्यान विचारलं, " का ? हंसलीस का ? " तिन उत्तर दिल, " तुमचा प्रश्न हास्यास्पद नाही का ? अहो, भविष्याचा विचार मुळीच करायचा नाही हा तर तुमच्या प्रयोगाचा एक भाग आहे. आणि तरी प्रयोगाची अखेरी कशी होईल याचा विचार तुम्ही करतां ? ''

" अरे होय. खरंच की ! '' अस म्हणून तो मोठ्यादा हसू लागला. " माझ्या प्रयोगाच मर्म माझ्यापेक्षाहि तुझ्या अधिक लक्षात आलं आहे म्हणायच. ''

" मी हुशार आहे असं सर्टिफिकेट तुम्ही मघाशीच दिल नाहीत का मला ? ''

" आता त्या सर्टिफिकेटात ' फार ' असा आणखी एक शब्द घालायला हवा ! तू फार हुशार आहेस ! ''

ती म्हणाली. " बरं, बरं. पुरे. ''

" आणि हुशार तशीच फार सुदर आहेस. '' असं म्हणून त्यानं तिचा हात धरला.

तिन तो त्याच्या हातांत राहूं दिला. एका मोठ्या झाडाच्या बुध्याला टेकून ती बसली होती. तिच्या पायाशीं भास्कर हिरवळीच्या गालिच्यावर उताणा पडला होता. जमीनीच्या उतरत्या पट्ट्यावर वृक्षाची लहान मोठीं पानं पडली होती. वाऱ्याची झुळूक आली की पानं पुढें मागं सरकत होतीं व सळसळ वाजत होती. रानफुलांचे पांढरे, पिवळे, जाभळे, लाल रंग जागोजाग सांडल्यासारखे दिसत होते. पलीकडे खोल दरी होती. झाडाच्या फांद्यांनी आणि वेलींच्या दाट जाळ्यांनी दरीतलं भूपृष्ठ झांकलं होत. या दृश्याकडे पाहतां पाहतां आणि भास्करच्या हाताचा स्पर्श अनुभवितां

....१०

अनुभवितां ती विचार करू लागली, ' केवळ वर्तमानकालावर नजर ठेवणारं प्रेम असू शकेल ? ज्या व्यक्तीवर प्रेम जडल तिच्या गतायुष्याबद्दल मुळीदेखील जिज्ञासा न दाखविता प्रेम करण शक्य आहे ? भविष्याची कसलीही आशा–अपेक्षा न धरता प्रेम करता येईल ? .... ' विचार करता करता तिला वाटल की हा प्रश्न थोडासा बदलून विचारायला हवा. उजव्या डाव्या अंगाची कोणतीही वस्तु दिसू नये म्हणून घोड्याला कातड्याची ' आधळी ' लावतात आणि तें घोड नाकापुढच्या रस्त्यान जातं, त्याचप्रमाणे भूतकालात आणि भविष्यकालात नजर मुळीसुद्धा न टाकता स्त्रीपुरुषानी एकमेकाची सगत केली तर त्या सगतीत जी भावना निर्माण होईल, तिला ' प्रेम ' म्हणता येईल का, असा हा प्रश्न वास्तविक आहे....तिच्या मनात आलं, वाटल तर ' प्रेम ' म्हणाव किंवा वाटल तर दुसरं नाव द्याव.... म्हणजे हा भास्कर म्हणतो त्याप्रमाणे गहन तत्त्वज्ञानाचा हा प्रश्न नाही. उगीच शब्दाच भाडण आहे झाल.... मनाशी असा निष्कर्ष काढून ती हंसली....तिच्या पायाशी उताणा पडलेल्या भास्करच्या जरा पलीकडे एका पिवळ्या फुलावर फुलपाखरू बसल होत. त्याचे ठिपकेदार मऊ पातळ पख थरथरत होते....त्या फुलझाडाच्या मुळ्या जमीनीत खोल कुठे आहेत तें त्याला माहीत नव्हत. तें पिवळधमक फूल घटकाभरान झाडावरच डोलत राहणार आहे की गळून मातीत पडणार आहे याची त्याला कल्पना नव्हती. परतु त्या फुलातले केसर त्याला आकर्षून घेत होते. त्या क्षणाच्या सुखान त्याचा इवलासा जीव शहारत होता.... याला प्रेम म्हणता येईल काय ? .... हा प्रश्न मनात आल्यामुळे तिला आणखीच हसू आलं.

भास्करन तिचा हात दाबला आणि विचारल, " का हसलीस ? "

सुरेखाला वाटल, आपल्या मनात जें जें येऊन गेलं तें तें त्याला सांगून टाकाव परतु जे मनात आल तें अगदी स्पष्ट आणि स्वच्छ असल्यासारखं जरी आपल्याला वाटल तरी तें सांगताना आपला फार घोटाळा उडेल अशी शंका तिला आली. तिनं मान हलविली आणि म्हटलं, " कांही नाही. "

एके दिवशी ती दोघ आपल्या नेहमीच्याच जागी नेहमीसारखींच बसली असतांना एकाएकी जोराचा वारा सुटला, आकाशात काळ्याभोर ढगांची हालचाल झाली, आणि पावसाची चिन्हं दिसूं लागली. निसर्गाचा तो खेळ

डोंगरमाथ्यावरच्या जागी बसून पाहण्यांत गंमत होती. पण पावसाचे मोठाले टपोरे थेंब सळसळ वाजूं लागले तेव्हा सुरेखा म्हणाली, " आतां मात्र मुक्काम हालविला पाहिजे ह. "

भास्कर हंसला आणि म्हणाला, " वा ! आतां तर खरी मजा आहे. "

" पावसात भिजायची लहर आली आहे वाटत ? "

" भिजतों कशानं ? आलाच पाऊस तर त्या पलीकडच्या जाळीत आश्रय घेऊ भोवतालची सारी सृष्टि नहात आहे आणि आपण मात्र निवाऱ्याच्या जागी ऐटीत उभे आहोंत अशा अनुभवांत केवढी मजा आहे, नाहीं का ? आणि मला विचारशील तर पाऊस या जागी पडायचा नाही. वारा बघ कुणीकडचा वहातो आहे. सारे ढग धूम ठोकीत चालले आहेत तिकडे दूर दरीकडे. तिकडे कोसळेल पाऊस, इथे नाही पडायचा. पैज ! "

त्याचा तो अदमास खरा ठरणार असं क्षणभर दिसल. वाऱ्याचा झपाटा ढग दरीच्या बाजूला लोटून नेत होता. तडातडा वाजणारे थेब दूरदूर जात होते. भास्कर हसून सुरेखाला म्हणाला, " पाहिलस ? "

सुरेखा हसली आणि म्हणाली, " हवामानखात्यात नोकरी केलीत वाटत काही दिवस ? "

" आम्ही नाही सांगणार ! मागच्या गोष्टी एकमेकाला विचारायच्या नाहीत असा आपला करार झालेला आहे, विसरलीस वाटतं ? "

" हो. खरच की. " ती हंसली.

परतु एखाद दुसर मिनिट गेलं नसेल तोच वाऱ्याची दिशा एकाएकी बदलली. एखाद्या सैन्यानं मोहरा फिरवावा त्याप्रमाणें दूर गेलेले ढग हेलकावे खात जवळ आले. थोडीशी मेघगर्जना झाली. आणि मोठाल्या थेबाचा मारा सुरू झाला.

" कुठे गेलं आपलं भविष्य, महाराज ? " सुरेखानं उजवा हात नाचवीत विचारलं. " आता तरी बैठक मोडायची आहे की नाहीं ? "

बसल्या बसल्या भास्करन दोन्ही हाताचे तळवे किंचित् मागें करून हिरवळीत रोवल्यासारखे दाबले होते, आणि हनुवटी उचलून तोंड आकाशाकडे केलं होतं. त्याच्या उघडया तोंडांत पावसाची धार पडली. डोळे मिटून त्यानं आनंदाचा उद्गार काढला, 'आः ! ' डोळे उघडून सुरेखाकडे

बघत तो म्हणाला, " ढगातल पाणी सरळ तोंडांत पडल की त्याला खरोखर अमृताची चव असते ! "

" दोन–चार थेंब पडले आहेत तोवर ठीक आहे. मुसळधार पावसांत असे बसून राहिलांत तर अमृतातला ' अ ' नाहीसा व्हायला वेळ नाही लागायचा. उठा, उठा ! " तिन हातरुमालान त्याचं तोंड खसाखसा पुसल आणि त्याचा हात धरून ती त्याला ओढू लागली पुन्हा गरजलं. पावसाच्या सरी जोरात आल्या. भास्कर चटकन् उठला. दोघ हातात हात गुतवून दूरच्या एका मोठ्या झाडाखाली जाऊन जाळीत उभी राहिली.

" चागलीच फजिती झाली आपली ह. " सुरेखा म्हणाली.

तो म्हणाला, " फजिती ? वा ग वा ! असा प्रसंग मुद्दाम घडवून आणायचा म्हटला तर आणता येणार नाही. निसर्गाच अस रूप घरात बसून कधी पाह्यला मिळेल का ? " त्यान हात सभोवार फिरविला आणि म्हटल " पहा, पहा तरी ! "

त्याच म्हणण खोट नव्हतं. साऱ्या दिशा धुद झाल्या होत्या. सूर्यबिब कोणत्या बाजूला आहे कळत नव्हत. रानवारा घोगावत होता. घुसळलेल्या ताकावरचा फेस हालावा त्याप्रमाणे ढग हालत होते. झाडाच्या फाद्या हेलकावे खात होत्या. पान, फळ टपाटपा पडत होती. डोळ्याना दिसणारा सारा विस्तार विचित्र गाभीर्यान आणि रुद्रतेन गच्च भरल्यासारखा भासत होता. मधूनच गडगडाट होत होता.

तो झाला की सुरेखा डोळे झाकून घेई आणि किचाळून शहारे देई.

भास्करन विचारल, " भीति वाटते ? "

ती म्हणाली, " फार भीति वाटते मला. आणि तुम्ही म्हणतां, देखावा फार सुदर आहे. "

" खरच, फार सुदर आहे. तू डोळे झाकून घेतले आहेस, मग दिसणार कसा तुला ? ' त्यान तिच्या जवळ सरकून तिचे हात दूर केले.

तितक्यात गडगडण्याचा आवाज झाला. तिनं झटकन् हात सोडवून घेऊन आपल्या डोळ्यावर ठेवले, आणि किंकाळी फोडली. पुन्हां काड् काड् आवाज झाला, आणि पा ीवर एखादी रेघ ओढावी त्याप्रमाणे डोळे दिपविणाऱ्या विद्युल्लतेचा लोळ ढग फाडीत एका रेषेत उमटून नाहीसा झाला.

" चला, इथून चला ! असं मोकळ्या रानांत झाडाखाली उभं राहणं फार वाईट. " ती त्याला जोरजोरान ओढू लागली.

गडगडाट होतच राहिला. क्षणात वाटे तो समोर झाला, क्षणात वाटे मागं झाला. तो उजवीकडून ऐकू येई. डावीकडून झाल्यासारखा वाटे. जणू रणांगणावरचे तोफखाने सुरू झाले होते, व चहूकडून धुडुम् धाड् धडाड् असे आवाज करीत होते.

" चला हो चला ! मरायच आहे का ? वीज पडणार खचित !"

" वेडी तर नाहीस तू ? वीज पडत नाही – कांही होत नाही."

" पण मला फार भीति वाटते. चला ! " तिनं त्याचे हात ओढले व तो जगचा हलेना तेव्हा ती म्हणाली, " तुम्हाला यायचं नसेल तर मी एकटी जाईन हं. "

ती खरोखरच निघाली. भास्करनं मोठ्यादा हांका मारल्या, " सुरेखा, सुरेखा. " पण तिन ऐकलं नाही.

तितक्यांत वीज अशी काही कडाडली की कानठळ्याच बसाव्या. आणि तिचा लोळ लख् लख् करीत आकाशात असा काही वांकडा तिकडा फिरला की तो पाहून डोळ्यापुढे अंधारीच यावी.

त्याबरोबर सुरेखा धावत परत आली. तिन किंकाळी फोडली, आणि भास्करला घट्ट मिठी मारली. आभाळात पुन्हा काड् काड् आवाज झाला. भास्करच्या गळ्याभोवती टाकलेले हात सुरेखान आणखीच सरकविले. ती त्याला लोंबकळल्यासारखी बिलगली.तिच तोंड त्याच्या अगदी ओठाशीं लागलं. त्यानं तिचं चुंबन घेतलं. एकदा! दोनदां ! पुन्हा पुन्हां ! अनेकदां ! ....

दुसऱ्या दिवशी आभाळ स्वच्छ होत. हवा प्रसन्न होती. ती दोघं नित्याप्रमाणें ठरलेल्या जागी आली, जेवली, बसली, बोलली. आदल्या दिवशीं जें घडलं त्याचा उल्लेख त्यानं केला नाही, तिनं केला नाही. परंतु अखेर परत जाण्यासाठी जेव्हां ती उठली आणि तिनं त्यांचा हात सहज धरला तेव्हां त्यानं तिला ओढीत आदल्या दिवशीच्या त्या मोठ्या झाडाखालच्या जाळींत नेलं. तिन नको म्हटलं नाहीं. उलट जाळीत पोंचल्याबरोबर तिनं आपले दोन्ही हात त्याच्या गळ्यांत टाकले. त्यानं तिला किंचित् उचलल्यासारखं केलं आणि तो तिचे मुके घेऊं लागला.

दुसऱ्या दिवशी ती नित्याप्रमाणें सकाळी दहा वाजण्याच्या सुमारास त्याच्या हॉटेलवर आली.

दार सताड उघड होत. भास्कर खोलीत नव्हता ! तिनं चहूकडे दृष्टि टाकली. खुटाळ्यावर त्याचे कपडे नव्हते. टेबलावर त्याची एकदेखील वस्तु नव्हती. पलगाखाली त्याची सूटकेस असायची तीदेखील नव्हती. कोपऱ्यात त्याचे पॉलिश केलेले बूट असायचे ते नव्हते....आपण भलत्याच खोलीत आलो की काय अशा शकेनं सुरेखान इकडे तिकडे पाहिलं....ती त्याचीच खोली होती ! ....

तिन मॅनेजरकडे जाऊन चौकशी केली तेव्हा तिला कळलं की तो सकाळी पहिल्या बसन निघून गेला होता. कुठें ? कुणास ठाऊक ? .... मॅनेजरला माहीत नव्हतं. त्यान जाताना तिच्यासाठी एक पत्र लिहून ठेवलं होतं, ते मॅनेजरन टेबलाच्या खणांतून काढल आणि तिच्या हाती दिलं.

तिन ते उभ्या उभ्याच फोडल आणि वाचण्यास सुरुवात केली. प्रारभीचा थोडा मजकूर वाचल्याबरोबर कडेच्या भिंतीलगत माडलेल्या खुर्च्यांपैकी एकीवर ती बसली, आणि पुढें वाचूं लागली.

" प्रिय सुरेखा,

मी निघून जात आहे. कुठे ते सागत नाही. तू मला विसरून जावस अशी माझी इच्छा आहे. माझा प्रयोग फसला म्हणून मी जातो आहे. तो फसला याचा दोष सर्वस्वी माझ्याकडे आहे. मी पराभव कबूल करतो.... केवळ वर्तमानकाळातल्या सहवासावर सतुष्ट राहून प्रेम करतां येतं की नाही हे मला बघायचं होतं. ते शक्य आहे अस मला वाटूं लागल होत पण यापुढें ते शक्य नाही अस मला कळून चुकलं आहे. तुझ्या मोहानं मी आणखी इथेंच राहिलो तर माझी सुखाची भूक वाढेल. भविष्याबद्दल आशा अपेक्षा माझ्या मनात उत्पन्न होतील. तुझ्याहि मनात उत्पन्न होतील. तें मला अगदी घडू द्यायचं नाही. आणि त्यासाठी तुझ्यापासून दूर निघून जाणं हा एकच उपाय आहे .... भविष्यकाळाला मी का भितों तें मी तुला कधी सागितल नव्हत. आता सागतो. आणि तें तुला कळाव म्हणून माझं पूर्वचरित्रही तुला थोडं सागतो ....

मी एक यशस्वी एंजिनिअर होतों. श्रीमत होतो. पण माझी प्रकृति एकाएकी ढासळू लागली. पुष्कळ दिवस तब्येतीच्या तक्रारीकडे लक्ष न देतां काम रेटीत राहिलो. एकदा एका मोठया धरणाच्या कामावर असतांना, खडक फोडण्याच्या कामावर देखरेख करीत असतांना सुरुंग उडाला, व माझ्या डोक्यात दगडाचे अणकुचीदार तुकडे शिरले. डॉक्टरानी ऑपरेशन् करून दोन तुकडे काढले मी पूर्ण बरा झालो. काम करू लागलो. नंतर कित्येक वर्षांनी जेव्हां डोकं फार दु:खूं लागलं आणि वरचेवर चक्कर येऊं लागली तेव्हा डॉक्टर म्हणू लागले, ऑपरेशनच्या वेळेस एखादा बारीक खडा तसाच राहिला असण्याचा संभव आहे. माझ्या दुखण्याचं दुसरं काही निदान डॉक्टरांना करता येत नव्हतं म्हणून त्याचा हा तर्क होता. शेवटी मुंबईतल्या सगळ्यात निष्णात सर्जनला मी भेटलों. त्यानं डझनभर 'एक्स रे ' फोटो काढले. एक अगदी बारीक अणकुचीदार तुकडा डाव्या कानशिलापाशी आहे असं तो म्हणाला. पण ऑपरेशन शक्य नाही असंहि त्यानं सांगितलं. मी त्याला विचारलं, 'मग उपाय ?' 'उपाय काही नाही.' मी त्याला विचारलं, 'मग माझं दुखणं असंच वाढायचं का ? ' तो म्हणाला, 'वाढेल. किंवा एखादे वेळेस कमी होईल. कोणताहि उपाय न करता एखादे वेळेस तें अजिबात नाहीसंदेखील होईल. असा चमत्कार कधी कधी होतो. मला नक्की सांगता येत नाही. पण वाढण्याचा संभव मात्र जास्त.' मी त्याला विचारलं, 'माझ्यापासून काही लपवू नका. आणखी किती दिवस माझं आयुष्य आहे सांगा.' तो म्हणाला, 'आमचं शास्त्र कितीहि पुढे गेलं असलं तरी असं भविष्य नाहीं सांगतां येत. तुमच्या आयुष्याची दोरी बळकट असेल–' मी म्हटलं, 'चांगल्यांत चांगलं नका सांगूं. वाईटात वाईट काय होईल तें सांगा.' तो म्हणाला, 'सहा महिन्यांच्या वर तुम्ही जगणार नाही.' मी त्याचे आभार मानले. त्याची फी आनंदानं दिली. धंद्याची आवराआवर केली आणि आयुष्याचे उरलेले सहा महिने अगदी मजेत घालवायचे असं ठरवून या हवेच्या ठिकाणीं निघून आलों....

– आणि इथें तू भेटलीस !

भूतकाल आणि भविष्यकाल यांच्याकडे मला कां बघायचं नव्हतं, आणि तुला बघू द्यायचं नव्हतं, ते आता तुझ्या लक्षात येईल. ज्या प्रेमाला भविष्यकाल आहे अस प्रेम करायला मी मोकळा नाही! ज्यातून कायमच्या सहवासाची इच्छा निर्माण होईल अस प्रेम तुला करू द्यायला मी मोकळा नव्हतो ! माझी भूक आतां केवळ वर्तमान-कालावर भागणार नाही अशी मला भीति वाटते. फार उशीर होण्यापूर्वीच मी तुझ्यापासून दूर निघून जाव हें उत्तम, असा विचार करून मी जात आहे. माझ्यावर रागावू नको. जो सहवास तूं मला दिलास त्याबद्दल काय लिहू ? 'थँक यू ' या दोनच शब्दात किती अर्थ आहे तो तू समजू शकशील अशी माझी खात्री आहे ....

तुझा–**भास्कर** "

पत्र वाचून झाल्यावर सुरेखा क्षणभर जागच्या जागीच खुर्चीवर बसली. मग ती हलकेच उठली आणि निघाली. भास्करच्या प्रयोगाचा असा शेवट होईल अशी तिची कल्पना नव्हती. उलट, गेल्या तीन दिवसात तिला असं वाटू लागलं होत, तो आता कायमचा आपला होईल .... परंतु उलट तो तिला कायमचा सोडून गेला होता.... ! रस्त्यातून जड पावलानी जाता जातां ती आश्चर्य करीत होती, पुरुष इतके निष्ठुर होऊं शकतात का ? .... खुशाल चालत होताना भास्करला काहीदेखोल वाटलं नाही ? परंतु लगेच ती मनाशीं म्हणाली, त्याला काहीच वाटल नसेल कसं ? खचित दुःख झालं असेल. परंतु डॉक्टरांनी त्याला जे सागितल होत तें त्याला विसरता येत नव्हतं. म्हणून तो असा वागला .... ती स्वगत म्हणाली, " त्यानं खरी गोष्ट उगीच माझ्यापासून लपवून ठेवली. ती मला कळली असती तरीदेखील माझ प्रेम कमी झाल नसत. अजूनदेखील तो भेटला तरी मी त्याला हेंच सागेन. ....परंतु तो आता कुठ भेटणार ? .... "

आपण निघून गेल्यावर सुरेखाच्या मनात काय येईल तें भास्करला ओळखता येत होत. म्हणूनच कुठे जातों तें त्यानं पत्रात लिहिलं नव्हतं. आपला मोह तिला किंचितूहि राहू नये अशी त्याची इच्छा होती. तिच्यावर तो जें प्रेम करू लागला होता त्याच्याशी सर्वथा हेंच सुसंगत होत. तो

तिच्यापासून दूर जात होता. त्यानं तिला लिहिलं होतं, मला विसरून जा ! तो स्वत: मात्र तिला विसरणार नव्हता. तिची आठवण ठेवणार होता. त्या आठवणीचं सुख हेंच त्याच्या वाट्याला आतां उरलेलं सुख होतं. तें तो जतन करणार होता. शेवटपर्यंत ! .... आतां शेवट दूरही नव्हता. दिवसा-दिवसानं, आठवड्या–आठवड्यानं तो जवळ येत होता. मरणाला तयार राहून त्याची वाट पहाण्याचा विचित्र अनुभव घेत भास्कर गांवोगांव हिंडत होता. मन मानेल त्याप्रमाणें मुक्काम करीत होता, हालवीत होता.

डॉक्टरांनी सांगितलेली सहा महिन्याची मुदत संपून गेली ! भास्कर मनाशी आश्चर्य करूं लागला, जे घडायचं तें अजून कसं घडत नाही ? आठ महिने संपले, दहा महिने संपले, होतां होता एक वर्षंदेखील झालं. आश्चर्य असं की भास्करची तब्येतीची पूर्वीची तक्रार कमी कमी होऊन नाहींशी झाली. भास्करला कळेना, मृत्यु किती दूर राहिला आहे. मृत्यूच्या भेटीला तो स्वत: तयार होता. परंतु त्याची ‘ केस ’ विसरल्याप्रमाणें मृत्यूच रेंगाळत होता....

अखेर दीड वर्ष पुरं झालं. मृत्यू अजूनही दूरच होता. मुंबईच्या स्पेशॅलिस्ट डॉक्टरानी भास्करला सांगितलं होतं ‘तुमची तक्रार वाढेल किंवा कमी होईल, कोणत्याही इलाजावांचून आपोआप नाहींशीं देखील कदाचित् होईल ’ तें त्याला आठवलं....त्याला हळू हळू वाटूं लागलं, आपलं दुखणं संपलं म्हणायचं....आणखी सहा महिने त्यानं प्रवासांत घालविले. मरणाची वाट पाहिली. मग मात्र त्याची खात्री पटली कीं आपण पुरते बरे झालों.

मुंबईच्या स्पेशॅलिस्ट डॉक्टरला पुन्हां एकदां प्रकृति दाखवावी अशा विचारानं तो मुंबईस गेला. डॉक्टरांच्या दवाखान्यांत जाऊन दाखल झाला. तिथें त्याला कळलं की मदतनीस डॉक्टर हॉस्पिटलचं काम पहात होता. मुख्य मोठे डॉक्टर विश्रांति घ्यायसाठीं गेले होते. ज्या हवेच्या ठिकाणीं त्याची आणि सुरेखाची दोन वर्षांपूर्वी भेट झाली होती त्याच ठिकाणीं....

भास्कर मनाशीं म्हणाला, बरंच झालं, डॉक्टर भेटतीलच, परंतु कदाचित् सुरेखादेखील भेटेल. आपण पूर्ण बरे झालों असं वाटूं लागल्यापासून

सुरेखाचे विचार त्याच्या मनांत वरचेवर येऊं लागले होते. त्याला वाटे, जिच्यापासून मरणाच्या भीतीन मला दूर व्हाव लागल तिच्याकडे आता परत जायला हरकत नाही. तिची भेट कुठ होईल हें त्याला माहित नव्हत. काही तर्क करता येत नव्हता. ती अजून लग्नावाचून राहिली असेल अशी आशा करण वेडेपणाच होत. परतु तिची आठवण झाली की त्याला वाटे, " त्याचा काय नेम, कदाचित् ती अजूनही अविवाहित असेल ! आणि त्याचा काय नेम, ज्या ठिकाणी ती पूर्वी भेटली तिथच पुन्हा भेटेलही ! निदान ज्या हॉटेलांत ती राहिली होती त्याच्या मॅनेजरकडून तिची माहिती काढतां येईल ! " स्पेशॅलिस्ट डॉक्टरच भविष्य चुकल होत. त्यान सागितलं होतं, " सहा महिन्याच्यावर तुझ आयुष्य नाही. " परतु दोन वर्षं होऊन गेली तरी तो जगला होता ! काळ चुकला होता ! .... पुन्हा प्रकृति दाखविण्याच्या हेतूनं मुबईच्या डॉक्टरकडे तो गेला तेव्हाच असा विचार करीत, की डॉक्टरनी ' ऑल वेल ' म्हणून सागितल की त्या सुदर हवेच्या ठिकाणाकडे धूम ठोकायची ! सुरेखाला गाठण्यासाठी ! ....

त्यामुळे डॉक्टर कुठे गेले आहेत ते कळल्याबरोबर तो मनाशी म्हणाला, " बरच झालं, एका दगडान दोन पक्षी मारता येतील ! डॉक्टरला गाठू. मग सुरेखालाहि ! .... " तो ताबडतोब मुबई सोडून निघाला.

हवेच्या ठिकाणी पोचल्यावर पूर्वी ज्या हॉटेलात तो उतरला होता तिकडेच तो सरळ गेला. रजिस्टर बुकात आपल नाव नोदताना त्यान सहज पाहिलं तो डॉक्टराच नांव त्याला दिसल. डॉक्टरांची ' पी. राव आणि मिसेस् राव ' अशी नोद पाहताच त्याला फार आनंद झाला. त्याच्या नावापुढच्या कॉलमात खोलीचा नबर लिहिलेला होता, तो त्यानं पाहिला. त्यान आपलं सामान आपल्या खोलीत फेकलं. घाईन तोंड धुऊन कपडे केले आणि डॉक्टराच्या खोलीकडे तो धावला.

खोलीला कुलूप होत. डॉक्टराचा खास नोकर हॉटेलच्या नोकराशी बोलत उभा होता. त्यानं सागितलं, " डॉक्टर आणि बाई मोटारीतून फिरायला गेली आहेत. "

भास्करन विचारल, " केव्हा येतील ? "

तो हंसला व म्हणाला, " त्याचं काय सांगावं ? आले तर लवकर येतील,

नाही तर लहर लागेल तितके फिरतील. बोलून चालून मजेसाठीं आले आहेत. "

" असं काय ? "

" तर ! डॉक्टराचं लग्न होऊन पंधराच दिवस झाले आहेत. बायकोला घेऊन आले आहेत मजा करायसाठी. "

भास्कर म्हणाला, " अच्छा ! डॉक्टर आले कीं मला सांगशील का ? मी याच हॉटेलात नबर नऊमध्ये आहे. "

नोकर म्हणाला, " सागायला नकोच. गाडीचा हॉर्न वाजला की समजा डॉक्टर आले. "

" अच्छा ! "

भास्कर आपल्या खोलीत परत आला, आणि न्याहरी मागवून तिचा समाचार घेतल्यावर डॉक्टराची वाट पहात बसला.

बऱ्याच वेळानं त्याला गाडीचा हॉर्न ऐकू आला. त्यान खिडकीकडे धांव घेतली, आणि हॉटेलच्या मधल्या आवाराकडे पाहिलं.

पों पो करीत एक भली मोठी ' डॉज् ' गाडी आवारांत शिरली, आणि फर्रर असा असा आवाज करून उभी राहिली.

डॉक्टर उतरले.

त्याच्या मागोमाग त्याची बायको उतरूं लागली, तिला त्यांनी दोन्ही हातानी उचलून खाली घेतलं.

तिच्याकडे पहातांच भास्कर चकित झाला. स्वत.च्या डोळ्यांवर त्याचा विश्वास बसेना !

....ती सुरेखा होती !

डॉक्टरनी तिच्या कमरेभोंवती हात लपेटला, आणि तीं दोघं मोठ्यांदां बोलत, मोठ्यांदा हंसत पायऱ्या चढून पलीकडच्या व्हरांड्यांत गेली ! डॉक्टरांच्या नोकरानं खोली उघडून दिली. ती दोघं आंत शिरलीं. डॉक्टरांनी कांहीं तरी काम सांगितलं तें करण्यासाठीं नोकर धांवला.

भास्कर खिडकीपाशींच उभा राहिला. त्याच्या डोळ्यांना जें दिसलं त्यावर विश्वास ठेवायला त्याचं मन तयार नव्हतं. परंतु विश्वास

ठेवण्यावाचून गत्यंतर नव्हत. सुरेखा डॉक्टरांची पत्नी झाली होती ! पंधरा दिवसांपूर्वींच !

प्रकृति दाखविण्यासाठीं भास्कर डॉक्टरांच्याकडे गेला नाही. जाण्याची इच्छाच त्याला उरली नव्हती. 'तूं आणखी शंभर वर्ष जगशील' असं जरी त्याला आतां डॉक्टरांनी सांगितलं तरी त्यात त्याला आनंद नव्हता !

काळ चुकला होता !

परंतु त्याप्रमाणे त्याच्या आणि सुरेखाच्या भेटीची वेळही टळली होती !

दुपारच्या बसून भास्करनं ते सुंदर हवेचं ठिकाण सोडलं !

# ७ . . . ऊन्ह आणि सांवल्या

स्पेशल वॉर्डातल्या लहानशा खोलीत ती दोघं हातात हात गुतवून कॉटवर बसली होती. तो बोलत नव्हता. तीहि स्तब्धच होती. बाहेरच्या आवारांतल्या उच उंच नारळीच्या हिरवट काळसर झावळचा खिडकीतून दिसत होत्या त्याकडे ती दोघंहि बघत होती....सुमारें दोन वर्षांपूर्वी एका घराच्या खिडकीजवळ ती दोघं उभी राहिली असतांना बाहेरच्या नारळीच्या झावळी त्याना अशाच दिसल्या होत्या. वाऱ्याबरोबर त्या हालत होत्या. खालच्या जमिनीवर पडलेल्या त्याच्या छायाहि हालताना दिसत होत्या. त्यानं तिला विचारल होत, "माझ्याशी लग्न करशील काय ?" तिचे डोळे चमकले होते. मान वळविण्यापूर्वी ती फक्त किंचित् हालवून तिनं त्याच्याकडे क्षणभर पाहिलं होत. तिचा रुकार त्याला समजला होता. त्यानं खिडकीतून समोर पाहिल तो वारा जोरानं वाहू लागला होता आणि त्यामुळे नारळाच्या झावळचा आणि त्याच्या सावल्या मोठाले हेलकावे घेत होत्या....हॉस्पिटलमधल्या खोलींत बसून बाहेर आवारातल्या नारळीच्या झावळचा पाहतां पाहतां त्याला दोन वर्षांपूर्वीच्या त्या दिवसाची आठवण झाली व त्यामुळे कांही बोलूं नये, गप्प बसावंसं त्याला वाटलं. तीही कदाचित् याच कारणानं काही बोलत नसावी असा तर्क त्यानं केला. किंवा कदाचित् आतां थोडयाच वेळांत होणाऱ्या ऑपरेशनचे विचार मनांत येऊन ती घाबरली असेल....

त्यानं तिचा हात दाबला. "भिऊं नकोस, सगळं कांही ठीक पार पडेल" असं त्याला सागायचं होतं. तिला तें समजलं व ती अगदी पुसट हंसली. जणु फार प्रयत्नानं ती हसली. परतु तिचं ते पुसट हसणं पाहूनही त्याला बरं वाटलं. त्याला वाटलं, नारळीच्या झावळचा पाहून जी आठवण आपल्याला

झाली ती तिला सांगावी. परंतु ती सांगितली तर तिला आनंद होईल अशी खात्री त्याला वाटेना "कशाला केलं आपण लग्न ?" असे स्पष्ट उद्गार तिन गेल्या दोन वर्षांत जरी तोंडावाटे कधी काढले नव्हते तरी तिच्या मनात ते आल्याचं कित्येक प्रसगी त्यान ओळखलं होतं....ती जुनी आठवण तिला सागण्यात काही अर्थ नाही असा विचार त्यानं केला. तो क्षणभर गप्प बसला त्याच्या मनात पुन्हा आल, ती जुनी आठवण तिला सागावी. त्या आठवणीन या घटकेला आपल्याला जर फार बरं वाटत आहे तर तिलादेखील ....

पण तितक्यांत एक नर्स आली. दोन वॉर्ड बॉइज आले. ऑपरेशन् थिएटरकडे ज्या हातगाडीवर घालून पेशटला न्यायचं ती घेऊन ते आले होते.

नर्स तिला म्हणाली, "चला." त्याच्या हातांत गुतलेला हात तिन सोडवून घेतला. ती उठून उभी राहिली. नर्सन दिलेला परकर नेसून जाडं भरडं कुडतहि तिन अगावर चढविलं....थोडयाच वेळात तिला गाडीवर घालून वॉर्ड बॉइज् गुळगुळीत फरशीवरून ती ढकलीत नेऊ लागले. तो गाडीबरोबर झपाझप पावल टाकू लागला. नर्सच्या बुटाच्या रबरी तळाचा आवाज अगदी होत नव्हता, आणि तो मात्र फार जपून चालत होता तरी-देखील त्याच्या बुटांचा खाड्खाड् आवाज होत होता हे त्याच्या लक्षात आलं.

ऑपरेशन–थिएटरच्या दरवाजापाशी "तुम्ही आत यायच नाही" अशी नर्सनं त्याला खूण केली. त्यान हातगाडीवर पडलेल्या त्या एवढयाशा देहाकडे नजर टाकली. तिची व त्याची दृष्टिभेट झाली. अगदी किंचित् का होईना पण ती हसली अस त्याला वाटल. परवानगी असती तर त्यान तिच्याकडे धाव घेतली असती तिच्याभोवती मिठी घालून तिचे मुके घेतले असते. पण दुसऱ्याच क्षणी हातगाडी आत गेली. दरवाजा लागला. त्याला ती दिसेनाशी झाली आता ती डॉक्टराच्या स्वाधीन झाली होती. दैवाच्या स्वाधीन ! त्याच मन अगदी पिचून गेलं. ....व्हरांडयाच्या कठडयाजवळ तो गेला. मघाशी खोलीतून दिसलेल्या नारळी निराळ्या बाजूनं त्याला दिसल्या. नारळीच्या झावळ्या झोके घेत होत्या. जमिनीवरच्या त्यांच्या सांवल्याहि पुढे माग होत होत्या.....

ऑपरेशन किती वेळ चालणार होतं कुणास ठाऊक ? त्यान डॉक्टरना विचारल तेव्हा ते म्हणाले होते " काही सागता येत नाही " " ऑपरेशन फार अवघड आहे का ?" "कांही सागतां येत नाही. " " हिला फार त्रास नाही ना होणार ?" " काही सागता येत नाही. " डॉक्टराच्या त्या ठरीव उत्तराचा त्याला भयकर राग आला होता. त्याला इच्छा झाली होती, खूप शिव्या द्याव्या. म्हणाव, अरे चोरानो ! चार-पाचशे रुपये तुम्ही हबकणार आणि काही सागता येत नाही म्हणता ? परंतु अडलेला गरजू पेशट डॉक्टराना अस बोलू शकत नाही एवढ त्याला समजत होत. तो गप्प बसला होता .... ऑपरेशनला किती वेळ लागेल त्याचा तर्क करण्यात काही अर्थ नाही अस त्यान ठरविल त्याच्या मनात आल, वेळ किती का लागेना, सार ठीक पार पडल म्हणजे मिळविली. ती सुखरूप राहिली पाहिजे. नारळीच्या हाळत्या झावळचाकडे पाहता पाहता तो मनाशी म्हणाला, " परमेश्वरा, तिचे प्राण वाचव. ती मला फार हवी तिच्यावर माझ फार प्रेम आहे. कदाचित् तिला ते कळलही नसेल. पण त्यासाठीच तिला वाचव...."

त्याच तिच्यावर फार प्रेम होत आणि तरी तिला ते कदाचित् कळल नसेल अशी शका त्याला येत होती, हा चमत्कारच म्हणायचा. परतु बहुतेकाच्या ससारात हा चमत्कार घडतो तो घडत असावा अस निदान त्याला तरी वाटल. कारण लग्नानतर ज्या तऱ्हेन तो वागला होता तिच्यांत स्वत.ची चूक त्याला कधी दिसली नव्हती. तिचे किती तरी हट्ट त्याला पुरे करता आले नव्हते. पण ते पुरे करण्याची त्याची इच्छा नव्हती म्हणून नव्हे. पुरेसे पैसे नव्हते म्हणून. अडीअडचणीला चार पैसे साठविलेले असावेत अस त्याला वाटत होत म्हणून. बहुतेकाच्या ससारात असच घडत असेल. त्यान वेळोवेळी तिला नाराज करून पैसे साठविले होते म्हणूनच तिच्या बाळंतपणाचा खर्च वर्षापूर्वी त्याला करतां आला, आणि त्या वेळेस तिच्या आतडचाना घातलेले टाके ढिले झाले म्हणून आता हें जास्तच अवघड ऑपरेशन् करण्याची गरज उत्पन्न झाली तेव्हा पैसे कुठले आणायचे अस म्हणण्याचा प्रसग त्याच्यावर आला नव्हता.....

मात्र हें मोठ ऑपरेशन् करायचं ठरल तेव्हा " बघितलस ? माझ्या काटकसरीपणाचा तुला राग येत होता. पण काटकसर केली तीच आतां

उपयोगी पडते आहे " अशा शब्दांनीं तिला दुःखविण्याचं त्याच्या मनांत देखील आल नव्हत .... आणि आत्ता कठड्याला टेकून नारळीच्या हालत्या डोलत्या झावळ्याकडे व त्याच्या छायाकडे पाहता पाहताही आपण वागलों तेंच किती बरोबर होतं याचा विचार त्याच्या मनात आला नाही. अगदीं उलट विचार आला. किती वेळा आपण तिला नाराज केली त्याच्या आठवणी त्याला झाल्या. दुःखान त्याचं अंत.करण भरून गेलं. ....

एकदां महिन्याचा पगार घेऊन तो घरी आला तेव्हा ती त्याला म्हणाली होती, " येत्या शनिवारी नाटकाला जाऊं या. " त्यानं " हो " म्हटल. पण दुसऱ्या दिवशी तो तिकिटं काढायला गेला तेव्हा दोन रुपये दहा आण्यांच्या वरचीच तेवढी तिकिटं शिल्लक आहेत असं पाहून तिकिटं न काढतांच तो परत आला होता.

ती म्हणाली होती, " मग साडेचारांची तिकिटं कां नाहीं काढलीस ? "

तो म्हणाला होता, " साडेचाराची ! नऊ रुपये घालवायचे ? "

" काय बिघडल ? "

" हॅं: ! इतके पैसे आहेत का आपल्याजवळ ? "

तिचा चेहरा एकदम पडला होता !

त्यान तिची समजूत केली होती, " पुढच्या शनिवारी लागेल ग पुन्हां नाटक. मग लवकर तिकिट काढून आणू. जाते कुठे कंपनी ? "

पण कपनी गेली होती ! नाटक पाहण्याची तिची इच्छा तशीच राहिली होती. " बायकोला साध नाटक दाखवणसुद्धा होत नाहीं तुमच्यानं अन् म्हणे माझ फार प्रेम आहे " असा टोला त्याला कायमचा देण्याचा हक्क तिला प्राप्त झाला होता. तें ऐकून तो चिडत असे. पण त्याच्याजवळ उत्तर नसे. त्यामुळे तो आणखीच चिडत असे.

तिच्या एका मैत्रिणीला पंचवीस रुपयांचा बाळतविडा करण्याची इच्छा तिन बोलून दाखविली तेव्हा तो म्हणाला होता " बाळंतविडा कशाला ? तिची तर ही दुसरी खेप ना ? "

" पण तिला पहिला मुलगा झाला तेव्हां मी स्वतंत्र नव्हतें. त्या वेळेस मी तिला काहीच केल नव्हतं. आता माझा स्वतत्र संसार आहे. तेव्हां–"

" पण पंचवीस रुपये म्हणजे फार नाहीं का ? "

" कांहीं फार नाही. माझी सगळ्यांत आवडती मैत्रीण आहे ती. "

तिनं आपला हट्ट पुरा केला होता. वाद नको म्हणून तो गप्प राहिला होता; परंतु नंतरच्या दिवसांत त्या पंचवीस रुपयांची आठवण त्याच्या मनांत राहिलीच होती. " परवा पंचवीस रुपये एकदम खर्च केलेस. आतां कांही दिवस हात आवर " असं म्हणून तिचे दोन तीन बेत त्यानं धुडकावून लावले होते.

एकदां ती त्याला म्हणाली, " जेव्हां तेव्हां तुझं एकच पालुपद – ' हात आवर. ' पूर्वी तू असा नव्हतास. लग्नाच्या आधी माझ्या भोंवती नाचत होतास तेव्हां– "

" मी एकटा नाचत होतों वाटतं ? तूं काय कमी नाचत होतीस ? "

" बरं तसं का होईना. तू आणि मी दोघेंही नाचत होतों. पण त्या दिवसांत असा चिक्कूपणा करीत नव्हतास. पैसा खर्चायच्या वेळेस हात आवरीत नव्हतास. एक रुपया पांच आण्याच्या खालची सिनेमाची तिकिटं कधी काढलीं नव्हतींस. दोन हांकांच्या अंतरावर जायचं असलं तरी आपण पायीं जात नव्हतो. माझ्या सुखाची किती काळजी करीत होतास. त्या वेळचं तुझं वागणं पाहून मला वाटल होतं– "

" मी बडोद्याचा महाराजा आहे ? "

तिला खुदकन हंसू आलं. परंतु आपण रागावून बोलतों आहोंत याची तिला लगेच आठवण झाली व तिनं हंसू दाबून चेहरा बदलला. " बडोद्याचा महाराजा राहू दे, पण– "

" पण काय ? "

" मला वाटलं होतं तू सढळ हाताचा आणि हौशी असशील. "

" हौशी ! " असा उद्‌गार काढून त्यानं मान वळविली होती .... त्याच्या मनांत आलं होतं, हिचं म्हणणं कांही खोटं नाही. लग्नाच्या आधीं तिला खुषीत ठेवण्यासाठीं त्यानं पैशाची फिकीर केली नव्हती. परंतु त्याचीं कारणं वेगळीं होती. त्या वेळेस त्याची परिस्थिति खरोखरच चांगली होती. ज्या वृत्तपत्राच्या कचेरीत तो उपसंपादक होता ते एका उत्साही भांडवल-वाल्यानं हौसेनं काढल होतं. सारा थाट नवा असल्यामुळें त्याला पगार चांगला होता. प्रारंभीं पत्राचा खप चांगला होता, व पुढें तो वाढेलसं वाटलं

होतं. त्याचा पगार वाढणार होता. त्याच्यावर मालकाची मर्जी होती. एक वेळ आपण संपादक होऊ असं त्याला वाटलं होतं. पण पुढें पत्त्यांचा बगला ढासळला होता. पत्राचा खप वाढण्याऐवजी कमी झाला होता. मालकाची पहिली हौस ओसरली होती. शिवाय मालकाची त्याच्यावरची पहिली लहरही टिकली नव्हती. संपादक होण्याचं किंवा पगार वाढण्याचं बाजूलाच राहिलं, मालकाच्या नव्या कपातधोरणाला पहिला बळी त्याचा पडला. त्याचा पगार पंचवीस रुपयानी कमी झाला. त्याचे सारे मनोरथ खरे ठरले असते तर त्यानं कदाचित् पूर्वीसारखाच खर्च केलाही असता .... शिवाय, त्याच्या मनात आलं, माणसाच लग्नापूर्वीचं वागण लग्नानतरही कधी कायम राहत काय ? काय म्हणावं या खुळीला ? लग्नाच्या आधी स्त्रीचं अत.करण जिकायच असत. लग्न झाल्यावर ते जिकलेलं असतं, हातात आलेल असत ! खेरीज अस की लग्नाच्या आधीचा काल मर्यादित असतो. पण लग्नानतर मात्र अमर्याद काळाची जबाबदारी अंगावर पडते. हौस मोकळी सोडून कस चालेल ? ही गोष्ट नवऱ्यानं लक्षांत घ्यायला हवी, बायकानही लक्षात ठेवायला हवी.... पण हिला फक्त एकच गोष्ट ठाऊक. हौस ! पदोपदी कटकट होते ती यामुळे .... तिच्या तोंडच्या ' हौस ' या शब्दाचा त्याला तिटकारा वाटू लागला होता ....

त्यान तिच्याकडे पुन्हा तोड वळविल आणि तो म्हणाला, "हौस !" त्याच्या शब्दात राग होता, हेटाळणी होती.

तिन त्याच्याकडे रोखून पाहिलं. बोलण्यासाठीं तिच्या ओठांची हालचाल झाली. पण लगेच तिन तोंड घट्ट मिटून घेतलं. ती उठली आणि आंतल्या खोलीत गेली.

त्याच्या मनांत क्षणभर आलं, आंत जावं आणि तिला जवळ घ्यावी. पण तो जागचा हालला नाही. तिची उघड उघड चूक होती, मग त्यानं कशासाठी पडती बाजू घेऊन तिची समजूत काढायची ? तो खर्चाला पायबद घालीत होता म्हणून थोडी तरी शिल्लक टाकू शकला होता. संसारात अडीअडचणीची वेळ केव्हां येईल आणि एकदम कोणता मोठा खर्च पुढे उभा राहील त्याचा काही नियम होता काय ? इतराचे संसार तो बघतच होता ना ? त्यांच्या बायका समजूतदार होत्या म्हणायच्या. बाकी

होत्या की नाही कुणास ठाऊक ? घरांतली भाडणं दुसऱ्याच्या दृष्टीस कोण पडू देतो ? वरकरणी सारीच जोडपी प्रेमाचं आणि सुखाचं नाटक करीत असतात. त्याची आणि तिची सतत होणारी कुरबुर कुठे येत होती लोकांच्या लक्षांत ?....तें कांहीं नाहीं. त्याचंच वागणं बरोबर होतं. ती चुकत होती....बसू दे रुसून रडू दे घटकाभर.... येईल आपोआप ताळ्यावर....तो जागच्या जागीच बसून राहिला.

त्याला चमत्कार वाटला तो या गोष्टीचा की बायकाच्या दृष्टीनं पुरुषाच्या प्रेमाची कसोटी एकच. तो खर्च किती सढळ हातानं करतो हीच .... हा काय न्याय झाला ? उंची, रेशमी पातळांच्या संख्येनं नवऱ्याच्या प्रेमाचं माप ठरविणाऱ्या या बायकाची जात किती मूर्ख म्हणायची ! .... पण त्याच्यावाचून पुरुषाच अडतं.... साराच चमत्कार आहे म्हणायचा !

तो मनातून तिच्यावर रागावला आणि एकटाच विचार करीत बसला की दर वेळेस 'साराच चमत्कार आहे म्हणायचा' एवढाच निष्कर्ष त्याला काढता येत असे. यापलीकडे त्याची पृथक्करणाची शक्ति जाऊंच शकत नसे. आपल वागणं बरोबर, तिचं चूक अस तो मनाशी घोकी. परंतु त्याबद्दल त्याची पूर्ण खात्री नसे. तिच्यावर त्याचं फार प्रेम होत त्यामुळें की काय कोण जाणे, पण त्याला वाटे तिच्या बाजूनहि काहीं म्हणतां येण्यासारखं असेल .... मग आत्मगत विचार संपविण्यासाठीं तो म्हणे, "साराच चमत्कार आहे म्हणायचा.' म्हणजे तो मनाशीं ठरवीत असे, तिच मला पटत नाही, माझ तिला पटत नाही, पण हें असंच चालायचं. सगळ्यांचं असच चालत असेल.

त्याचा विचार कांही चुकीचा नव्हता. 'कशाला केलं आपण लग्न ?' असा उद्‌गार तिनं उच्चारला नसूनही तिच्या मनांत आल्याचं त्याच्या लक्षांत यावं इतक्या थराला त्याचं आणि तिचं भाडण पुष्कळदां जात असे. आणि तशी भाडण होऊनहि त्याचे परिणाम फार टिकत नसत. त्याचा संसार चालू रहात असे. तिनं नाराज व्हावं, त्यानं आपला हट्ट पुरा करावा, पैसे वाचवावे असं चालत असे. आपल्या मनांतलं तत्त्व त्यानं सौम्य शब्दांनीं समजून सागितलं की तिन म्हणावं,

" मला नको सांगूस. मला नाही पटायचं. "

" पण नीट ऐक तरी. "

" हजारदा ऐकल रे. पुन्हा काय ऐकायचं ? उद्याच्या खर्चासाठी पैसे असावेत म्हणून आज मनाची हौस मारायची ! उद्या तुपाशी, पण आज उपाशी ! हा शुद्ध मूर्खपणा आहे. "

" मग तुझ म्हणणं काय, उद्यां उपाशी राह्यची वेळ आली तरी हरकत नाही, आज तुपाशी जेऊन घ्यावं ? "

" अर्थात् ! उद्याचा भरंवसा नसतो. आजचा दिवस मात्र प्रत्यक्ष असतो. "

" सुविचारी माणूस अस बोलत नाही. उद्यांची तरतूद न करतां आजचा दिवस चैनीत घालविणाराला शहाणा म्हणत नाहीत. "

" बरं बर, तू शहाणा ! मी गाढव ! झाल ? "

असा उद्‌गार काढताना तिची चर्या कशी होत असे ते त्याला आता अगदीं स्पष्ट आठवल .... त्याचीच वागण्याची रीत शहाणपणाची ठरली होती. तिच्या हौशी त्यानं पुरविल्या असत्या, खर्चिकपणाला पायबंद घातला नसता तर आजच्या या भयकर प्रसंगांतून तो कसा पार पडला असता ? ती कशी निभावली असती ? त्याच वागण किती बरोबर होत आणि तिच किती चूक होतं हे आजच्या सकटान पुरत सिद्ध केलं होत. परंतु समोरच्या नारळींच्या झावळ्याकडे व त्याच्या सावल्यांकडे पहात असतांना त्याच्या मनांत हा विचार येत नव्हता. अगदी उलटा विचार येत होता. त्याला वाटत होतं, किती वेळा मी तिला नाराज केली ? तिच्या किती हौशी अपुऱ्या ठेवल्या ? तिला खूप खूप पातळं का घेतली नाहींत ? तिला रिस्टवॉच फार हवंस वाटत असे. आपल्या मोकळ्या डाव्या मनगटा-कडे पहात तिनं सोडलेला गुप्त नि:श्वास त्याला कितीदां तरी कळला होता. कुणी मित्र माथेरानला जाऊन आले व तिथली वर्णन करूं लागले की ती त्याच्याकडे कोणत्या अभिप्रायान बघत असे तें त्याच्या लक्षांत आल्यावांचून राहिलं नव्हतं. त्यानं तिच्यासाठीं काय केलं होतं ? फक्त पैसे साठविले होते. आणि साठविले म्हणूनच आज तिला मृत्यूपासून तो वाचवूं शकत होता. परंतु त्यानं आजपर्यंत सहस्र वेळां तिच्या तरुण

मनाची एकेक गोड हौस मारली होती ! दर वेळेस जणूं तिलाच मारली होती. इतके वेळां तिला मारल्यानंतर आतां तिचे प्राण वाचविण्यांत कोणतं मोठं भूषण होतं ? ....

आणि आतां तिचे प्राण वाचतील याची कुठें खात्री होती ? या अवघड ऑपरेशनमध्ये ती जर दगावली तर ती गेली, पैसे गेले, आणि तिला संतुष्ट व प्रसन्न करण्याच्या हजार संधीही गेल्या त्या गेल्याच, असं होणार होतं ! छे छे ! असं अगदीं होतां कामा नये. या ऑपरेशनमधनं ती निभावली पाहिजे. तिच्या साऱ्या हौशी पूर्ण करण्याची मधि मिळाली पाहिजे .... ऑपरेशन–थिएटरमध्यें हातगाडी शिरली त्या वेळेस तिच्याकडे पाहतांना त्याच्या मनांत आलं होतं, आता ही पुन्हां माझ्या दृष्टीस पडेल की नाहीं ? तिचं हे अखेरचं दर्शन तर मला होत नाही ? त्याच्या अंतःकरणांतलं सारं प्रेम निर्भेळपणे त्या क्षणीं उचंबळून आलं होतं. त्याला वाटलं होतं तिच्याकडे धांव घ्यावी, मिठी घालावी, आणि मुका घ्यावा. परंतु दुसऱ्याच क्षणीं दार बंद झाल होतं. ती दिसेनाशी झाली होती .... आतां तो माडांच्या फांद्याकडे आणि त्याच्या छायाकडे पहात होता. त्याच्या मनांत एकच विचार होता, ' ती मला हवी ! ती मला हवी !' त्याला वाटत होतं माझं सर्वस्वी चुकलं. चुकीची दुरुस्ती करण्याची संधि मला हवी. तिचे लाड करण्याची ! ती म्हणेल ती हौस पुरी करण्याची ! पैशाची फिकीर न करण्याची ! त्यानं मनाशी पुष्कळ बेत केले. माथेरानला तिला घेऊन जाण्याचे ! तिला आवडणारे पदार्थ तिला खाऊं घालण्यासाठीं हॉटेलांत नेण्याचे ! हिडण्या-फिरण्याचे ! तिच्या लहरी सांभाळण्याचे ! तिला फुलासारख झेलण्याचे ! तिच्यापुढें साऱ्या गोष्टी कःपदार्थ आहेत असं मानून तिच्यावर प्रेम करण्याचे ! पण त्यासाठीं ती हवी ! ती हवी! ....

ऑपरेशन–थिएटरचं दार उघडलं तेव्हां आपल्या विचारांतून भानावर येऊन त्यान पाहिलं.

नर्सनं त्याला खूण केली.

तो दाराकडे निघाला. नशिबानं काय वाढून ठेवलं आहे कुणास ठाऊक असं मनाशीं म्हणत त्यानं थिएटरमध्यें पाऊल टाकलं.

त्याला वाटलं त्याला बोलावणारी नर्स आपल्याला कांहीं सांगेल, पण ती

बया एक अक्षर बोलेल तर शपथ ! त्याच्या मनांत आलं तिला धरावी, गदगदा हलवावी, आणि झाडावरचीं फळं पडतात तशी तिच्या तोंडून कांही मुक्ताफळं बाहेर पडतात का पहावं ! त्याच्या मनांतले विचार ओळखून की काय, त्या नर्सनं त्याला डोळ्यानं खुणावल. त्या खुणेवरून त्यानं दूरच्या टेबलाकडे पाहिलं. त्याला चादरीचा शुभ्रपणा दिसला. अगदी फटफटीत गोरं तोंड दिसल, ओठ विलग झाल्यामुळे तिचे पुढचे दात दिसले. तिच्या रुंद कपाळावरच कुंकू आणि डोक्यावरचे काळे केस दृष्टीस पडले. त्याची नजर तिच्या नजरेला भिडली. तिनं हळूच हंसण्याचा प्रयत्न केला अस त्याला वाटलं. तिच्या डोळ्यांत चमक डोकावली....त्याला बरं वाटल फार बरं वाटलं. तो झटकन् जवळ गेला आणि त्यानं तिला अगदीं हळू आवाजांत हाक मारली. तो कांही बोलणार होता, पण तितक्यांत–

तिनं डोळे मिटले !

ती डोळे उघडील आणि मग आपण बोलू अशा विचारान तो थाबला. तिच्या मिटलेल्या डोळ्याकडे निरखून पाहू लागला.

पण तिन डोळे उघडले नाहीत ! त्यान हळूच हाक मारून पाहिली तरी !

डोळे मिटण्याची तिची इच्छा नव्हती. उलट ते अगदी ताणून खूप पाहवसं तिला वाटल होत. ऑपरेशन थिएटरच्या दारातून तो आत आला व तिला दिसला तेव्हा तिला फार आनद झाला होता. तिच्या मनात आलं होत, ' देवान कृपा केली म्हणायची ! तो मला पुन्हा दिसत आहे. ज्या हातगाडीवर घालून मला आणल ती या खोलीत शिरली त्या वेळेस मला वाटलं होतं, मला घडणारं हेंच त्याच अखेरच दर्शन. पण मी मेले नाही असं दिसतय ! मोठी कृपा केलीस तूं, देवा. '

थिएटरमध्ये आत शिरतांना तो तिला दिसला तेव्हा तिला वाटलं होतं, त्याच्याकडे सारखं बघत राहावं. जणू त्याला पाहण्यासाठीच दृष्टीची देणगी आपल्याला मिळाली आहे. दुसऱ्या कुणाकडेही किंवा कशाकडेही बघू नये. आणि तो जवळ आला की त्याच्याशीं खूप बोलत रहावं. आपल्याला हातगाडीवर ठेवून थिएटरमध्यें नेण्यासाठीं वॉर्डबॉइजनी ती गाडी ढकलली तेव्हांपासून आपल्या मनात कोणते विचार आले ते त्याला सांगावे

....तिनं त्यासाठी तोंडदेखील उघडलं होतं, परंतु त्या क्षणींच तिच्या अंगातली सारी शक्तीच जणू एकाएकी पार ओसरून गेली होती. 'मला पाह्यचंय! त्याच्याकडे पोटभर पाह्यचय!' असं ती आतल्या आत ओरडली; परंतु बटन वर केल जावं आणि दिव्याचा प्रकाशच नाहीसा व्हावा त्याप्रमाणे तिचे डोळे तिच्या इच्छेविरुद्ध बद झाले होते. ज्याच्याकडे तिला टक लावून बघायच होत तो तिला दिसेनासा झाला होता....मात्र तिच्या मनांतले विचार चालूच राहिले. ती त्याला जे सागणार होती परंतु जें तिला सागता आल नव्हत ते तिच्या मनांत येतच राहिल....जणू ती शब्दाच्या साहाय्यावाचून त्याच्याशी बोलतच होती.

हातगाडी ऑपरेशन थिएटरच्या दारात शिरण्याच्या वेळेस त्याच्याकडे तिनं नजर टाकली तेव्हां तिचं मन चरकल होत, भीतीन–अशुभ शकेनं. तिच्या मनांत आल होत, हा मला पुन्हा दिसेल की नाही? का हे अखेरचंच त्याच दर्शन? या ऑपरेशनमध्ये मी मेले तर–? त्याला पाह्यसाठी जिवतच राहिलें नाही तर? छे, छे! अस होता कामा नये. मला जिवत राह्यलं पाहिजे. त्याच्या सहवासासाठी! खूप दिवस ससार करण्यासाठी! त्याच्यावर कधीदेखील न रागावता त्याला सुख देण्यासाठी!....गेल्या दोन वर्षात तिच्या मनात कितीदा तरी आल होत, काय ही याची वागण्याची तऱ्हा! माझी हौस पुरविण्याची याला अगदी कशी इच्छा नाही? मी जे हवं म्हणते त्यात खर्च तो कितीसा व्हायचा असतो? पण मी काहीही म्हटल की याच आपल एकच पालुपद. 'अशान व्हायचं कसं? चार पैसे शिल्लक राह्यचे कसे?' तिच त्याच्यावरच प्रेम ढळलं नव्हतं. त्याच्या प्रेमाबद्दलही तिला शका नव्हती. पण तिच्या मनात आल्यावाचून रहात नसे की प्रेमळ नवरे लहानसहान खर्चावरून आपल्या बायकोशी असे भाडत नाहीत. त्याच्या वागण्याचा तिला चमत्कार वाटल्यावाचून रहात नसे. ती मनांतून कष्टी होई. 'कशाला केल आपण लग्न?' असा उद्‌गार तिच्या ओठापर्यंत येई. ती खोलीत जाऊन अथरुणावर पडत असे. तो आपल्याकडे येईल, आपल्याला जवळ घेईल, आपली समजूत घालील, अशी अपेक्षा ती ठवीत असे. तिची अपेक्षा चुकीची ठरत असे. तिचं दुःख वाढत असे....

कधीं कधीं तो तिला बँकेचं पुस्तक दाखवी आणि अमुक इतकी शिल्लक

खात्याला आहे असं सांगून म्हणे, "खरं म्हणजे एक हजार तरी रुपये आपल्या शिलकेत असायला हवेत."

ती कपाळाला आठ्या घाली, मान झटकी, आणि तुच्छतेचा उद्‌गार काढी.

तो विचारी, "का ? बोलत का नाहीस ?"

"काय बोलायचय ? तुझे विचार निराळे, माझे निराळे. हे असंच चालायचं आपल्यात."

"माझी काटकसर तुला पसंत नाही, होय ना ?"

"विचारून भाडण नको काढूस."

"भाडलीस तरी मला आवडेल. पण गप्प नको राहूस. बोल."

"बोलून उपयोग काय ? तुझ तेच खरं म्हणणार तूं ! टाक शिल्लक ! टाक ! वाटल तर फक्त एक वेळेस जेवून राहू आपण. माझी तयारी आहे. एकदां शिलकेचा आकडा फुगलेला दिसू दे तुला. कुणासाठी एवढी धडपड करतो आहेस, कोणास ठाऊक ? आपल्याला ना मुल ना बाळ ! खरंच मला कळू दे तरी एकदा बँकेची भर करतोस ती कुणासाठी ?"

"तुझ्यासाठी !"

एकदा तें ऐकताच ती खो खो करून हसत सुटली. ती म्हणाली, "माझ्यासाठी ! अजब आहे तुझ तर्कशास्त्र !"

"कां ? तुझ्यासाठीं पैसे साचवितों म्हटलं तें काय खोटं आहे काय ?"

"अरे तुझा हेतु खोटा नाहीं ठरवीत मी. तुझं तर्कशास्त्र अजब आहे म्हटल मी."

"तें कसं ?"

"अरे, माझ्यासाठी उद्या कांहीं तरी करतां यावं म्हणून पैसे साठवितोस त्यापेक्षा आजच काही तरी कर की माझ्यासाठी. प्रेमाची ही उधारी मला नाही आवडत. रोखीचा काही तरी व्यवहार करशील तर बरं होईल."

आपली ही कोटी फार मर्मभेदक आहे हें कळत असूनही ती करण्याचा मोह तिला आवरतां आला नव्हता. त्याच्या वागण्याबद्दलचा तिचा राग बराच साचला होता. दिलरुब्याची शिकवणी ठेवण्याची तिची इच्छा होती. त्यानं तिला वेड्यांत काढलं होतं. तिला फार वाईट वाटलं .... लग्नापूर्वी

ती एका क्लासांत जात असे. क्लासाच्या वार्षिक समारंभांत तिनं दिलरुबा वाजवून दाखविला होता. तिला छोटंसं पदक मिळालं होतं. समारंभाला तो आला होता. त्यानं तिची तारीफ केली होती. " आपलं लग्न झाल्यावर तूं हा नाद अवश्य चालू ठेव बरं का. एखादा चांगलासा दिलरुबा आडगिऱ्हाईक मिळाला तर आपण घेऊं. आपलं स्वतःचं हत्यार घरी पाहिजे. त्याशिवाय मनाजोगी प्रगति व्हायची नाही. क्लासात तासभर शिकून कितीसं येणार ? घरी मेहनत करायला हवी.... " असं गोड गोड तो पुष्कळ बोलला होता. तिच्या मनांत आलं होतं, असा हौशी नवरा मला मिळणार हें माझं केवढं भाग्य ! .... परंतु या साऱ्या गोष्टी आता त्याच्या लक्षात कुठें होत्या ? त्या तो सोयीस्करपणानं विसरला होता. दिलरुबा घेण्याची गोष्ट तर दूरच राहिली, शिकवणी ठेवायलादेखील त्याची तयारी नव्हती. त्याला पैसे साठवायचे होते ! .... आणि कुणासाठी म्हणून विचारलं तर खुशाल सांगत होता " तुझ्यासाठी " .... आता या गृहस्थाला म्हणावं तरी काय ? .... ती खो खो करून पुन्हा हंसली. अगदी जळजळीत उपहासानं....

त्यानं खेकसून विचारलं, " हंसतेस काय ? "

पण ती हसतच राहिली. जणू त्याचा मर्मभेद करण्याचं हें एकच साधन तिच्या जवळ होतं, आणि " कशाला केलं आपण लग्न ? " अशा शब्दांनीं त्याला जखम करण्याइतकं कठोर होण्याची जरी तिची इच्छा नव्हती तरी हंसून त्याला दुखविताना तिला बरं वाटत होतं.... ती मनाशीं म्हणत होती, त्याला एवढी शिक्षा हवीच. यानं चूक करावी आणि प्रायश्चित्त मात्र याला मिळूं नये असं का म्हणून ? माझी हौस हा पुरवीत नाहीं ही त्याची एक चूक, आणि स्वतःची चूक याच्या ध्यानात येत नाहीं ही दुसरी....

परंतु थिएटरच्या दारांतून आंत शिरणाऱ्या ढकलगाडीवर पडल्या पडल्या तिनं जेव्हां त्याच्याकडे बघितलं तेव्हां त्याची व तिची दृष्टादृष्ट होतांच तिच्या मनांत विचार आला तो त्याच्या चुकीचा नव्हे. तिला एकदम आठवणी झाल्या त्या त्याच्या हट्टाच्या नव्हे. उलट ती मनाशीं म्हणाली, कितीकदां तरी मी फार दुखवलं त्याला. त्यानं तिची हौस पुरवली नव्हती, प्रयत्नानं पैसे साठविले होते हेंच बरोबर केलं होतं, असं तिच्या मनांत

एकदम आवेगानं आलं. तिच्या ऑपरेशनचा प्रसंग एकाएकीं आला होता.... डॉक्टरांनी तिची तपासणी केली तेव्हा अर्धवट तिच्याकडे परतु जास्त त्याच्याकडे पाहून ते म्हणाले होते, "माझ्याकडे यायला उशीर केला असतात की ऑपरेशनच्या पलीकडे केस गेली असती...." त्यांचे ते उद्गार ऐकून ती स्वत. तर धसकली होतीच. परतु त्याचा चेहरा किती कष्टी आणि पांढरा फटफटीत झाला, तेंही तिला स्पष्ट दिसल होत त्यानं डॉक्टरांना हळूच विचारल होत, "अदमासे एकदर खर्च किती येईल ?" डॉक्टरानी आकडा सागितला तेव्हां त्याची मुद्रा प्रफुल्लित झाली होती. जणु तो मनाशी म्हणाला होता, सुदैवान आहेत एवढे पैसे माझ्याजवळ, कसेबसे साठवले आहेत.... त्यानं तिची हौस अपुरी ठेवून वेळोवळी तिला नाराज केलं होत, परतु त्यान तसं केलं म्हणूनच तिच्या प्राणावरच सकट आज टळणार होत.... ती मनाशी म्हणाली, किती मूर्ख मी ! तो किती शहाणा ! त्याच प्रेम आहे माझ्यावर. तुझ्यासाठी पैसे साठवायचे आहेत या त्याच्या म्हणण्याचा तिन उपहास केला होता. पण त्याचच म्हणण खरं होत....

कुणी तरी तिला अगदी हलक्या आवाजात म्हटल, "तीन अंक मोजा" आणि तिच्या नाकातोडावर क्लोरोफॉर्मची वाटी ठेवली. एक, दोन असे अक मोजण्याऐवजी ती मनातल्या मनात म्हणाली, "मला जगायचय ! त्याला सुख देण्यासाठी जगायच आहे ! त्याला – ! "....मग तिची शुद्ध नाहीशी झाली होती....

ऑपरेशन सपल्यानतर पुन्हा शुद्धीवर येताक्षणीच तिला आठवण झाली ती ढकलगाडीवर पडल्या पडल्या तिन त्याच्याकडे पाहिलं होतं त्याची. त्या क्षणी जे विचार तिच्या मनांत एकदम उचबळले होते त्याची. 'मला जगायचय ! त्याला सुख देण्यासाठी जगायचय !....' आणि तितक्यात थिएटरमध्ये पाऊल टाकताना तो तिला दिसला होता. तिच्या मनांत आलं होत, देवान कृपा केली म्हणायची....तिला वाटलं होतं, त्याच्याकडे सारखं बघाव. त्याच्याशीं खूप बोलावं. पण विलक्षण अशक्तपणाच्या लाटेंत ती सापडली. तिला डोळे उघडे ठेवतां येईनात. तिन ते मिटून घेतले...

त्यानं खूप वेळ वाट पाहिली तरी तिनं डोळे उघडले नाहींत. त्याचं

मन भयानं आणि शंकेनं चरकलं ! त्यानं पुन्हां एकदां तिला हळूच हांक मारली. तरीदेखील तिचे डोळे मिटलेलेच राहिले. त्याच्या मनांत आलं, दूर असलेल्या डॉक्टरांना–' परंतु तितक्यात फुलाच्या पाकळया वाऱ्याच्या झुळुकेनं हळूच हालाव्या त्याप्रमाणे तिच्या डोळयांची हालचाल झाली. त्यानं पुन्हा हाक मारली. अगदीं हळू. फुकर घातल्याप्रमाणे. तिनं डोळे पुरते उघडले. त्याची ओळख पटल्याबरोबर तिच्या डोळयात चमक आली. तिचे ओठ हलकेच विलग झाले.

त्याला वाटल, मनातल्या साऱ्या गोष्टी तिला सांगाव्या. त्या तिला कळल्या पाहिजेत. परंतु या वेळीं या ठिकाणी तिच्याशीं इतकं कसं बोलायचं असंही त्याच्या मनात आलं. तिच्याशी जें बोलण्याची त्याची इच्छा होती ते बोलण्यास उशीर व्हावा ही गोष्ट त्याला रुचली नाही. तो हळूच तिच्या कानात म्हणाला, "तुझ्याशी पुष्कळ बोलायचय मला."

तिचे डोळे हंसले. तिनं ते क्षणार्ध मिटून घेतले. जणूं चुंबनाची गोडी जिवाची एकाग्रता करून चाखण्यासाठीं डोळे मिटावेत त्याप्रमाणें त्याचे ते शब्द ती हृदयांत खोल साठवीत होती. तिनं पुन्हां डोळे उघडले तेव्हां तिच्या पापण्या थरथरल्या. पाण्याचे थेंब गालावरून ओघळले. त्यानं हळूच त्या थेंबांना हात लावला तेव्हा ती हलक्या आवाजांत म्हणाली, "आधीं मला तुझ्याशी खूप बोलायचं आहे...."

तो हंसला आणि त्यान मान हालविली.

नर्स जवळ येऊन काही सांगू लागली तेव्हां त्यानं मान वर करून पाहिलं. नर्सच बोलणं ऐकताना त्याची दृष्टि तिच्यापलीपडे गेली. थिएटरच्या उघड्या दाराकडे. बाहेरच्या व्हरांड्याकडे. बाहेरच्या आवारातला जो भाग दिसत होता त्याकडे....

आतां सूर्य पुष्कळ वर आला होता. रखरखीत ऊन्ह पडलं होतं. नारळींच्या फांद्या वाऱ्यावर हालत होत्या ! आणि आत्तां आखुड झालेल्या त्यांच्या जमिनीवरच्या सावल्याही ! ....का कोण जाणे, पण त्यांकडे पाहतांना त्याचा ऊर अगदीं गाढ समाधानानं भरून आला !

## ८ . . . . . . जुलूम

सिनेमा पाहून अंतु घरीं आला तेव्हां बरीच रात्र झाली होती, आणि तो दमूनही गेला होता. जेवण नको, खाणं नको, एकदम अंथरुणांत घुसावं आणि डोक्यावरून पांघरून घ्यावं असं त्याला वाटत होत. आईनं दोन रट्टे लगावले म्हणूनच त्यानं चार घास कसेबसे खाल्ले. त्यानंतर तो लगेच निजणार होता. परंतु त्याला आठवलं की दोन दिवसांसाठी पाहुण्या आलेल्या जानकीकाकू सकाळच्या गाडीनं पाच्छापूरला परत जायच्या आहेत. तो त्यांच्याकडे गेला आणि म्हणाला, " मी येणार तुमच्याबरोबर. मला न्यायचं कबूल केलं आहे तुम्ही जांकीकाकू !"

जानकीकाकू पानावर बसल्या होत्या. त्या म्हणाल्या, " मग नेणारच आहे तुला मी माझ्याबरोबर."

" माझं सामान देतों तें तुमच्या वळकटींत बांधाल ना ? "

" हो. माझ्या वळकटीजवळ आणून ठेव. "

अंतु पळाला. त्यानं आपले शर्ट, चड्डया, पत्त्याचा जोड, सिनेमाच्या रंगीत जाहिराती, पेन्सिलीचे व खडूच्या कांड्याचे तुकडे, रबर, दादानं टाकून दिलेलीं हजामतींचीं पातीं ज्यांत भरली होती तें टिनचं डबडं, इत्यादि सामान गोळा केलं आणि जानकीकाकूंच्या वळकटीपाशीं आणून ठेवलं. आपला आवडता बाजा तो विसरला नाहीं. पण तो त्यानं सामानांत घातला नाहीं. तो शर्टच्या छातीवरच्या खिशांत ठेवून तो निजणार होता. आगगाडींतून प्रवास करतांना तो वाजविण्याचं त्यानं ठरविलं होतं.

तो जानकीकाकूंकडे पुन्हां गेला आणि म्हणाला, " माझं सामान ठेवलं आहे बरं का तुमच्या वळकटीशीं जांकीकाकू !"

" असूं दे !"

" बांधाल ना तें वळकटींत ?"

त्याची आई खेकसून म्हणाली, " अरे बांधतील रे. "

आईकडे दुर्लक्ष करून त्यानं विचारलं, " पहाटे उठवाल ना मला जांकीकाकू ? "

" उठवीन रे. पण आतां तू जाऊन नीज पाहूं. "

अंतु पळाला आणि अथरुणात घुसला. त्याचा आनंद त्याच्या मनांत मावत नव्हता. ज्या या शहराचा त्याला कंटाळा आला होता तें सोडून 'जाकीकाकूं' बरोबर तो उद्यां पाच्छापूरला जाणार होता ! त्याच्या आवडत्या गांवाला !

गेले दोन दिवस अंतु मोठ्या खुषींत होता. दोन दिवसांपूर्वी तिन्हीसांजाच्या वेळेस अरुंद बोळांतल्या त्या घराच्या दरवाजांत अंतु बसलेला असताना एक टांगा घरापुढें येऊन उभा राहिला, व त्यांतून एक बाई वळकटी काढून खालीं उतरली. अंतूला वाटलं, असतील ,कुणी बाई. त्यानं धड त्यांच्याकडे पाहिलंही नाही. आपल्या मनांतल्या विषण्ण विचारांत तो गर्क झाला होता. तीन खोल्यांचं तें लहानसं घर, जिथें धांवण्याची सोय नव्हती, काहीं खेळण्याची सोय नव्हती असं अरुंद बोळकंडीवजा आंगण, घरापुढचा तो अरुंद रस्ता, रस्त्याच्या दुतर्फा दाटीनं वाकडी तिकडी उभी रहिलेली कलडलेली ती घराघरांतली आबलेली चिबलेलीं माणसं, याचा गेल्या दहा महिन्याच्या मुक्कामांत त्याला पुरता वीट आला होता. त्याचे वडील पाच्छापूरची स्टेशनमास्तरकी सोडून रेल्वेच्या नोकरीतून निवृत्त होऊन या शहरांत राह्यला आले तेव्हां घरांतल्या इतर सर्व माणसांना आनंद झाला होता. आतां मुलीला स्थळं पाहतां येतील आणि तिच लग्न वेळेवर होईल म्हणून त्याच्या आईला, मुलींच्या शाळेत जातां येईल म्हणून त्याच्या बहिणीला, मॅट्रिक होऊन कॉलेजांत जातां येईल म्हणून त्याच्या थोरल्या भावाला ! परंतु अंतूला मुळींच आनंद झाला नव्हता. पाच्छापूर सोडून निघतांनाच त्याच्या मनांत आलं होतं, इथल्यासारखी मजा त्या शहरांत कोठून असणार ? आणि त्याची ती कल्पना शहरांत राह्यला आल्यापासून जास्त जास्त खरी ठरली होती. या शहरांतल्या जीवनांत त्याचा जीव मुळींच रमला नव्हता. इथली शाळा मुलांच्या

गर्दीमुळें त्याला एखाद्या बाजारासारखी वाटली होती. शाळेंतले मास्तर त्याला आवडले नव्हते. वर्गातलीं मुलं आवडलीं नव्हतीं. शेजाऱ्यापाजाऱ्याच्या मुलांना आपले सोबती म्हणावसं त्याला मुळीच वाटत नव्हतं. त्याच्या अंतःकरणांत उदास एकटेपणा सांचत गेला होता. गल्लीतल्या समवयस्क मुलांनी विचारलं, " येतोस का फिरायला ? " की तो मान हालवी. " देवळांत येणार काय ? " " अहं " " बाजारांत हिंडायला जाऊं या. " "हॅट." अगदीच वेळ जाईनासा झाला की दाराजवळच्या ठेंगण्या कट्टयावर तो बसून राहत असे, आणि आपल्या मनाशी खिन्न विचार करीत असे.... परवा तो असाच दारांत बसला असतांना टांगा घरापुढें येऊन उभा राहिला आणि एक बाई वळकटी काढून घेऊन उतरल्या. त्याला वाटलं, असतील कुणी बाई. त्यानं त्याच्याकडे धड पाहिलंही नाही....

" हां मेल्यांनो ! अंतूच बसला आहे की इथें दारांत. अंतूच ना रे तू ?"

हे उद्‌गार आणि प्रश्न ऐकल्याबरोबर अतूनं मान वर करून पाहिलं. आणि मग मात्र तो एकदम आनदानं म्हणाला, " जाकीकाकू ! तुम्ही ! " त्यानं एकदम त्या बाईंना मिठीच मारली ! त्याच्या मनाचा उदास एकटेपणा एकदम संपला. पाच्छापूरच्या 'जाकीकाकूं'च्या रूपानं त्या गावांतलं त्याचं प्यार जीवनच त्याला भेटल. किती नाचावं किती बागडाव अस त्याला वाटलं. त्यानं काकूंच्या हातातली वळकटी हिसकून घेतली, " या या. " असं त्यांना म्हटल, आणि आगणांतून धांव घेऊन तो ओरडला " आई ! ए आई ! पाच्छापूरच्या जाकीकाकू आल्या बघ ! " त्यानं वळकटी खोलीत टाकली आणि सैंपाकघरांत जाऊन तिथें कामांत असलेल्या आईला ओढीत तो म्हणाला, " चल तरी. खरंच आल्या जाकीकाकू. "

त्या घटकेपासून त्याचं दुःख संपलं होतं. हर्ष सुरू झाला होता. आईबापाना तो विचारूं लागला होता, " काकूबरोबर जाऊं काय मी पाच्छापूरला ? " त्यांनी स्पष्ट संमति एकदांही दिली नव्हती. " पाहूं ! पाहूं ! " एवढंच त्यानीं दर वेळेस म्हटलं होतं. मग त्यानं काकूंकडे आपला अर्ज नेला होता आणि त्यांनी तो एकदम मंजूर केला होता. दिवसाकाठीं दहा वेळा तो त्याना विचारी " काकू, मला नेणार ना ? तुमच्याबरोबर

मी येणार हं." आणि प्रत्येक वेळेस त्या त्याला आश्वासन देत "तुला नेणार!" आपल्या आईपेक्षां 'जांकीकाकू' फार चांगल्या आहेत याबद्दल त्याची खात्री पटली होती....

ती पटायला हवी होती अशांतला भाग थोडाच होता? पाच्छापूरला त्याचे वडील स्टेशनमास्तर होते तेव्हांच्या दिवसातही त्याला आपल्या आईपेक्षा जाकीकाकूच अधिक हव्याशा वाटत असत. तो आपल्या सोबत्याशीं खेळत नसला, दाडगाईत, तटयाबखेड्यांत गुतलेला नसला, जवळच्या रानांत चिचा पाडीत नसला म्हणजे तो जांकीकाकूंच्या घरात असायचा हें ठरलेलं. त्यांच्या घरचा फोडणीचा शिळा भात त्याला भारी स्वादिष्ट लागत असे. त्यांच्या सैंपाकघरांत टोपलीखालीं झाकलेली शिळी भाकरी तो मुद्दाम खायला मागून घेत असे. त्या म्हणत, "नुसती कशी खाशील?" त्या चटकन् आळूची देठी तयार करीत. पळी तापत घालून फोडणी तयार करून ती तिच्यावर चुर्रदिशी आवाज करून ओतीत. आणि मग त्या खमग फोडणीशी शिळी दळदार भाकर खाताना अतूला वाटे खायप्यायला द्याव जाकीकाकूनीच! आईला काही करताच येत नाही. त्याच्या स्वतःच्या घरांत म्हैस होती, मुबलक दुधदुभतं होतं. पण त्याची त्याला चव नव्हती. त्याच्या स्वतःच्या घरांत दोन्ही वेळां चपाती असे आणि चपातीवर भरपूर तूप मिळत असे, पण त्याचीदेखील त्याला चव नव्हती. काकूंच्या घरची शिळी भाकरी त्याला अधिक रुचकर आणि स्वादिष्ट लागत असे. घरांतल्या गादीपेक्षां काकूच्या गोधडीवर निजणं त्याला अधिक प्रिय असे. तो शक्य तितका वेळ जाकीकाकूच्या घरांतच काढी. दिवसांकाठी दहा वेळां त्याच्या आईनं ओरडावं, "काकू! अहो काकू! आमचा अतु आहे का?" मग काकूंनीं त्याला म्हणावं, "घरीं जा आतां. पळ...." अंतूच्या लहानपणाचे काही दिवस असे होते कीं त्या दिवसांत त्याला जाकीकाकू म्हणजे परब्रह्म वाटत होतं....

त्याचे वडील पाच्छापूरचे स्टेशन मास्तर असल्यामुळें स्टेशनच्या आवारांत त्याची मिजास एखाद्या राजाच्या मुलासारखी होती. स्टेशन लहान असल्यामुळें त्याच्या बापाच्या हाताखालीं तीन पोर्टराखेरीज आणखी मदतनीस नव्हते. जाणाऱ्या उतारूंना तिकिटं देणं, आलेल्यांचीं तपासून

घेणं, वरच्या खालच्या स्टेशनावर संदेश धाडणं, सारीं कामं त्याचे दादाच करीत. पण याचा अर्थ अंतु फार निराळा करी. त्याला वाटे. आपल्या बापाखेरीज आगगाडीच्या कारभारांतलं पानदेखील हालत नाहीं. कुणाला तिकिट हवं असेल तर त्यानं आपल्या बापाला साहेब म्हटलं पाहिजे. गाडीतून उतरणाऱ्या प्रत्येक माणसानं आपल्या बापाला तिकिट दाखवलंच पाहिजे. गाडी थांबविण्याचा अधिकार आपल्या बापाकडे आहे. आपल्या बापानं हु म्हटल्याखेरीज थांबलेली गाडी काय बिशाद सुटेल ? खरोखर आगगाडीच सारं राज्य आपल्या बापाच्या मालकीचं आहे असं अंतूला वाटे. स्टेशनाच्या कचेरीतील त्याला सगळ्यांत अजब वाटलेली वस्तु म्हणजे कड कट्ट कड कट्ट असा आवाज करणारं टेबलावरचं यंत्र. या यंत्राला त्याच्या बापाखेरीज दुसऱ्या कुणा माणसाची हात लावण्याची प्राज्ञा नव्हती. स्टुलावर बसून त्या यंत्रावर आपणही एकदा कड कट्ट करावं हा त्याचा फार दिवसांचा हट्ट त्याच्या बापान एके दिवशी पुरविला तेव्हां त्याला अगदी अस्मान ठेंगणं झालं. ज्याला त्याला तो विचारू लागला, " तूं कधीं कड कट्ट केलं आहेस काय?" आणि साऱ्यांनी "नाही बुवा कधी नाहीं" अस उत्तर दिल्यावर त्याचा छोटा ऊर विलक्षण अभिमानान भरून आला. त्याचा बाप म्हणजे खरोखर एक राजा होता ! आणि तो स्वतः त्या राजाचा मुलगा होता ! आपला अधिकार चालवून पाहण्यासाठी तो पुष्कळदां अस करी की, "महादू, सिग्नल दे " असं त्याच्या बापानं म्हटलं की तेंच वाक्य तो मोठ्या आवाजांत उच्चारी. आणि स्वतःची समजूत करून घेई कीं आपण हुकुम दिला म्हणूनच महादू धावत गेला व त्यानं सिग्नल पाडला. पुष्कळदां उतारूंची तिकिटं तपासून गोळा करण्यासाठी गेटाशी उभा राहिलेल्या आपल्या बापाला खेटून तो उभा रहात असे, बापाच्या हातांतलीं तिकिटं मागून घेऊन घट्ट धरीत असे, " तिकिट कुठे आहे ? " " तिकिट दाखव " असं बाया बापड्यांवर आणि म्हाताऱ्या कोताऱ्यावर ओरडत असे, आणि मग त्याला प्रामाणिकपणानें वाटत असे की उतारू आपला हुकूम ऐकतांच भराभरा तिकिटं देतात....

छपराच्या बहालाला टांगलेल्या रुळाच्या तुकड्यावर केशव पोर्टर एक किंवा दोनच ठोके वाजवी तें अंतूला मुळीच पसंत नसे. त्याला वाटे

शाळेंतल्या झंगटावर शाळा भरताना आणि सुटताना मास्तर जसा गजर करतात तसा गजर का नाही हा म्हातारा केशव करीत ? तो वारंवार त्या म्हाताऱ्याला तसा आग्रह करी. पण तो म्हातारा दर वेळेस म्हणे, " साहेब मारत्याल मला. नोकरीवरन काढूनबी टाकत्याल. " पण त्याची ही सबब अतूला खरी वाटत नसे. त्याला वाटे, चागला रूळ टागलेला आहे, त्याच्यावर घण् घण् घण् घण् असा गजर करायचा नाही तर त्याचा काय उपयोग ! आणि तसा गजर केला तर दादाना रागावण्याचं काय कारण ? ते केशवला नोकरीवरून काढतील कशाला ? हा म्हातारा आपल्याला काही तरी खोट सागतो. खर म्हणजे तो म्हातारपणामुळे थकला आहे, त्याचा हात एक किवा दोन टोले दिल्याबरोबर थकून जातो, तो चुकारपणा करतो, दुसरं काय ?

त्यान एक दिवस आपल्या बापाला विचारलं, " दादा, तुम्ही केशवला नोकरीवरून काढाल होय ? "

" म्हणजे काय ? "

" तो म्हणतो तुम्ही काढाल. मी त्याला म्हटल गाडी यायच्या वेळेस आणि सुटायच्या वेळेस दांडक्यावर चांगला गजर कां करीत नाहीस ? तर तो म्हणतो तुम्ही रागावाल आणि नोकरीवरून काढून टाकाल. "

" असं होय ? " त्याच्या दादानी कागद पेन्सिल काढून टेबलावरच्या पिवळ्या कळकट कागदावर काही तरी लिहिल आणि ते यत्रावर कड कट्ट करूं लागले.

त्याच्या आणखी जवळ सरकल्याखेरीज ते आपल्या प्रश्नाचं उत्तर देणार नाहींत असं वाटून अतु टेबलावर चढून बसला आणि खाली लोंबलेले पाय हालवीत म्हणाला, " दादा, सांगा ना. "

" अरे काय ? "

" गजर कां नाहीं करायचा ? म्हाताऱ्या केशवला करतां येत नसेल तर मला खांद्यावर घ्यायला त्याला सांगा म्हणजे मी वाजवीन घण् घण् घण् घण् ! "

" वेडा का काय तूं ? "

" कां ?—— "

" गजर नाही वाजवायचा बाबा ! "

" पण कां ? "

" तसा नियम आहे रे. "

" नियम म्हणजे काय दादा ? "

" नियम म्हणजे – अरे नियम ! दुसरं काय ? ज्याप्रमाणें केलंच पाहिजे त्याला नियम म्हणतात ! तूं जा पाहू आतां " त्यानी त्याला उचलून खाली ठेवलं.

" हे नियम कोण करत हो दादा ? "

" कंपनी ! "

" कपनी ? ती कुठे राहते ? "

" मसणांत ! तू जातोस कीं नाही आता ! " त्यानी त्याला ढकललं आणि केशवला हाक मारून ते म्हणाले, " याला उचलून ने रे जरा बाहेर."

बाहेर गेल्याबरोबर त्यान त्या म्हाताऱ्याला विचारलं, " केशव, कंपनी कुठे राहते रे ? "

" कुठली कपनी म्हणता ?"

" दादा म्हणतात ती. "

केशवला त्याच्या बोलण्याचा कांहीच बोध होईना. विषय बदलण्याच्या हेतून तो अंतूला म्हणाला, " ताजी कणस आल्याती आमच्या घरात. येता का खायला ? "

कणसाच नाव ऐकल्याबरोबर अतूला आपल्या मुख्य प्रश्नाचा विसर पडला आणि दादा म्हणतात ती कंपनी कुठें राहते याबद्दलचं त्याचं सशोधन अपुरच राहिलं.

रुळावर दांडक्यान गजर का करायचा नाही हे जसं अतूला कोड पडलं होत तसंच दुसर एक कोडं फार दिवस पडल होतं; आणि दादांचा अधिकार कितीही मोठा असला तरी कांही गोष्टी त्यांच्या हातांत नाहींत अशी शंका पहिल्या कोड्यातून निर्माण झाली होती ती या दुसऱ्या कोड्यानं बळावली होती पाच्छापूरच्या लहानशा स्टेशनवर बहुतेक गाड्या थांबत. मालगाडी तर घटकान् घटका उभी राही. पण दोन गाड्या कधीं थांबत नसत. धडाड् धडाड् करीत त्या वरच्या किंवा खालच्या बाजूनं येत आणि वेगानं निघून जात. या गोष्टीचा त्याला फार अचंबा

वाटे. आपल्या स्टेशनावर उभ्या न राहणाऱ्या या कोण अशा मोठ्या गाड्या अस त्याला वाटे. त्या गाड्यांचा त्याला राग येत असे. आणि काय युक्ति केली म्हणजे त्या थांबतील आणि त्यांची जिरेल याचा विचार तो आपल्या मनाशी पुष्कळदां करी. महादूनं सिग्नलच पाडला नाहीं तर या गाड्या थांबतील हें त्याच्या एक दिवस अचानक लक्षांत आलं. त्यानं त्याला फितुर करायचं ठरविलं. पण त्याची फंदफितुरी साधली नाही. म्हाताऱ्या केशवप्रमाणेंच महादूनंही त्याला उत्तर दिलं. "हॅं. ! भलतंच काय इचारतासा ? साहेब मला नोकरीवरून काढूनशान् टाकतील कीं."

ज्या त्या गमतीच्या आड येणारी आणि लोकाना नित्य धाकांत ठेवणारी ही 'नोकरी' म्हणजे मोठी दुष्ट चमत्कारिक गोष्ट असली पाहिजे याबद्दल अंतूची आतां खात्री पटू लागली.

त्यानं आपल्या बापाला त्या न थांबणाऱ्या गाड्याबद्दल विचारलं तेव्हां त्याला उत्तर मिळालं, "अरे त्या मेल गाड्या आहेत."

"मेल गाड्या ? म्हणजे काय ?"

"म्हणजे आपल्या स्टेशनावर थांबतात ना, त्याच्याहून निराळ्या."

"निराळ्या कशा दादा ? त्यांनाही इंजन असतच ! आणि त्यांतसुद्धां माणसंच बसलेलीं असतात कीं !"

"अरे पण त्यांनी जास्त पैसे दिलेले असतात."

"ह्यांच्या इजिनाला पाणी लागत नाही होय ?"

"लागतं. पण तें त्या दुसऱ्या स्टेशनावर घेतात."

"तें पाणी जास्त चागलं असतं होय ? तें घातलं कीं इंजिन जास्त जोरांत धावतं ?"

"आतां गप्प बसतोस का केशवला हांक मारूं ?"

"पण सागा ना दादा. शिटी फुकली तर उभी राह्यची नाहीं गाडी ?"

"अं हं."

"तुम्ही फुकलीत तरी देखील नाहीं उभी राह्यची ?"

"नाही रे, तू जा पाहूं आतां."

"पण सांगा ना. कां नाही उभी राह्यची ?"

"तसा नियम आहे."

" कुणाचा ? "

" कपनीचा. "

" ही कपनी कुठें राहते दादा ? "

" सागतों हं. केशव, याला इथून उचलून ने पाहू "

दुसऱ्याच क्षणीं केशवनं त्याला आपल्या खाद्यावर ठेवलं आणि बाहेर नेलं.

अंतूच कंपनीबद्दलच वाईट मत काही साफ झाल नाही, आणि दादाची एवढी मोठी हुकमत असली तरी काही गोष्टी त्याच्या हातात नाहीत ही त्याच्या मनातली शका दृढ झाली.

त्या दोन मेल गाड्या आपल्या स्टेशनावर कधी उभ्या राहू नयेत याबद्दल अंतूचा त्यांच्यावर जरी राग होता तरी त्या बघायला तो आपल्या सवगड्यासह नेमान हजर राही. धडाड् धडाड् करीत त्या गाड्या येत आणि त्यांच्यापुढून निघून जात. इजिनातला ड्रायव्हर नीट दृष्टीस पडावा म्हणून तो आणि त्याचे मित्र डोळे फाडून पाहण्याची पराकाष्ठा करीत. पण त्याना तो कधीच दिसत नसे. " दिसला रे दिसला " म्हणून ती मुल ओरडतात न ओरडतात तोंच झुक् झुक् आवाज करणारं, धुराड्यांतून धुराचे लोट सोडणारं, आणि कधी कधी गरम पाण्याचा झोत बाहेर फेकणारं इजिनाचं धूड दूर निघून जाई. मग गाडीचे डबे एका मागोमाग पटापट जात, आणि खिडकीतून दिसणाऱ्या माणसाची तोड त्याच्या नजरेपुढून वेगान सरकत. अंतु आणि त्याचे सवंगडी हात उंच करून हालवीत " जावा ! जावा ! " " हिप हिप हुरे " अशा तोडाला येतील त्या आरोळ्या ठोकीत, आणि त्याच्यापैकी दोघे तिघे तोंडात बोट घालून शिट्या फुंकीत.

शिट्टी वाजविण्याच्या कामात सुलेमान पोर्टराचा मुलगा कासम सगळ्यात पटाईत होता. अगठा आणि एक बोट जिभेखाली ठेवून तो अशी काही खणखणीत शीळ घाली की धावत्या आगगाडीच्या चाकांच्या धाड् धाड् आवाजातही ती ऐकू येई आणि तिन क्षणभर सारं आभाळ भरून टाकल्यासारखं वाटे. आणि शिवाय तो एकाच प्रकारची शिटी घालीत नसे. मोकळ्या रानांत मैल अर्धा मैल सहज ऐकूं जाईल अशी शिटी तो वाजवी ती खणखणीत एकेरी हांकेसारखी असे. पक्ष्यांचे निरनिराळे आवाज तो तोंडानं काढून दाखवी तेव्हा त्याची शीळ नाजुक असे. गांवालगतच्या

घाणेरड्या साडपाण्यात तरंगणाऱ्या किंवा कधी आपल्या पिवळ्या पायांच्या फतकड्या पंजावर तोल सावरून जमिनीवरून डुलत डुलत चालणाऱ्या ढेरपोट्या बदकाचा 'क्लक् क्लक्' असा आवाजही तो काढून दाखवी. आगगाडीच्या गार्डाची किर्रर्र अशी कर्कश शिटी तो इतकी हुबेहुब वाजवी की एकदा पाच्छापूर स्टेशनावर थांबलेल्या एका पॅसेंजर गाडीचा गार्ड स्टेशनात दादांशी बोलत असतानाच गाडी सुरूदेखील झाली, आणि तो गार्ड आणि दादा बाहेर धावत आल्यावर त्यांना कळलं की कासमनं शिटी वाजविली ती ऐकून ड्रायव्हरनं गाडी सोडली होती ! मग गार्डानं घाईघाईनं किर्रर्र किर्रर्र अशा शिट्या घालून गाडीला थांबण्याचा इशारा दिला होता, "कासम्या !—–" म्हणून कासमचा कान पकडून चार गावठी शिव्या देऊन, दोन तोंडांत लगावून त्याला हाकून दिलं होतं आणि दादांना बजावून सांगितलं होतं, "गाडी उभी असताना या कासम्याला येऊ देऊ नका कधी." त्या दिवसापासून गाडीच्या वेळेस आपला प्रतापी बाळ आजूबाजूस नाही याची खात्री करून घेण्याचं नवचं काम सुलेमान पोर्टरच्या मागं लागलं होतं.

कासमशीं मैत्री ठेवण्याबद्दल अतुला दादांची बोलणी खावीं लागत. त्याचीं ती रागाची बोलणी ऐकली की अतुला भय वाटे. परंतु त्यांचं बोलणं त्याला पटत नसे. "कासम उनाड आहे" "त्याच्या संगतीनं तू बिघडशील" इत्यादि शब्दांचा अर्थच त्याला कळत नसे. कासमच्या अंगीं तर एकाहून एक चांगले गुण असलेले त्याला दिसत होते ! शिटी वाजविण्यात जसा तो पटाईत होता तसाच झाडावर चढणं, पोहणं, गलोल मारणं, आंबे चोरणं अशा आणखी किती तरी गोष्टींत तो निष्णात होता. कासम म्हणजे अंतूचा 'हीरो' होता. त्याच्यासारखं आपण व्हावंसं त्याला वाटे. बोलण्याचालण्याच्या त्याच्या लकबी तो उचलीत असे. बोलतांना डोक्यावरची झुलपं डाव्या तळव्यानं मागं करण्याची आणि दातांतून थुंकीची पिचकारी मारण्याची लकब त्याला जडली होती, ती कासमची नक्कल वठविण्याच्या इच्छेनंच. त्याच्या डोक्याच्या मागच्या बाजूस टप्पल मारून दादा त्याला म्हणाले होते, "पाहिलंस काय, कासमच्या संगतीचं हें फळ !" कासमच्या तोंडांतली एक ठराविक शिवीदेखील त्याच्या तोंडांत बसलेली

पाहिल्यावर तर दादानी त्याचा कानच पिरगाळला होता. परंतु केसांची झुलपं माग सारण, थुकीची पिचकारी टाकण, आणि 'च्यायला,' असं म्हणून प्रत्येक वाक्याचा ऐटदार आरभ करण यात वाईट काय होत तें अंतूला कळलं नव्हत. दादाच्या रागवण्याचा त्याला राग आला होता. "अरे मुसलमानाच्या घरी आपण जाऊ नये." अस त्याची आई दादा त्याला सागत. त्याचा तर त्याला मुळीच अर्थ कळत नसे. कासम धोतरच नेसत असे. महादूच्या आणि केशवच्या घरासारखच सुलेमानाच घर होत! तशीच चूल, तशीच भाडीकुडी, टोपलीखाली झाकून ठेवलेली भाकरी, सगळ काही तसंच! त्यान आपल्या आईला विचारल,

"महादू आणि केशव नाहीत का मुसलमान !

त्याची आई म्हणाली, "नाही, ते मराठे आहेत."

त्यान विचारल, "मराठे म्हणजे काय ?"

"मराठे म्हणजे आपल्याच धर्मांतले."

"धर्मांतले म्हणजे काय ग आई ?"

"तुझ डोबल! जास्त विचारशील तर देईन एक मुस्कुटात. कासम मुसलमान आहे हे लक्षात ठेव आणि त्याच्या घरी जात जाऊं नकोस. गाईच मास खाणारी मेली माणस–"

ते ऐकल्याबरोबर अतु म्हणाला "हॅं:! काही तरीच बोलतेस आई तू! कासमच्या तोंडाला गायीचा वास कधी तरी येतो काय ? त्याचा उष्टा पेरू मी कितीदा तरी खाल्ला आहे !"

"आ? काय म्हणालास मेल्या अत्या ? –" असं उंच आवाजात खेसकून त्याच्या आईन पजा पसरून हात उगारला होता.

अतु तिच्या पुढून निसटून कासमच्या घराकडे धावला होता.

कासम मुसलमान आहे म्हणजे काय ते त्याला नतरही कधी समजलं नव्हत. कासम त्याचा 'हिरो' च राह्यला होता. त्याची संगत त्यानं सोडली नव्हती. कासमच्या टोळक्यात सामील होऊन हिडणं फिरणं, पाण्यांत डुबण, राईंतल्या झाडावर दोर बांधून झोके घेणं, पेरू आणि आंबे खाणं, गलोल मारून छोटया पक्ष्यांची शिकार करणं, त्यांच्या घरटयांतलीं अंडी काढणं, स्टेशनावरून वेगानं निघून जाणाऱ्या मेलगाड्या

बघतांना शिट्या घालणं, अशी नाना परीची मौज करीत पाच्छापुरांतले दिवस अंतून काढले होते....

नोकरींतून निवृत्त होऊन त्याचे दादा या शहरात आले तेव्हांपासून त्या मजेच्या आयुष्यास तो मुकला होता. त्याच्या जिवाला चैन नव्हत, उदास एकटेपणानं तो रजीस आला होता....

पण जाकीकाकू एकाएकी दाखल झाल्या होत्या आणि आता तो त्यांच्या-बरोबर परत जाणार होता ! जिथे खूप खूप गमत होती त्या पाच्छापूरला ! जिथें कासम त्याची वाट पाहत असेल, जिथल्या शेतात आणि रानांत पक्षी त्याच्या तोंडच्या शिटीची वाट पाहत असतील, जिथल्या डोहात पुरुषभर काळंभोर पाणी सांचलेल असेल, जिथल्या राईत आब्याच्या डहाळ्या फळानी लोबल्या असतील आणि आबेमोहोराचा सुगध दरवळला असेल....

उद्यां सकाळी उठून आपण जाकीकाकूंबरोबर पाच्छापूरला जाणार म्हणून अतूला गाढ झोप लागली, परंतु त्या गाढ झोपेत त्याला स्वप्नामागून स्वप्नं पडत होती. कासमच्या हातांत हात घालून तो हिंडत होता ! त्याच्या डोळ्यांपुढून धावत्या मेलगाड्याच्या डब्यातल्या माणसाचे चेहरे सरकत होते ! डोहांतलं पाणी गार गार लागत होत ! आबराईचा रखवालदार धावून आला तेव्हा झुकाडी देताना तो अडखळून पडल्याबरोबर कासम त्याला उचलून घेत होता !....

सकाळी त्यानं डोळे उघडून पाहिल तो खोलींत सूर्याचा प्रकाश तुडुब भरला होता. आपण उशीरा उठलों हें लक्षांत आल्याबरोबर तो ताड्कन उठला आणि ओरडला, " जाकीकाकू !"

तो आंतल्या खोलीत गेला तेव्हां काकूची वळकटी त्याला दिसली नाहीं! शर्ट, चड्डया, पत्त्यांचा जोड, टिनचा डबा इत्यादि त्याचं सामान मात्र जमिनीवर पडलेलं त्याला दिसलं !

सैंपाकघरात धावत जाऊन त्यानं आईला विचारलं, " जांकीकाकू कुठे आहेत ग ? "

" उजाडतांच गेल्या त्या. "

" मला कां नाहीं उठवलं त्यांनीं ? मला नेणार होत्या ना त्या आपल्याबरोबर ? "

त्याची आई हंसली व म्हणाली, " त्या नेणार म्हणाल्या तें तुला खर वाटलं होय ? तुझ्या समजुतीसाठी त्या म्हणाल्या ! " त्याची रडवी चर्या पाहून त्याची आई पुढे म्हणाली, " आहे काय त्या पाच्छापूरला ?"

आहे काय ? ....

या खुळ्या आईला काय सांगायचं ?

अतूला एकदम हुदके आले आणि परत अथरुणाकडे जाऊन तो पालथा पडला आणि त्यान आपलं तोंड गादीत गच्च लपविलं ! पाच्छापूरला जाण्याची संधि हुकली म्हणून तर त्याला दु:ख झाल होतंच, परतु अधिक असह्य वेदना होती ती या विचाराची की जाकीकाकू त्याला फसवून निघून गेल्या होत्या ! .... आपल्या आईपेक्षा आणि दादापेक्षा जांकीकाकूची आपल्यावर अधिक माया आहे त्या आपल्याला कधी फसविणार नाहीत, आपला हट्ट त्या पुरवतीलच अशी खात्री त्यान मनाशी ठेवली होती. त्याची ती खात्री एकदम ढासळली ! आणि त्या गोष्टीचं जे दु:ख होतं तें अंतूच्या नाजुक बालमनाला प्रचड वाटत होत ! .... त्यान पालथ पडल्या पडल्या आपल तोड गादीवर खसा खसा घासल, दोन्ही हाताच्या मुठीत चादर पकडून ओरबाडली, आणि मग हुदके देत तो पडून राहिला ! .... मनातल्या इच्छा आणि जीवनाचा जुलूम यातील संघर्षाचा तो पहिला अनुभव त्याला सोसवत नव्हता !

# ९ . . . . . . ऑपरेशन

घरातल्या साऱ्या मंडळींचं पुष्पाला फार आश्चर्य वाटत होतं. अवघ्या आठ दिवसानी जयत इंडोनेशियातल्या आपल्या नव्या जागेवर रुजू होण्यासाठी जाणार होता. त्याचं जाण म्हणजे तिला भयंकर आपत्ति वाटत होती. तिचं जयंतशी लग्न झालं त्याला पुरते आठ महिने काही झाले नव्हते. आणि या आठ महिन्यात त्याचं बहुतेक वास्तव्य दिल्लीसच झालं होतं. एकंदर जेमतेम महिना दीड महिनाच त्याचा सहवास तिच्या वाटयाला आला होता. विमानदलातील माणसाशी लग्न करूं नकोस असं अनेक लोकांनीं तिला सागितलं होतं. तिचे अण्णा आणि तिची आईदेखील म्हणाली होती, " जयंत म्हणजे हजारांतला मुलगा आहे. कबूल. पण तो वैमानिक आहे ही गोष्ट चांगली नाही. हें लग्न तू न करशील तर बरं." पण ती जयंताच्या प्रेमांत अशी काही सापडली होती की लोकाचे उपदेश आणि इशारे तिला ऐकूच येत नव्हते. तिनं मनाशी विचार केला होता, सैन्यांतली थोडीं का माणसं अगदी सुखरूप म्हातारी होतात. माणसाला अपघाती मरण यायचंच असल तर अथरुणांतसुद्धां येतं. ज्याच्या त्याच्या नशीबाची गोष्ट आहे ही. जयताचं माझ्यावर प्रेम बसलं हा माझ्या थोर नशीबाचा पुरावा आहे. माझ्या कपाळाच्या कुंकवाची रेघ भक्कम असेल तर जयंत जन्मभर लाभेल मला ! .... तिनं कुणाचीही सल्लामसलत न मानतां जयंतशीं लग्न केलं होतं....

तिचं लग्न झालं तेव्हां आपली दूर परदेशांत कधीं बदली होईल असा संभव जयंतला स्वतःला देखील कधीं वाटला नव्हता. त्याची कल्पना होती की आपली नोकरी नेहमीं दिल्लीसच असेल. त्याला सोडून पुण्यास माहेरीं राहवं लागल्यामुळं पुष्पा नाराज होती हें त्याला कळत होतं. तिला

दिल्लीस घेऊन जाण्याची त्याची इच्छा होती. परतु राहण्यासाठीं चांगली जागा मिळविण्याची त्याची खटपट कांही साधली नव्हती. चार सहा दिवसांची रजा मिळाली की तो पुण्यास अक्षरशः धांव घेई. पुष्पाच्या घरी राही. ती त्याला विचारी, " आपण दिल्लीस केव्हां जायचं रे राह्यला ?"

तो तिला कुरवाळून म्हणे, " मी त्याच खटपटींत आहे. पण जागा मिळाली पाहिजे ना ? "

" आपल्याला बंगलाच पाहिजे असं नाही कांहीं. दोन खोल्यांतसुद्धां सुंदर संसार मांडून दाखवीन मी. बघशील. "

दोन खोल्यात राहण्याची तिची कल्पना जयंतला हास्यास्पद वाटे. पण ती ऐकून तो मनाशी म्हणे, हिला माझ्यापासून दूर राहवत नाहीं एवढाच याचा अर्थ. म्हणून तो तिला म्हणे, " पण दोन खोल्या तरी मिळायला हव्यात ना ?"

" अँ हँ ! काय सांगतोस ? एवढी दिल्ली अन् दोन खोल्या मिळत नाहीत काय ? "

" अग खरंच मिळत नाहीत. काय सांगू तुला ? "

" मिळत नसतील तर त्याचा नादच सोडू आपण.... एखाद्या हॉटेलांत राहू. अ ? "

" हॉटेलांत ? ते काय म्हणून ? चांगल्यापैकीं बंगला मिळवितों बघ मी. "

" पण आतां उशीर नको करूं बाबा. तुझ्यावेगळं मला इथें चैन पडत नाहीं. "

" पुष्पे, मला कळत का नाहीं ? आतां पंधरा दिवसाच्या आंत बंगला मिळवतों बघ. ही माझी प्रतिज्ञा समज अगदी. "

जयंतनं ही प्रतिज्ञा पूर्ण केली होती.

" बगला मिळाला " अशी त्याची तार आली होती. आणि पुष्पा नाचूं लागली होती. " आतां आम्ही दिल्लीस जाणार ! "

पण नंतर पुरते चार दिवसदेखील लोटले नाहींत तोंच जयंतचं पुष्पाला पत्र आलं होतं की भारत सरकारनं खूप मोठ्या पगारावर इंडोनेशियाला वैमानिक कचेरीचा व्यवस्थापक म्हणून त्याची नेमणूक केली होती, तिकडे

जाण्यासाठीं त्याला लवकरच निघावं लागणार होतं, घेतलेला बंगला तो दुसऱ्याला देऊन टाकीत होता.

जयंताचं तें पत्र आल्यानं वज्राघातच झाल्याप्रमाणें पुष्पाला वाटलं होतं. दिल्लीस संसार मांडण्याच्या तिच्या साऱ्या मनोरथांचा चुराडा झाला होता. आता तिला जयंतजवळ राह्यला मिळण्याऐवजी तो साता समुद्रांच्या पलीकडे दूर जाणार होता. त्याची नोकरी दिल्लीस होती. तेव्हां महिन्या दीड महिन्यानं का होईना आणि चार आठ दिवसांसाठीं का होईना तो तिच्या वाट्याला येत असे. त्याच्या सहवासाचं भरपूर सुख तिला घेतां येत असे. पण आतां तो इंडोनेशियाला गेल्यावर तिचं तेंहि सुख नाहींसं होणार होतं. ती त्याला अतरणार होती. किती दिवसांसाठी परमेश्वर जाणे !

इंडोनेशियाला जाण्यापूर्वींचे आठ दिवस पुष्पाच्या सहवासांत घालविण्यासाठी जयंत आला. तो आल्यामुळें पुष्पाला बरं वाटलं खरं, परंतु तिला आनंद झाला नाहीं. आतां आठ दिवस तो आपल्या जवळ असेल या विचारापेक्षां आठ दिवसानी तो आपल्याला सोडून फार दूर जाणार आहे हा विचार तिच्या मनांत अधिक वावरत होता. त्याच्या सहवासांत मिळणाऱ्या सुखापेक्षां तो गेल्यावर जें दुःख तिच्या वाट्याला येणार होतं त्याच्या कल्पनाच तिच्या मनांत अधिक डोकावत होत्या. " जयंत आला ! " या उद्गाराऐवजीं " जयंत जाणार ! " हा उद्गार ती स्वतःशीं वरचेवर काढीत होती, आणि कष्टी होत होती. " आठ दिवस उरले ! " " सात दिवस राहिले ! " "सहाच ! " असं ती मनाशीं घोकीत होती. जयंताचं जाणं म्हणजे एक भयंकर दुःखाची घटना आहे असं तिला वाटत होतं. पूर्वीं तो येत असे, आठ दिवस राहून जात असे. परंतु तो जायला निघे तेव्हां ती आपल्या मनाची समजूत घाली, " पुन्हां महिन्याभरानं तो येईलच कीं." या वेळेस तिला आपल्या मनाची अशी समजूत घालतां येणार नव्हती. यामुळें या वेळचं त्याचं येणं तिला फार निराळं वाटत होतं. आणि म्हणूनच घरांतल्या साऱ्या माणसांचा तिला मोठा चमत्कार वाटत होता.

जयंत आठ दिवस राहायसाठीं आल्याबद्दलचा तिचा स्वतःचा आनंद तो आपल्याला टाकून दूर जाणार या कल्पनेनं नासलेला होता, काळवंडलेला होता. पण घरांतल्या साऱ्या माणसांचा आनंद निर्भेळ असलेला तिला दिसत होता,

व त्याचं तिच्या मनाला आश्चर्य वाटत होतं. ती सारी माणसं म्हणत होतीं, "जयंत आऽठ दिवस राहणार." तिला स्वतःला वाटत होतं, "आठच दिवस राहणार". जयंतच्या पूर्वीच्या येण्यांत आणि आतांच्या येण्यांत तिला स्वतःला मोठा फरक वाटत होता याची जाणीव घरातल्या माणसांना नव्हती. तो जसा पूर्वी येत असे तसाच आतांहि आला आहे असं तीं सगळी माणस समजत होती. "जयंत, जयंत" म्हणून त्याच्याभोंवतीं नाचत होतीं. त्याचा आनंद निर्भेळ होता. या गोष्टीचं पुष्पाला फार आश्चर्य वाटत होतं .... तिच्या मनात सारखं येत होतं, जयंत जाणार म्हणून या माणसांना दुःख कस होत नाही ? माझं मन याना कुणाला कळत कसं नाही ? माझी मनोव्यथा फक्त माझ्यापुरतीच ?....

तिच्या वडिलांना ज्या एकाच गोष्टीबद्दल वाईट वाटलेलं दिसत होतं ती ही की मोठ्या प्रयत्नान मिळविलेल्या बंगल्याचं तीन महिन्यांचं भाडं जयंतनं अगाऊ दिलं होतं तें आता फुकट भरल्यासारखं होण्याचा संभव होता. तिच्या आईला तर तिचं दिल्लीला जाणं रहित झालं म्हणून आनंद झाला होता. "आता पुष्पा काहीं इतक्यांत माझ्यापासून दूर जाणार नाही" असं एखादी मोठी आनंदाची बातमी सांगितल्याप्रमाणें ती वरचेवर शेजाऱ्यापाजाऱ्यांना सांगत होती. तिच्या असल्या बोलण्यात तिची लेकीवरची माया दिसून येत होती खरी. पण तें ऐकून पुष्पाच्या मनांत येत होतं, माझी केवढी निराशा झाली तें आईच्या गावीदेखील कसं नाहीं?.... तिला वाटलं होतं इतरांचं राहो. निदान इंडोनेशियाला एकटंच जावं लागणार म्हणून जयंत तरी नाराज झाला असेल. तुला सोडून मी एकटा जातों आहे याचं मला फार वाईट वाटतं, माझ्यावांचून तुला एकटीला चैन पडायचं नाहीं, तूं माझी काळजी करशील, मलादेखील तुझी फार काळजी वाटेल, शक्य तों लवकर तुला तिकडे नेण्याची खटपट करीन, अस कांहीं तरी तो बोलेल – चार चौघांत न का होईना पण एकांतांत तरी बोलेल – अशी तिची अपेक्षा होती. त्याच्या तसल्या बोलण्यानं तिच्या वांट्याला येणारा विरह टळणार नव्हता. परंतु तें ऐकून तिच्या मनाला थोडं समाधान खचित झालं असतं. परंतु तिनं पाहिलं तों जयंत चारचौघांत काय किंवा एकांतांत काय अशा प्रकारें बोलत होता कीं जणुं त्याच्या मागे ती एकटी राहणार याची कल्पनाच त्याच्या

मनाला शिवली नव्हती. मोठ्या हुद्याची आणि पगाराची जागा मिळाल्याबद्दल तो बढाई मारीत होता. जाण्यापूर्वी अमुक केल पाहिजे, तमुक केलं पाहिजे, असे त्याचे बेत चालले होते. इंडोनेशियांतली माणस अशी आहेत, हवा अशी आहे, सृष्टिसौदर्य असं आहे अशी त्याची बडबड चालली होती. त्याला भेटायला येणारी माणसं विचारीत, "पुष्पाला घेऊन जातोस, की एकटाच ?" तो उत्तर देई, "पुष्पाला कुठली नेतों ? एकटाच जाणार !" आणि असं सांगतांना त्याच्या चेहऱ्यावर खेदाची बारीकदेखील छटा दिसत नसे . . . . पुष्पा मनाशीं आश्चर्य करी, पुरुषाची जात इतकी आत्मनिष असते काय ? हा जयंत आपल्याच दिमाखांत, आणि बढाईंत ? माझ्या मनाला काय वाटत असेल याचा विचार याच्या मनाला शिवतच कसा नाहीं ? . . .

एकदां रात्री एकांतांत तिनं त्याला मिठी मारली आणि त्याच्या खांद्यावर डोकं ठेवून ती रडू लागली. तो म्हणाला, "रडतेस काय वेडयासारखी ?"

तिनं काही वेळ न बोलतां हुदके दिले आणि म्हटलं, "मला सोडून तुला जाववतं तरी कसं ? "

तो नुसता हसला.

तिनं विचारल, " जाऊं नकोस असं मी म्हटलं तर रद्द करशील का जाण ? "

तो म्हणाला, " कुणाला न मिळणारा चान्स घालविला तर लोक मूर्खांतच काढतील मला. "

तिला जे हवं तें तो कांही केल्या बोलेनाच. तिलां मोठं आश्चर्य वाटलं. राग आला. शेवटी तिला राहवेना म्हणून तिनं विचारलं, "तुझ्यावांचून इकडे एकटी कशी राहू रे मी ? "

तो म्हणाला, " कशांत तरी मन गुंतविलंस की तुला जड जायचं नाहीं नाहीं तरी तुझ्या मनांत गाण्याची शिकवणी पुन्हां सुरू करायचीच होती ना ? त्या शिकवणीत आणि प्रॅक्टिसमध्यें तुझे चार सहा तास सहज जातील शिवाय तुझं आवडतं कशिद्याचं काम आहे, पुस्तकं आहेत, सिनेम नाटकं आहेत. मला आतां एवढा मोठा पगार मिळणार आहे कीं तुल दर महिन्याला दोन अडीचशें रुपये केवळ पॉकेट मनी म्हणून मी सहज पाठवू शकेन. हव्या तेवढ्या साड्या घे आतां –"

तें ऐकून पुष्पाला वाटलं, त्याच्या थोबाडींत मारावी, किंवा त्याला चावावं, किंवा नखांनी चांगलं ओरबाडावं. आपल्या मनांतलं दुःख तो ओळखील, तो आपली समजूत घालील, पुढें सोसाव्या लागणाऱ्या विरहानं ती एकटीच नव्हे तर तोसुद्धा व्याकूळ झाला होता असं तो तिला सांगेल, असं तिला वाटलं होतं....अणि तो हें काय बोलत होता ? ....गाण्याची शिकवणी, कादंबऱ्या, सिनेमा नाटकं, आणि साड्या ! ....

मग मात्र तिन निश्चय केला की इतरांच्या जवळ तर आपल्या मनांतलं दुःख उघड करायचं नाहीच, पण जयंतलादेखील ते सांगायचं नाही. या निश्चयाप्रमाणे ती वागूं लागली....चवदावी तारीख दिवसादिवसानं जवळ जवळ येऊ लागली. आठ दिवसांचे सात दिवस उरले, साताचे सहा उरले, सहाचे पाच झाले. कॅलेंडरवरची जुलायची चवदावी तारीख रोज सकाळी उठल्याबरोबर तिच्या दृष्टीस पडे. ती मनाशी म्हणे, "माझ्या दुःखाच्या प्रारंभाचा दिवस जवळ आला....ज्या घटकेस जयंताला ती अखेरचा निरोप देणार होती त्या घटकेस आपल्या मनाची अवस्था काय होईल याची कल्पना ती कधी कधी करून पाही. तिला वाटे, माझं एक मोठ ऑपरेशनच व्हायच आहे म्हणायच ! खरोखरच ज्या माणसाच ऑपरेशन व्हायचं ठरलेलं असत तें माणूस ऑपरेशनच्या दिवसाची जशी वाट बघत असत तसच तिचंदेखील वाट पाहणं होतं. कारण काही दिवस तिला वाटलं होत, जयतच जाण माझ्याच्यान कस सोसवेल ? जुलायची ती चवदा तारीख यायलाच नको ! पण नतर नंतर ती तारीख जवळ जवळ येत आहे या जाणीवेचाच तिला फार त्रास होऊं लागला. आणि तिला वाटू लागलं एकदांची ती चवदा तारीख येऊन उलटेल आणि जाईल तर फार बरं होईल. आपल्याला दुःख होणार, यातना सोसाव्या लागणार, या कल्पनेपेक्षा काय ज्या यातना सोसायच्या असतील त्या सोसून टाकलेल्या फार बऱ्या दुःखाची वाट पहाणं नको ! त्यापेक्षां तें प्रत्यक्ष आलं, आपण सोसलं, दूर गेलं तर तें फार बरं.

जयत ज्या दिवशी जाणार होता त्याच्या आदल्या रात्री तिच्या आईबापांनीं मोठ्या मेजवानीचा बेत केला. खूप पाहुणे जमले. अगदीं आनंदांत जेवणं झाली. नंतर गप्पा झाल्या. सगळ्या पाहुण्यांना निरोप देऊन, नंतर

घरच्या बायकांत थोडंथोडं बोलत बसून पुष्पा माडीवर आपल्या खोलीत गेली तेव्हां साडे बारा वाजले होते. ती अगदी थकून शिणून गेली होती. दिवसभर धावपळ करावी लागली होती म्हणून. त्याहीपेक्षा अधिक वरकांती हंसतमुख राहून मनाची तीव्र खिन्नता, निराशा आणि उदासपणा लपविण्याचा प्रयत्न करण्यांत जो चमत्कारिक एकटेपणा तिला सोसावा लागला होता त्यामुळे !.... वर खोलीकडे जाताना तिच्या मनांत आलं, आतां जयतच्या कुशीत आपण शिरलों की आपला सारा शीण जाईल. या शेवटच्या रात्रीदेखील आपल्या अतरगांतलं दुःख ती जयंतला दाखविणार नव्हती. ज्याची किमत त्याला कळतच नव्हती तें दाखविण्यांत काय अर्थ होता ? गेल्या आठ दिवसात तिनं आपला स्वाभिमान शाबूत ठेवला होता. आजहि ती स्वाभिमानानंच वागणार होती. एवीतेवी तिचं दुःख हलकं करण्याची बुद्धि त्याला सुचत नव्हती. मग ही शेवटची रात्र बिघडवायची कशाला ? या रात्रीच शक्य तितक सुख त्याला तरी घेऊं दे ! त्याच्या आठवणीत सदैव राहील अशी ही रात्र होऊ दे.... आपणहि या अखेरच्या रात्रीच्या आठवणी करूं आणि आपलं दुःख हलकं करूं....

तिन अगदी अधीरपणानं दार बंद केलं आणि कडी लावली.

पण ती घाईन पावल टाकीत अथरुणजवळ गेली आणि तिनं पाहिलं तों उजवा हात डोळ्यावर आडवा टाकून जयंत झोपी गेला होता !

त्याला गुदगुल्या करून जागं करण्यासाठीं तिनं त्याच्या अंगावर बोटं फिरविलीं. पण तो जागा झाला नाहीं. दोन तीनदां गुदगुल्या केल्यावर त्यानं फक्त "अ ऽ ऽ" असं करून डोळ्यावरचा हात काढला आणि तो डाव्या कुशीवर वळला !

तिनं त्याला परत वळवून हांक मारली. त्यानं डोळे उघडले. तिला पाहिल्याबरोबर त्यानं हास्य केलं आणि हात पुढे करून तिला जवळ ओढल. ती त्याच्या मिठीत शिरलीहि. परंतु तसं करतां करतांदेखील ती मनातल्या मनांत खिन्नच झालेली होती. तिच्या दृष्टीनं ज्या सुखासाठीं ती आतुर झाली होती तें याहून वेगळं होतं. आणि तें मघाशींच नाहींसं झालं होतं ! तिला वाटलं होतं ही शेवटची रात्र आहे हें ओळखून जयंत तिची वाट पहात खोलीत बसला असेल. तिनं खोलींत पाय

टाकल्याबरोबर दाराशींच तो तिच्याभोंवतीं हाताचा विळखा घालील. तिला उचलून तिच्या कानांत कांहीं तरी गोडगोड बोलत तिला शय्येकडे नेईल. .... परतु यापैकी काहीच घडलं नव्हतं ! .... तिच्या दृष्टीनं जे सुख तिला भेटायला हव होतं त्याची व तिची चुकामुक झाली होती! ....

जयंत निजला तरी देखील ती मात्र जागीच राहिली. एकटीच ! आंसवानी उशी भिजवीत !

पहाटे पहाटे तिचा डोळा लागला. परतु झोपेच्या आवरणात शिरतां शिरतादेखील तिच्या मनात येत होतं, ऑपरेशनची घटका अजून दूरच आहे ! ती एकदांची येऊन उलटून जात कां नाही ? ती गेली की मी सुटेन तरी ! " जयत जाणार ! जयत जाणार ! " हा ध्यास तिला आता अगदी असह्य झाला होता. " जयत गेला " अस केव्हां एकदां मनाशीं म्हणता येईल अस तिला झालं होतं ....

दुसऱ्या दिवशी जयंतला निरोप देऊन ती घरीं आली आणि माडीवर धांव घेऊन आपल्या खोलीत जाऊन अथरुणावर पडली तेव्हां तिला खरोखरच ज्याचं ऑपरेशन नुकतच पार पडलं आहे अशा माणसासारखं वाटू लागल, एका मोठ्या प्रसंगांतून निभावल्याप्रमाणे ! ओझं डोक्या-वेगळं केल्याप्रमाणें ! सदिग्धतेचा ताण सपल्याप्रमाणें ! हलक ! बर ! ....

भोवतालची माणसंदेखील आपल्याशीं वागत आहेत तीं एखाद्या दुखणेकऱ्याशी वागाव तशी असं पुष्पाला वाटू लागलं. जयंत जाण्यापूर्वी तिच्या दुःखाची कुणालाच कल्पना झाली नव्हती; पण तो गेल्यावर मात्र तिचं दुःख जणू काही सगळ्याच्या लक्षात आल होतं. जणु कांहीं तिचं एखाद ऑपरेशन नुकतच पार पडलं होत. जणु ती हॉस्पिटलमधल्या कॉटवर पडली होती. तिला सहानुभूतीची गरज होती. वेळ चांगला जावा म्हणून सगतीची गरज होती. तिच्याजवळ बसून लोकांनीं बोलायला हवं होतं. ज्यायोगें दूर गेलेल्या जयतची आठवण तिला येणार नाहीं अशा प्रकारें इतर गोष्टींत तिच मन गुतवायला हव होत. या साऱ्या गोष्टींचा डोक्यांत प्रकाश पडल्याप्रमाणे भोंवतालचीं माणसं वागूं लागलीं होतीं. या प्रकारांतल्या विनोदाचं तिला हसूहि आल असतं. परंतु ती तशा मनस्थितींत नव्हती....

पुष्पाच्या मनांत येत होतं, आपलं ऑपरेशन होऊन गेलं आहे, पण जखमेचे टाके अजून काढायचे आहेत. जयंत तिचा निरोप घेऊन गेला होता, परंतु त्यानं अजून इंडोनेशियाला प्रयाण केलं नव्हतं. त्याला पांच सहा दिवस दिल्लींत थांबावं लागणार होतं, आणि मग अखेर कूच करण्याचा हुकुम हातीं पडल्यावर तो विमानानं दिल्ली सोडणार होता. " निघण्याच्या दिवशी मी तार करीन. " असं त्यानं तिला सांगितलं होतं. इंडोनेशियांतलं राजधानीचं शहर जाकार्ता येथें तो जाणार होता. पुष्पा त्याला म्हणाली होती, " जाकार्ताला उतरलास की लगेच मला तार कर. " तें त्यानं कबूल केलं होतं. या दोन तारा त्याच्याकडून आल्या कीं तिच्या जखमेचे टाके निघाल्यासारखे होणार होते. त्या तारांची ती वाट पाहत होती. जयंत दिल्लीहून निघाला आणि जाकार्ताला पोंचला म्हणजे तिची आणि त्याची ताटातूट पुरती होणार होती. विरहाचं दुःख सुरू होणार होतं. पण संदिग्धतेचा ताण संपणार होता. आतां दीर्घकालपर्यंत जयंत भेटणार नाहीं, मला एकटीलाच इकडे राह्यलं पाहिजे असं ती स्वतःशीं म्हणणार होती. तोंपर्यंत तिचं विचित्र दुखणं संपणार नव्हतं. भोंवतालच्या लोकांना तिच्याविषयींच्या सहानुभूतीचा जो उमाळा आला होता तो चालू राहणार होता. जेव्हां यायला हवा होता तेव्हां तो आला नव्हता, आणि आतां जयंत गेल्यावर मात्र तो आला याची पुष्पाला मनांतल्या मनांत गंमत वाटली....

तिच्या एका समवयस्क मैत्रिणीनं तिला आग्रह केला, " एक दिवस माझ्या घरीं राह्यला चल. तेवढाच तुझा वेळ बरा जाईल. " पुष्पानं तिच्या आमंत्रणाचा स्वीकार केला. तिचे वडील तिच्या आईला म्हणाले, " नवा चित्रपट लागलेला आहे. सगळीच जणं जाऊं या. घरांत बसून पुष्पाला कंटाळवाणं होत असेल. " आणि त्यांनीं पुष्पाला विचारलं, " काय पुष्पा, यायचं काय ? " पुष्पानं जायचं कबूल केलं. तिच्या आतेभावानं दोन नव्या रेकॉर्डस् आणल्या, आणि त्या वाजवीत तो तिच्या खोलींत बसला. त्यानं खुलासा केला, " तुझा वेळ जात नसेल तेव्हां म्हटलं – " ....अशा प्रकारें तिचा एकटेपणा कमी व्हावा आणि तिचा वेळ जावा म्हणून साऱ्या माणसांनीं जणुं कांहीं संयुक्त आघाडीच उघडली होती.

....१६

....मनांतल्या मनांत पुष्पा जयंतच्या तारेची वाट पहात होती. पूर्वी चवदा तारीख केव्हां एकदां उलटून जाईल असं ज्याप्रमाणें तिला झालं होतं त्याप्रमाणें जयंतनं दिल्ली सोडल्याचं केव्हां एकदां कळेल असं तिला झालं होतं. ती एक एक दिवस मोजीत होती आणि तिचं सारं लक्ष तारेकडे लागलेलं होतं....

तार आली तेव्हां पुष्पा जिन्यालगतच्या सोप्यांतल्या खुर्चीवर एकटीच बसलेली होती. तारेच्या शिपायापासून तार हाती घेऊन सही करून कागद त्याच्याकडे देतां देतां ती मनाशीं म्हणाली, " जयंतचीच तार ! दिल्लीहून निघाला असेल!" तार फोडण्याच्या आधीच आंतला मजकूर तिला दिसला, " दिल्लीहून निघत आहे...."

परंतु पाकीट फोडून आंतल्या कागदाची घडी तिनं उलगडली आणि ती वाचूं लागली तेव्हां तिच्या भुवयांमधोमध आठी उभी राहिली. तिनं ज्या मजकुराची अपेक्षा केली होती त्याहून अगदीच निराळा मजकूर तारेंत होता !

> " कांही कारणानें आमचं जाणं पंधरा दिवसांनीं लांबलेलं आहे. तेवढ्या अवधीत ज्यांना घरीं जाऊन यायचं आहे त्यांना रजा मिळेल असं वरिष्ठ अधिकाऱ्यांनी सांगितलं आहे. म्हणून मी तिकडे येत आहे. पुन्हां दहा बारा दिवस मला राहतां येईल. या बातमीनं तुला आनंद होईल अशी माझी खात्री आहे.
>
> जयंत. "

तो मजकूर वाचून पुष्पाला आनंद झाला नाहीं !

जयंतचं जाणं लांबलं होतं. तिच्याकडे तो पुन्हा परत येत होता. दहा बारा दिवस राहणार होता ....

परंतु या गोष्टीचा पुष्पाला आनंद वाटत नव्हता !

उलट तिच्या मनांत येत होतं, एका विवक्षित दिवसाची वाट पहाणं पुन्हा माझ्या वाट्याला आलं !

जयंत येणार होता, दहा बारा दिवस राहणार होता, पण त्याचा काय उपयोग होता ? पुन्हां तो जाणारच होता ! त्याच्या जाण्याच्या दिवसाची तिला पूर्वीप्रमाणेंच पुन्हां वाट पहावी लागणार होती. पूर्वीप्रमाणेंच सारीं

माणसं जयंत आला, जयंत आला, म्हणून नाचणार होतीं. तिची मनोव्यथा कुणीच लक्षांत घेणार नव्हतं! जयंतसुद्धां! जयंतजवळ देखील तिला ती उघड करतां येणार नव्हती! तिची तिलाच ती सोसावी लागणार होती. जुलायची चौदा तारीख जशी एकदां येऊन गेली तशी आतां ही नवी तारीख येणार होती! बारा दिवस उरले, दहा दिवस उरले, आठ, सात असे दिवस मोजीत बसणं तिला भाग पडणार होतं.... तिला वाटलं होतं ऑपरेशनमधून सुटलों आपण. परंतु नाहीं! पुन्हां एकदां ऑपरेशनचा प्रसंग तिच्यावर आतां येणार होता !....

तिचा आतेभाऊ आला व तिच्या हातांतला कागद पाहून त्यानं विचारलं " कुणाची ग तार? जयंतची का? "

तारेचा कागद तिनें पुढें केला नाहीं.

त्यानं तो तिच्या हातून घेतला, वाचला, आणि तो उद्‌गारला, "ओ हो! मोठीच आनंदाची बातमी आहे कीं! सांगितलीस का आईला? "

पुष्पा म्हणाली, " जा, तूंच सांग. "

तिच्या विचित्र थंडपणाकडे त्यानं लक्ष दिलं नाहीं. " मामी! मामी!" असं ओरडत तो आंत धांवला.

तारेचं रिकामं पाकिट हातांत घेऊन पुष्पा जागच्या जागींच उभी राहिली!

# १० . . . जिथें जावंसं वाटतं

नित्यक्रमाप्रमाणें अनंतराव सकाळच्या छोटचा हजेरीचा समाचार घेतांघेतां वृत्तपत्रांतल्या ठळक बातम्यांवरून नजर फिरवीत होते. इस्टेट-ड्यूटी-बिलाच्या वाचनाच्या वेळेस संसदेत झडलेल्या प्रश्नोत्तरांच्या फैरी, पार्डीचा सत्याग्रह, सुरतेच्या पोलिसानीं हातभट्टीवर घातलेला छापा, कश्मीरचा नवा मुख्य प्रधान बक्षी गुलाम याची व पत्रकारांची मुलाखत, मुसादिकवरील खटल्याची तयारी, आल्प्स पर्वतानजीक झालेला विमानाचा अपघात – अशा किती तरी लहान मोठ्या घटना देशांत व परदेशांत घडल्या होत्या. त्यांचा आणि अनंतरावाच्या जीवनाचा अर्थाअर्थी कांही संबंध नव्हता. परंतु त्यामुळेंच की काय कोण जाणे, त्या वाचण्यांत त्यांना गोडी वाटत होती. बातम्यांवरून फिरणारी त्यांची नजर एका मथळ्यावर स्थिर झाली :

**' चंद्रगिरीच्या पहाडांत अपघात '**

त्या मथळ्याखालचा मजकूर सावकाश वाचण्याऐवजीं त्यांतल्या मुख्य शब्दावरून अनंतरावांनीं डोळे फिरविले :

" घाटांतून .... वेगानं .... पंजाबची राणी....गाडीचा निळा निळा धूर आकाशांत....इतक्यांत अपघात....राणी थांबली....आडरानांत ....हिरवीपिवळीं शेतं आणि कुरणं....हातांत विळे घेतलेल्या वन्य सुंदरीचं हास्य .... "

अनंतरावांनीं तोंड वळवून न्याहारीचा घांस घेतला, चहाचा घोट घेतला, आणि मग त्या कॉलमांतलं अपघाताचं वर्णन सावकाश वाचलं. चंद्रगिरीच्या उंच घाटातून वेगानं जाणारी ' पंजाबची राणी ' एकाएकीं नादुरुस्त होऊन उभी कशी राहिली, आगगाडींतल्या उतारूंची एकच गडबड कशी उडाली, कुणी खिडक्यांतून डोकावले, कुणी उतरून धांवले, हिरव्यापिवळ्या शेतांतल्या

आणि कुरणातल्या वन्य सुंदरी कापणी करतां करतां कशा थबकल्या आणि हसत पाहू लागल्या, इत्यादि गोष्टीचं आकर्षक वर्णन, अपघाताच्या वेळेस 'पंजाबच्या राणीं'तून प्रवास करणाऱ्या एका उतारूनंच लिहिलं होतं.

तें वाचल्यावर अनंतराव वर्तमानपत्र दूर ठेवणार होते. पण तितक्यांत त्यांच्या लक्षांत आलं की तें वर्णन आणखी पुढच्या परिच्छेदांत चालू आहे. त्या परिच्छेदाला छोटासा मथळा दिला होता : '**एक छोटंसं रहस्य**' आणि त्या मथळ्याखाली पुढील मजकूर होता :

"या अपघाताच्या वेळच्या एका छोटया रहस्याचा उलगडा कधी कुणाला करतां येईल असं वाटत नाही. पंजाबची राणी नादुरुस्त होऊन थाबली आणि अडकून पडली तेव्हां तिच्या ऐषारामी डब्यांतले स्त्रीपुरुष खोळंबा झाला म्हणून चरफडले. परंतु राणीतला एक उतारू मात्र चिडला नाही, रागावला नाही. गाडी उभी राहिल्यावर त्यानं आपलं सामान आवरलं व गाडीखालीं उतरून, किंचित्‌ही न रेंगाळतां, शेतं ओलांडून पलीकडच्या दाट झाडीत तो दिसेनासा झाला !

जणू आपघात होऊन गाडी थांबली तें त्याच्या पथ्यावरच पडलं होतं ! जणु ज्या ठिकाणीं तो निघाला होता तें ठिकाण त्या जागेपासून नजीकच होतं ! जणू त्याला या ठिकाणी जातां यावं म्हणूनच गाडी तिथें थांबली होती.

हा प्रवासी कोण ? अशा आडरानांत उतरून तो गेला कशाला ? त्याला कुठें जायचं होतं ?.... या छोटयाशा रहस्याचा उलगडा कधीं होणार नाहीं !"

वर्तमानपत्रांतला तो मजकूर वाचून अनंतराव विचारांत गुंग झाले. हें वर्णन करणाऱ्याशीं वाद उकरून काढायसाठीं त्यांनीं विचारलं, "प्रवासी रागावेल कशासाठी ? रेंगाळेल कशासाठीं ? तो उतरला आणि चालता झाला यांत आश्चर्य काय ? रहस्य कुठें आहे ? मोठंहि रहस्य नाही, छोटंहि रहस्य नाहीं ...."

विचार करतां करतां अनंतराव स्वतःशींच परंतु कुणाशीं तरी वाद घालण्याच्या आवेशानं म्हणाले : "या रेल्वे-गाडया फार चमत्कारिक. त्यांचा जुलुमाचा कायदा असा की, ज्याला प्रवास करायचा आहे त्यानं

कुठलं तरी तिकीट काढलं पाहिजे. मीं जर म्हटलं कीं मला अमुक एका गांवाला जायचं नाहीं. जातां जातां जें रम्य ठिकाण मला दिसेल तिथें मी उतरणार आहे, तर रेल्वेचे लोक मला कांहीं प्रवास करूं द्यायचे नाहींत. जिथें जायचं त्या गांवाचं नांव सांगा, असं रेल्वेचं म्हणणं. गजांच्या अरुंद खिडकीमागें बसलेल्या तिकीट देणाऱ्याला आधीं जेव्हां स्टेशनाचं नांव सांगाव तेव्हां तो तिकीट देतो. या जुलुमामुळें आपण मुबई, नाशिक, नागपूर अस कोणतं तरी एक नांव सांगतों, खिडकींतून पैसे ढकलतों, तेव्हां कुठें तो तिकीट देतो. आपण प्रवासाला निघतो. गाडीत बसून आपण खिडकींतून पाहू लागलों की अशीं अनेक रमणीय स्थळं दृष्टीस पडतात कीं तिथें उतरण्याची आपल्या मनाची खरी धांव असते. शेतांचा आणि मळ्यांचा हिरवागार विस्तार, रानांतून वहात जाणाऱ्या नदीच्या कांठावरची झाडीतली एकाताची जागा, झाडाझुडुपांच्या सांवलीत वसलेलं एखादं छोटंसं पाच पंचवीस झोपड्यांचं खेडं दृष्टीस पडलं की आपलं आंतलं मन म्हणतं, 'अरे पृथ्वीवरचा स्वर्ग इथें आहे, आणि तू कुठें वेड्यासारखा निघालास नागपूरला किंवा बनारसला ?' रमणीय सौंदर्यानं नटलेले असे कित्येक स्वर्ग प्रवासाला निघालेल्या माणसाच्या नजरेसमोर सरकत असतात, मागें पडत असतात. आपल्या मनाची खरी इच्छा तिथें उतरण्याची असते, पण आपण उतरत नाहीं. कारण या स्वर्गतुल्य स्थानांना नांवगांव नसतं, स्टेशन नसतं....हा अनुभव कुणाला नाहीं ? सांगा. आगगाडीच्या खिडकींतून बाहेर पहातांना खऱ्या रसिक माणसाच्या अंतःकरणांत वारंवार येणारा विचार असा असतो की, त्या तिथे आंब्याच्या गर्द राईंत मोटेच्या चाकाचा कुंईकुंई असा आवाज होतो आहे, तिथें जावं; त्या तिथें जांभळ्या पिवळ्या रानफुलांचा सडा पडलेला दिसतो आहे, तिथें जाऊन कुरणावर खुशाल उताणं निजावं; त्या तिथें रानांतल्या हिरवळीच्या उतरणीवर गुरं चरताहेत त्या जागीं झाडाखालच्या दगडावर बसावं, गुरांच्या गळ्यांतल्या घंटांचा आवाज ऐकावा, आणि तरण्याताठ्या शेतकरी पोरींचीं उन्हांत चमकणारीं काळींसांवळी पुष्ट अगं पहावी....गाडी याच ठिकाणीं थांबेल तर काय बहार होईल....

– गाडी अशी कधी थांबत नाहीं एवढंच !"

आपल्याच विचारांत गर्क झालेले अनंतराव स्वतःशी म्हणाले, "चंद्रगिरीच्या घाटांतून जातांना पंजाबची राणी मात्र एकदां थांबली ! आणि अर्थातच ती थांबल्याबरोबर ज्या एका माणसाला आपल्या अंतःकरणाची खरी ओढ आवरून धरवेना तो उठला, गाडीखाली उतरला, हिरवी पिवळीं शेतं ओलांडून झाडीत नाहीसा झाला....आणि वृत्तपत्रांत गाडीच्या अपघाताचं वर्णन करणारा हा वेडा लेखक खुळ्यासारखं काय लिहितो या छोट्या रहस्याचा उलगडा कधी होणार नाही म्हणून ?– यात रहस्य आहे कुठें? ....जे घडलं ते बरोबरच होतं. प्रवास करणाऱ्या एका माणसाचं भाग्य उघडलं होतं ".... अनंतरावांच्या मनात आलं, त्यानं जें केलं तेंच मी देखील केलं असतं – मी त्याच्या जागी असतों तर !

.... गरम हवेनं कोंदटलेल्या गाडीच्या डब्यांत अनंतरावांच्या समोर बसलेली बाई हातवारे करून ज्याला त्याला विचारूं लागली, "गाडी अशी एकाएकी कां हो थांबली !"

तिच्या प्रश्नाकडे कुणी लक्ष देईना. खिडकीबाहेरून एका तरुण माणसाच्या हंसण्याचा "हा ऽ हा ऽ हा ऽ" असा आवाज ऐकू आला.

एक ढेरपोटे लक्षाधीश शेटजी जवळच्या माणसाला म्हणाले, "झाला का ब्रह्मघोटाळा ! आता मी कांही वेळेवर पोचत नाही."

त्यांची गरगरीत वाटोळी शेटाणी म्हणाली, "फार भूक लागली आहे! जेवण कधी मिळायचं मला ?"

अनंतरावांनीं डब्याच्या खिडकींतून बाहेर पाहिलं. रानझुडुपांच्या उंच कुंपणावर फुलांचे घोसच्या घोस तरारले होते. पलीकडे उंच उंच हिरवं गार गवत वाऱ्यावर सारखं हेलावत होतं. त्यातल्या पाढऱ्या, तांबड्या, जांभळ्या फुलांचे लहानमोठे ठिपके हिरव्या लाटांवर हालणाऱ्या चांदण्यांच्या प्रतिबिंबासारखे भासत होते. कुरणाच्या एका कोपऱ्यांत कापलेल्या गवताचा मोठा ढीग रचलेला होता. त्या गवतपात्यांच्या शेंड्यांचे रंगीत तुरे अजूनहि फिके पडले नव्हते. एका झाडाखालीं पांच दहा शेतकरी चटणीभाकर खात होते. एक उंच तरुण शेतकरी एक हात कमरेवर देऊन आणि दुसऱ्या हातांत कोयता धरून कुणाला तरी उंच आवाजांत साद देत होता. जरा अंतरावर दोन गाड्या सोडलेल्या होत्या. त्यांभोंवती फेर धरल्याप्रमाणें

शतकरणींचा घोळका दिसत होता. त्यांच्या तोंडचं गाणं हवेंत तरंगत होतं. आणि त्यांचं दिलखुलास गोड हंसणंहि ....

" गाडी कां हो थांबली ? – काय झालं तरी काय ? " अनंतरावांच्या समोर बसलेल्या बाईनं पुन्हा हातवारे करून सबंद डब्याला विचारलं.

" गाडी बद पडली ! " – " एंजिन मोडलं वाटतं ? " " ड्रायव्हरनं काय दारू झोकली काय ? " – " आतां किती घंटे या आडरानांत काढावे लागणार ? " – " गुंडांनीं हल्ला केला नाहीं म्हणजे मिळविली ! " .... अशा शेकडों उद्‌गाराचा घोषच सबंद गाडीभर झाला.

अनंतरावाच्या समोरची बाई विव्हळली , " बाई – बाई – बाई ! "

ढेरपोटे लक्षाधीश शेटजी पुन्हा चिरचिरले, " झाला का ब्रह्मघोटाळा ! आता मला उशीर होतो खचित ! "

गरगरीत शेटाणी फुसफुसली, " आता कसलं वेळेवर जेवण मिळतंय ?"

अनंतरावांनीं खिडकीवाटे पाहिलं तों दूर अंतरावर निळ्या काळ्या तांबड्या रगानीं माखलेले डोंगर उभे होते. जणु एखाद्या रंगीत स्वप्न-सृष्टींतल्या स्वर्गातले डोगर होते ते. डोंगरांच्या पायथ्यापासून तों अलीकडच्या कुरणापर्यंत झाडी होती. तिचा रंग दाट पण नाजुक भासत होता. कुरणाच्या पलीकडे आणि झाडीच्या रेषेलगत एक छोटस घर होतं. जणुं कुणा जादुगारानं तें छोटंसं घर झाडीच्या आवरणांतून बाहेर काढून कुरणाच्या गवतावर नुकतंच टेकल होतं. त्या घराच्या एका अंगाला पायवाटांच्या आडव्या उभ्या रेषांच्या वाकड्यातिकड्या चौकटी झाल्या होत्या. पलीकडे एक ओढा वहात होता. दोन शेळ्या अंगाला अंग भिडवून झाडाखालीं बसल्या होत्या.

गाडी बद पडली म्हणून खालीं उरतलेला पठाण खुशाल रुळालगतच्या खडीवर बसला आणि बासरी वाजवूं लागला.

दुसऱ्या एका पठाणानं खजिरी काढली आणि तिच्यावर थाप दिली.

तें ऐकताच कुरणांतल्या शेतकऱ्याच्या पोरी नाचूं लागल्या.

" काय झाल हो ? गाडी कां थांबलो ? " अनंतरावाच्या समोरची ती बाई पुन्हा विव्हळली.

" झाला का ब्रह्मघोटाळा ! "

" आतां जेवण कुठलं मिळतंय मला ! "

डब्यांतली एक बाई घाबरून ओरडली, " त्या शेतकरणी बाया डब्यांत घुसतील बरं का ! दारं लावून घ्या ! "

नाचतां नाचतां शेतकऱ्यांच्या त्या पोरी हंसल्या, ' हा ऽ हा ऽ हा ऽ ! .... '

कमरेवर हात देऊन उभ्या राहिलेल्या त्या तरुण शेतकऱ्यानं हातांतला विळा हवेंत फिरविला. एखाद्या सापाचा फुस्फुस् फुत्कार व्हावा तसा आवाज झाला.

अनंतराव जागेवरून उठले. वरच्या रॅकमधून त्यांनीं आपली पिशवी काढली, आणि डब्याच्या दाराकडे जाऊन तें त्यांनीं उघडलं.

" अहो, दार उघडूं नका ! त्या बाया आंत येतील ! "

" गाडी कां हो थांबली ? "

" झाला ब्रह्मघोटाळा ! "

" माझं जेवण ! माझं जेवण ! "

अनंतराव उतरले आणि सरळ कुरणांत शिरले. त्यांनीं पंजाबची राणी मागे टाकली. गाडी कां थांबली म्हणून विव्हळणारी, गांवीं पोंचायला उशीर होणार म्हणून चिरचिरणारी, वेळेवर जेवायला मिळणार नाहीं म्हणून चिंता करणारी दुनिया त्यांनीं मागें टाकली. ते झपाझप पावलं टाकीत निघाले. शेतकरी पुरुषांच्या व स्त्रियांच्या अंगावरून ते पुढें गेले. झाडीत शिरले.

त्या छोट्या घराच्या मागच्या बाजूस ओढा वाहत आला होता. ओढ्याच्या कांठालगत एक सतरा वर्षांची किशोरी उभी होती. तिचं वस्त्र घोळदार नव्हतं तिच्या उघड्या गोऱ्या बांधेसूद पोटऱ्या आणि नाजुक लालसर पावलं दिसत होतीं. आपल्या वस्त्राच्या पदरांत तिनं कोंवळ्या कोंवळ्या पानांच्या फांद्या जमविल्या होत्या, आणि त्यांचीं पानं ती दोन कोकरांना भरवीत होती. पाल्याचा घांस घेतां घेतां कोकरं तिचीं बोटं तोंडांत घेऊं लागलीं कीं ती त्यांना दूर ढकलीत होती, आणि हंसत होती. ती हंसली कीं एखाद्या गोड गाण्याची लकेर हवेंत तरंगल्यासारखं वाटत होतं. झोपडीच्या भिंतीलगत एक घडवंची होती. त्या घडवंचीवर दुधाची कासंडी होती, आणि एक मोठं पितळेचं भांडं होतं.

अनंतरावांना पाहिल्याबरोबर ती पोर क्षणमात्र चकित होऊन उभी

....१७

राहिली. मग तिनं पदरांतलीं सारीं कोवळी पानं खाली पडूं दिलीं, तीं कोकरं अधाशीपणानं खाऊं लागलीं. ती हळूच घडवंचीकडे गेली. तिनं भांडं दुधानं भरलं आणि पुढें केलं.

अनंतरावांनी तें तिच्या हातून घेतलं.

ती अगदीं हलक्या आवाजांत म्हणाली, "इथेच रहा !"

पंजाबची राणी किती घटकांनतर निघून गेली कुणास ठाऊक ? परंतु ती गेली तेव्हां तिच्यांतील एक प्रवासी कमी झाला होता....

अनतराव आपल्या विचारातून जागे झाले. त्यांनी चहाच्या कपांत चमचा ढवळला, आणि कप तोंडाला लावला. मग त्यांनी वर्तमानपत्र पुन्हा उचललं. एका कॉलमांत जाड टाइपांतला मथळा दिसला : **अन्नमंत्र्याच्या भेटीस शेतकऱ्यांचा मोर्चा !** '

त्यांनीं वर्तमानपत्र फेकून दिलं.

# ११ . . ‘ तुमचा आमचा रामराम ’

कुठें बसण्यासारखी जागा दिसते काय म्हणून तिनं आजूबाजूस पाहिलं. वास्तविक तिला ठाऊक होतं, कीं थिएटराच्या त्या पोर्चसारख्या जागेंत बसण्याजोगी जागा नव्हती. आंत एअर-कंडिशन्ड हॉल होता, तिथें प्रेक्षकांना बसावयासाठी जागा होत्या. परंतु ताटकळत उभं राहून तिचे पाय कंटाळले होते. जरा बसावं तरी, असा विचार तिच्या मनांत आला होता व त्यामुळें तिनं इकडेतिकडे नजर टाकली. बसण्याजोगी जागा तिला दिसली नाहीं याचं तिला आश्चर्य वाटलं नाहीं. सिनेमाच्या ‘ शो ’साठीं खूपच गर्दी उडालेली होती. तिकिटांची खिडकी केव्हांच बंद झाली होती. पुष्कळसे लोक पोर्चमधें येऊन सरळ आंतल्या हॉलमधें जात होते. तरीदेखील पोर्चमधें इतके लोक होते, कीं कुणाचा धक्का लागूं न देतां उभं राहणं कठीण होतं. तरी ती गेला तब्बल अर्धा तास उभी राहिली होती. म्हणजे तिला उभं राहावं लागलं होतं. माधवची वाट बघत ! . . . .

तिच्या दुखूं लागलेल्या पायांपेक्षां मनांतल्या निराशेचा आणि रागाचा तिला ज्यास्त ज्यास्त त्रास होऊं लागला होता. ती वरचेवर मनगटावरच्या घड्याळाकडे पाहात होती. पोर्चमधल्या मोठ्या घड्याळांत तितकेच वाजले असणार हें माहीत असून त्याकडेही ती पाहात होती. सहाला दहा मिनिटं, बरोबर सहा, सहा वाजून दहा मिनिटं – अशा घड्याळांतल्या काट्यांच्या उड्या पाहतां पाहतां ती थकून त्रासून गेली होती. मनगट खालीं करतांना प्रत्येक वेळेस ती चिडून स्वगत म्हणत होती, ‘ किती वाट पाहायची मीं ? याचं नेहमींचं अस्सं आहे ! ’

‘ मी याच्यावर प्रेम कां करतें कुणास ठाऊक ? ’ ती स्वतःशीं वारंवार म्हणत होती, ‘ मी याला एकदां सांगून कां टाकीत नाहीं, कीं वेळेवर

भेटायची शिस्त तुझ्या अगीं येणार नसेल तर तुमचा आमचा रामराम !' त्यान तिला किती प्रसंगी किती उशीर करून किती वाट पाहायला लावली होती त्याच्या आठवणी तिला झाल्या. प्रत्येक वेळेस ती रडकुंडीस आली होती तेंहि तिला आठवल. पण दर वेळेस अखेर भेट झाल्यावर त्यानं उशिराचं कारण सांगावं, त्याची सबब तिला खोटी म्हणतां येऊं नये, त्याच्यावरच्या प्रेमामुळं विरघळून जावं, एका अक्षरानं देखील राग दाखवूं नये, असं झालं होतं–तेंहि तिला आठवलं. 'पहिल्याच वेळेस मी रागाचं आकांडतांडव करायला हवं होतं,' ती आज स्वतःला शिकवीत होती, 'म्हणजे त्याची खोड गेली असती. माणूस एकदां प्रथम घसरलं कीं कायमचं घसरतं हेंच खरं. आज मात्र मी त्याला क्षमा करणार नाहीं. अगदीं कळस झाला ....'

एका प्रसिद्ध कंपनीच्या नव्या चित्रपटाचे पहिले 'शो' आज एकदम पांच थिएटरात सुरू झाले होते. साडेसहाचा 'शो' दोघांनीं मिळून पाहण्याचं माधवनं ठरवलं होतं. तिकिटंदेखील काढून आणलीं होतीं. तिनं आपल्या घरून यावं आणि थिएटरच्या पोर्चमधेंच एकमेकांला भेटावं असा बेत ठरला होता. सिनेमा संपल्यावर तीं दोघं एका चांगल्या हॉटेलांत एकत्र जेवणार होतीं.... 'ट्रिनिटी' थिएटरवर ती पावणेसहा वाजतांच येऊन दाखल झाली होती, ताटकळत गर्दीत उभी राहिली होती. आणि माधवरावांचा मात्र अजून पत्ता नव्हता ! ती अगदीं भयंकर संतापून गेली. आज मात्र स्वारीला सांगायच, तुमचा आमचा रामराम–असं ती ठरवूं लागली....

तितक्यांत तिच्या मनांत आलं, याला अपघात तर नाहीं झाला कुठें ? .... ती कल्पना मनांत येताच तिचा रागबीग सगळा पार नाहींसा झाला. परोपरीच्या शंका तिला येऊं लागल्या. ती अस्वस्थ झाली.... पण कांहीं वेळानं त्या शंका तिच्या मनांतून गेल्या. 'अपघात कसला होतो आहे ? त्याची जन्माची खोडच आहे हा वेळेवर आला असं कधीं झालं आहे ? तें काहीं नाहीं. त्याला चांगली अद्दलच घडवायला हवी. आतां आला कीं नेहमीप्रमाणें कांहीं तरी सबब सांगेल. माझ्या दंडाला धरून मला आंत नेईल. पण आज लेचेपेचेपणा करायचा नाहीं.' ती स्वतःला बजावूं लागली, 'सरळ त्याला सांगायचं, तुमचा आमचा रामराम ! तूं एकटाच बघ

चित्रपट. मी चाललें घरीं. आणि संतापानं निघून जायचं ....'

तितक्यांत 'शो' सुरू होण्याची पहिली घंटा झाली. पोर्चमधले लोक आंत गेले. ज्यांच्याजवळ तिकिटं नव्हती ते रस्त्याकडे जाऊं लागले. पोर्चमधली दाटी झराझर कमी झाली....तिच्या मनांत आलं, आतां काय करायचं ? ती आणखी दोन तीन मिनिटं उभी राहिली.... मग तिनं ठरविलं, सरळ बस गाठावी आणि घरचा रस्ता सुधारावा.... तोंडाला पॉवडर लावून ओठ पुन्हा नीट करण्यासाठी तिनं आपलीं पर्स उघडली. माधवनं तिच्याजवळ देऊन ठेवलेली तिकिटं पर्समधें होतीं ती तिला दिसलीं. तिनं तीं सहज काढून पाहिलीं. त्याकडे पाहतांच तिनं कपाळावर हात मारून घेतला !

'ट्रिनिटी' नव्हे, दोन रस्ते टाकून पलिकडे असलेल्या 'लिबर्टी' थिएटरांतल्या 'शो'चीं ती तिकिटं होतीं. माधवनं तिला लिबर्टींत यायला सांगितलं असलं पाहिजे ! आणि ती आली होती ट्रिनीटीत !

तिन ती तिकिटं पर्समधें परत घातली. पॉवडर लावली नाहीं. ओठ रंगवले नाहीत. पर्सचा चाप बंद केला. आणि मोटारीची अगर घोडागाड्यांची पर्वा न करतां तिनं रस्त्यांतून धूम ठोकली....

लिबर्टीच्या पोर्चमधे माधवरावांची स्वारी हातांतलं सिगरेटचं पाकीट कुरतडीत होती ! त्याची चर्या रडकुंडीस आली होती. ती त्याच्याजवळ गेली ती धापा टाकीतच. तिला वाटलं, आतां आपली खरडपट्टी निघणार. पण तिचे हात हातांत धरून तो म्हणाला, " माले, तुझं अभिनंदन करतों – मनापासून. तूं इतकी चतुर असशील अशी कल्पना नव्हती." त्याच्या त्या बोलण्यानं ती भांबावून गेली. भयंकर दमल्यामुळें तिच्या डोळ्यांत पाणी आलं. तें पाहून माधव म्हणाला, " अग, तूं वाईट वाटून घेऊं नकोस. ही शिक्षा तूं मला केलीस हेंच बरोबर केलंस. वाट पाहण्यांत किती यातना असतात तें चांगलं शिकवलंस मला आज ! फार युक्तिबाज आहेस तूं हं. छान ! असं कांही हळू हातानं डोळ्यांत अंजन घातलंस माझ्या, कीं ज्याचं नांव तें ! आपण भयंकर खूष आहोंत बुवा तुझ्यावर ! पण माले, तूं रडतेस काय ? आं ?"

मालतीनं डोळे कसेबसे पुसले आणि गळ्यांत दाटलेला हुंदका आवरीत विचारलं, " तुझं माझ्यावर प्रेम आहे ? "

माधव म्हणाला, " फार ! "

ती एकदम मोठ्यांदा हसली. आतां तो भेटला कीं 'तुमचा आमचा रामराम' असं सांगायचं तिनं मनाशीं ठरवलं होतं, त्याची तिला आठवण झाली होती.

त्यानं विचारलं, " कां हसलीस ? "

तिला आणखीच खुदकन् हसू आलं. ती म्हणाली, " तुझं फार प्रेम आहे ना माझ्यावर ? मग झालं तर ! "

तितक्यांत शो सुरू होण्याची अखेरची घंटा झाली. माधवनं तिचा हात धरला अन् म्हटलं, " चल." ती दोघं झपाझप पावलं टाकीत हंसत आंत शिरलीं !

# १२ . . . . गुलामाचं राज्य

" साहेबांनीं तुम्हाला बोलावलं आहे. " हे शब्द गोपूकाकांना ऐकू आले, पण त्यांकडे त्यांनीं लक्ष दिलं नाही. कारण रेल्वे-स्टेशनवरच्या वेटिंग रूमपेक्षांहि अधिक अव्यवस्थित दिसणाऱ्या त्या अंधाऱ्या ऑफिसांतं त्या शब्दांचा उच्चार इतके वेळां होत असे, कीं कानांवर आदळून लक्ष वेधून घेण्याची त्यांच्यांतली शक्तीच नाहीशी झाली होती ! दूर अंतरावर सतत चाललेला लोकल गाड्यांचा घरघराट, उत्तरेकडच्या मोठ्या रस्त्यावर अव्याहत सुरू असणारे वाहनांच्या रहदारीचे हरतऱ्हेचे आवाज, ऑफिसला लागूनच असणाऱ्या कोपऱ्यांतल्या अंधाऱ्या जिन्यांतली अखंड वर्दळ आणि माणसाची कुजबुज -- ह्या गोष्टी ज्याप्रमाणें त्या ऑफिसांत काम करणाऱ्या लोकांच्या कानांवर सतत येऊन येऊन झिजून गेल्या होत्या व अखेर कुणाच्या लक्षांतच येईनाशा झाल्या होत्या, त्याप्रमाणेंच " साहेब तुम्हाला बोलावताहेत " या शब्दांचीहि स्थिति झाली होती. त्या कचेरींत यांचा उच्चार इतके वेळां होत होता, कीं कडीपाटाच्या सांदीफटींत अव्याहत चाललेली पारव्यांच्या पंखांची फडफड आणि चिमण्यांची चिवचिव याप्रमाणेंच त्या शब्दांकडेहि कुणी लक्ष देत नव्हतं. गोपूकाकांनीं ते शब्द ऐकले, पण त्यांकडे लक्ष दिलं नाहीं.

पण मग " ऐकलंत का ? साहेब तुम्हांला बोलावताहेत. " असे शब्द पट्टेवाल्यानं जवळजवळ त्यांच्या कानांत मोठ्यांदा उच्चारले तेव्हां गोपूकाकांनीं वर मान करून त्याच्याकडे पाहिलं आणि विचारलं, " मला? "

" हां, तुम्हांला ! लवकर बोलावलंय् " असं म्हणून पट्टेवाला धावला. कारण साहेबांच्या खोलीतली घंटा ठण्ठण् अशी जोरानं बडविली गेली होती.

टाईपरायटरवरच्या कागदाकडे गोपूकाकांनी नजर टाकली.

" आमच्या अशीलाच्या मालकीच्या इमारतीचा ताबा. . . ." हें वाक्य पुरं करण्याऐवजी गोपूकाकांनी डाव्या हाताशी टेबलावर पसरलेले कागद जुळवून त्यावर दडपण ठेवलं, आणि उजव्या हाताशी पडलेल्या तीन फायली उचलून काखोटीस मारून, ते लगबगीन पावल टाकीत साहेबांच्या खोलीकडे गेले.

खोलीत चिरूटाचा दरवळ पसरला होता. साहेबानीं टेबलावरच्या कागदात डोक खुपसलेलं होत. दोन तीन मिनिट होऊन गेली तरी साहेबांची मान वर होईना, तेव्हा गोपूकाकानं खाकरल्यासारखं केलं साहेबानी वर पाहिलं, चिरूट उचलला आणि तो बोडल्यासारखा तोंडात धरून बोबडचा शब्दांत पण घुश्शाच्या आविर्भावान ते गुरगुरले, " मिस्टर, पर्वते, ती नाथीबाई जव्हेरीची कैफियत टाईप करून झाली कीं नाही ? '

एखाद्या मोगल बादशहापुढे उभ्या करण्यात आलेल्या अपराध्याचा अभिनय करून गोपूकाका म्हणाले, " तीच टाईप करतों आहे. "

" करतो आहे ! तुम्हाला केव्हाहि काहीं विचारलं की तुम्ही तें करीत असतां. तयार आहे अस उत्तर तुमच्याकडून कधी मिळेल तर शपथ ! तुमच्या आपसातल्या चकाट्या अन् रेसकार्डाची चर्चा कधीं थांबेल तर ना ! फर्मचं काम बसलं कोकलत तरी तुमच्या बापाचं काय जातंय् ? "

गोपूकाका शाळेत असताना एका मुलान भांडताभांडतां बाप काढला म्हणून त्यांनी खाड्दिशीं त्याच्या मुस्कुटांत लगावली होती. पण आतां साहेबानी त्यांचा बाप काढला तरी त्याच रक्त मुळींसुद्धां उसळलं नाही. त्यांच्याच काय, फर्ममधल्या इतर साऱ्या कारकुनाच्याहि बापाचा उद्धार साहेब दिवसांतून दहा वेळा करीत होते, पण कुणालाहि त्याचा राग येत नव्हता. आपण नोकरीचे गुलाम आहोत ही गोष्ट सर्वजण जाणून होते. अपशब्द ऐकल्यावर राग येऊ देणं ही एक प्रकारची चैन आहे आणि असली चैन आपल्याला परवडणार नाही हें तत्त्व त्या कचेरींतल्या साऱ्या गोपूकाकानी मनावर पक्कं ठसवून ठेवलेल होतं !

गोपूकाका फक्त एवढंच म्हणाले, " फर्मच्या कामाकडे मी कधी दुर्लक्ष करीत नाहीं."

सहेबाना त्यांचं हे उत्तर आवडलं नाहीं. "पर्वते, तुम्हांला अलीकडे उलट बोलायची सवय लागते आहे." ते म्हणाले. "फर्मच्या कामाकडे तुमचं लक्ष आहे हें कुणाला खरं वाटेल? ही नाथीबाईची कैफियत आज तयार व्हायला हवी होती."

गोपूकाका हळूच पुटपुटले, "मग आज होईल की तयार. अजून ऑफिस बद व्हायला दोन तास अवकाश आहे –"

"हे तुम्ही कुणाला सांगतां, पर्वते? मला काय नाथीबाईच्या एकाच केसचे कागद पाह्यचे आहेत? अन् तुमच्याप्रमाणेंच मीं सहा वाजेपर्यंत इथं राहावं म्हणतां? मला एका मीटिंगला जायच आहे. साडेचार वाजतां तुम्ही नाथीबाईची कैफियत टाईप करून माझ्या हातांत देणार कीं नाही बोला."

"देईन की. साडेचार वाजायला अजून पाऊण तास अवकाश आहे."

साहेब अधिकच खवळले आणि म्हणाले, "वेळेचा हिशेब तुम्ही कुणाला सांगतां आहांत, पर्वते?"

"नाही साहेब....मी सहज – मी कांही वाईट हेतूनं बोललों नाहीं."

"समजलं. हेतु कांहीहि असेल, अस बोलत जाऊं नका. जा, चालते व्हा आणि गप्पा छाटू नका, काम करा! उभे काय राहिलात माझ्याकडे बघत? जा म्हटल ना?" अस म्हणत साहेबांनी टेबलावरची घंटा बडविली. पट्टेवाला आंत आला त्याला ते म्हणाले, "मिस् शिरगावकरांना बोलाव. आणि चहा घेऊन ये."

वास्तविक गोपूकाकांच तें काम नव्हतं, पण ते मिस् शिरगांवकरच्या टेबलाजवळ गेले आणि तिला हलकेच म्हणाले, "काम कसलं करतां हो! चहाची वेळ झाली, साहेबांना एकट्यांना कसा जाईल चहा?" त्या मुलीनं त्यांच्याकडे डोळे वटारून रागान पाहिलं. ती चिडली हें पाहून गोपूकाकांना बरं वाटलं. ते मनाशीं म्हणत होते, "पूर्वी या साहेबलोकांना पुरुष सेक्रेटरी चालत होते; पण आतां पोरीवाचून पान हालत नाहीं!" त्या फर्ममधल्या साऱ्याच कारकुनांचा मिस् शिरगांवकर या मुलीवर डोळा आणि राग होता; आणि साहेबांच्या तिच्यावरील मर्जीचा उल्लेख करून तिची टिंगल करण्याची एकही संधि ते वाया जाऊं देत नसत. मिस् शिरगांवकरची कुचेष्टा

गोपूकाकांनी आजपर्यंत कधी केली नव्हती. परंतु साहेबानी त्यांचा बाप काढला होता, त्याचा सूड घेण्याची इच्छा त्यांना पुरी करून घ्यायची होती. मिस् शिरगांवकरन डोळे वटारून त्याच्याकडे नजर टाकली तेव्हां ते मनापासून हसले आणि आपल्या टेबलाजवळ गेले. टाईपरायटरमधल्या कागदावरील ‘आमच्या अशीलाच्या मालकीच्या अिमारतीचा ताबा....’ या शब्दांकडे त्याची नजर गेली. “ती नाथीबाईची कैफियत टाईप करून साडे चार वाजता तयार पाहिजे” हे शब्द त्याना आठवले. खर म्हणजे त्यानी लगेच खुर्चीवर बसून काम करायला हव होत.

पण त्याना त्या क्षणी त्या कामाचा व त्या जागेचाहि भयकर वीट आला होता. या जागेवर आणि या गुलामगिरीवर थुकून दूर कुठे तरी जावं, स्वतंत्र व्हाव अशी तीव्र इच्छा त्याच्या मनात उसळली होती. पण अशी इच्छा उसळण व ती प्रयत्नानं दाबणं हेंच त्याच्यासारख्या इतर कारकुनांप्रमाणें गोपूकाकाच्याहि आयुष्याच सार होतं. दूर कुठें जाणार ? स्वतंत्र कसं होणार ? ते अशक्य होत. तथापि इमारतीच्या खालच्या चौकात जरा चक्कर टाकण आणि गुजराती महाराजाकडचा गरम चहा पिण या गोष्टी शक्य होत्या. दुधाची तहान ताकावर भागवायला मनुष्य शिकतो.... गोपूकाकानी खुर्चीला अडकविलेला कोट उचलून अगावर चढविला आणि ते ऑफिसमधून बाहेर पडले. त्यानी विचार केला, ‘नाथीबाईच्या मालकीच्या इमारतीचा ताबा’ पधरा वीस मिनिटं तसाच टाइपरायटरवर पडला तरी हरकत नाहीं. परत आल्यावर दुप्पट वेगानं बोट चालवून ती कैफियत पुरी करतां येईल. सध्या खालच्या मोकळ्या आवारातली हवा मी खाणार आणि चागला दोन कप चहा मी ढोसणार ! नोकरीचा गुलाम असलों म्हणून काय झाल ? येवढहि स्वातत्र्य मला नसावं की काय ? .... ते अधाऱ्या जिन्यातून भराभर खाली उतरले आणि खालच्या मोकळ्या आवारात गेले. चहा पितां पितां त्याच्या डोळ्यापुढे एकत्र बसून हास्यविनोद करीत चहा पिणाऱ्या साहेबांचं आणि मिस् शिरगांवकरचं चित्र उभ राहिलं....चहा झाल्यावर पानपट्टी-वाल्यापासून त्यांनी दोन पानपट्ट्या घेतल्या. एक खिशांत व एक तोंडांत कोंबली, वर तंबाखू खाल्ली, आणि मारे ऐटीत आवारांतल्या धुळींत लालभडक पिचकाऱ्या टाकीत ते पुन्हा इमारतीच्या कोपऱ्याकडे जाऊन

जिन्याच्या पायऱ्या चढूं लागले.... कचेरींत जाऊन पोचल्यावर त्यांनीं घड्याळाकडे पाहिलं. चार वाजून दहा मिनिटं झालीं होतीं. आतां वीस मिनिटांत ती कैफियत त्यांना पुरी करायला हवी होती. त्यांनीं कोट काढला, खुर्चीवर बैठक मारली, 'आमच्या अशिलाच्या इमारतीचा ताबा–' यापुढचे शब्द मसुद्यांत पाहिले आणि टाइपरायटवर आपल्या बोटानीं हल्ला चढविला.

"काय पर्वते, कैफियत तयार झाली कीं नाही ?" हे शब्द ऐकतांच गोपूकाकांनी चमकून वर पाहिलं. प्रत्यक्ष साहेबच त्याच्यापुढें उभे होते ! त्यांच्या पोशाखावरून ते बाहेर निघाले असावेत हें उघड दिसत होतं. फायलीची चवड हातांत पेलणारा पट्टेवाला जरा अंतरावर उभा होता. मिस् शिरगांवकर आपली रंगीबेरंगी छोटी पर्स बोटांभोंवती फिरवीत मिस्किलपणानं हसत साहेबाना लगटून उभी होती ! "नाथीबाईची कैफियत तयार आहे की नाहीं ? साडेचार वाजतां पाहिजे असं मी तुम्हांला बजावलं होतं ना !" साहेब पुन्हा गुरगुरले.

तंबाखूचा खूपच रस गोपूकाकाच्या तोंडांत साठला होता. काय व्हायचं असेल तें होवो असं म्हणून त्यांनी तो सगळा गिळून टाकला आणि घसा साफ करून ते साहेबांना म्हणाले, "शेवटचा पॅरेग्राफ तेवढा राहिला आहे. पांच मिनिटात देतो."

"काय म्हणालांत पर्वते ?" साहेब इतक्या मोठ्यांदा गर्जले, कीं आजूबाजूचे सारेच कारकून चमकले आणि खुद्द गोपूकाका तर हादरूनच गेले ! मिस् शिरगांवकर फिदकन् हसली. गोपूकाकांच्या मनात आलं, तिला एका हातानं खसकन् ओढावी आणि दुसऱ्या हातानं तिच्या चागली श्रीमुखांत लगवावी ! परंतु ही गोष्ट करण्याऐवजीं त्यांनीं आपले शिवशिवणारे हात एकमेकांत गुतविले आणि ते नम्र आवाजांत पुटपुटले, "पांच मिनिटात देतो. पांचच."

"पर्वते !" साहेब आवाज आणखी उंच करून ओरडले, "म्हणजे मी तुमच्यापुढे पांच मिनिटं उभं राहावं असं तुमचं म्हणणं कीं काय ? मला कोण समजतां तुम्ही ?"

वेळेवर कागद तयार न करण्याचा अपराध आपल्या हातून घडला ही गोष्ट गोपूकाकांना मान्य होती; पण साहेबांनीं आपल्या टेबलापुढं येऊन

असा ‘सीन’ करावा इतका कांहीं आपला अपराध मोठा नाहीं असं त्यांना वाटत होतं. आणि त्यांचा तो अखेरचा प्रश्न – “मला कोण समजतां तुम्ही?” हें साहेबाचं विचारणं तर फारच चमत्कारिक होत! ‘कोण म्हणजे काय?.... अहो, या सॉलिसिटरच्या फर्मचे तुम्ही भागीदार आहात; बडे आहांत! श्रीमत आहात! या मिस् शिरगांवकरसारख्या हव्या तेव्ढ्या पोरी तुम्ही बाळगूं शकाल इतके तुम्ही मोठे आहांत! तुम्ही कोण म्हणजे काय विचारणं?....’

परंतु आवेगान मनांत आलेले हे सारे विचार गोपूकाकांनी गिळून टाकले. मात्र जे उत्तर त्याच्या तोडून बाहेर पडलं तें गुलामाला शोभण्यासारखं नव्हतं. ते म्हणाले, “साहेब, मला वाटतं, आपण असला प्रश्न मला करूं नये!”

“करूं नये?” साहेब ओरडले, “मोठे शहाणे दिसतां. कामांत कसूर करून पुन्हा वर असं बोलताना तुम्हांला शरम वाटली पाहिजे पर्वते!” असं म्हणून खाडखाड बूट वाजवीत साहेब जिन्याकडे गेले. पट्टेवाला आणि मिस् शिरगावकर हा त्याचा परिवारहि तुरुतुरू चालत त्याच्या मागोमाग गेला!

“काय पर्वते?” कुणी तरी विचारल. “आज हवा इतकी गरम कशासाठी करून घेतलीत?”

गोपूकाकांनी उत्तर दिलं नाही. त्यांनीं खुर्चीवर बैठक मारली, खिशांतलं पान काढून तोडांत कोंबलं आणि वर तबाखू खाऊन ते स्वस्थ बसले. नाथीबाईच्या त्या कैफियतीतला उरलेला शेवटचा पॅरेग्राफ पुरा करण्याची यत्किंचित्‌देखील इच्छा त्यांच्या मनात उरली नव्हती. तोडांतली तंबाखू चघळतां चघळतां ते मनाशी म्हणत होते, “आतां उद्यां बारा वाजतां साहेब येतील आणि मागतील तेव्हां नाथीबाईच्या केसचे हे कागद तयार ठेवले म्हणजे झालं आणि उद्यांदेखील ते तयार झाले नाहींत तरीसुद्धा असं काय मोठसं होणार आहे? फार फार तर साहेब म्हणतील, मिस्टर पर्वते, तुम्हांला डिसमिस केलंय्.... तसं त्यांनीं म्हटलं तर? – तर काय, या अंधाऱ्या इमारतीतील आपली कैदेची मुदत संपून दुसऱ्या अशाच कैदखान्यांत आपण दिवस कंठू लागूं!” ‘पटेल आणि डोंगरे’ ही काय एकच सॉलिसिटरची फर्म होती मुंबईत? तळहातावरच्या खरजेच्या फोडांप्रमाणं फोर्टमधल्या

शेकडो इमारतीच्या दरवाजापाशी सॉलिसिटरांच्या पाट्या एकमेकीला चिकटून लगडल्या होत्या. जगात नोकरी मागणाऱ्यांची गर्दी होती तशी नोकऱ्याचीहि होती. 'नोकराना काय तोटा – मिळतील हवे तेवढे,' या हिशेबाच्या मस्तीत मालक होते, तर आपल्याला काय कुठेहि हमाली करायची अशा विचाराच्या बेफिकिरीत नोकरी करणारे होते. 'पटेल आणि डोंगरे' नांवाच्या तुरुगांतून बाहेर पडावं लागलं तर तसलेच कितीतरी तुरुग दोन्ही हात उभारून गोपूकाकांना आपल्या अंधाऱ्या अत:पुरांत घ्यायच्या तयारीत उभे होते! कांही झालंतरी वीस वर्षांच्या हमालीचा अनुभव गोपूकाकांच्या पाठीशीं होता. साहेबानी जा म्हणून सांगितलं तरी त्याच्या दु:स्थितीत असा काय मोठा फरक पडणार होता.... खुशाल राहीना अपुरा नाथीबाईच्या केसचा तो शेवटचा कागद!....

अशा प्रकारें क्षुद्र माणसाच्या मनांत कधींमधीं येऊ शकणारे वैतागपूर्ण सामर्थ्याचे विचार मनाशी करीत, तोंडातल्या पानाचा बिदून् बिंदू शोषून घेत गोपूकाका किती वेळ बसले कुणास ठाऊक!....आजूबाजूच्या कारकुनांची कचेरीतून जाण्याची धादल सुरू झालेली त्यांच्या कानांवर आली तेव्हां ते आपल्या विचारांच्या तद्रीतून जागे झाले. नाथीबाईच्या केसमधला तो कागद तसाच टाईपरायटरवर राहूं देऊन त्यांनी गजलेलं झाकण यंत्रावर धाड्दिशी आपटून ठेवलं, खुर्चीवरचा कोट काढून अगावर चढविला, आणि हमालीच्या आयुष्यांतला आणखी एक दिवस सपल्याच्या विचित्र समाधानानं ते बाहेर पडले.

रस्ते ओले झालेले दिसत होते. उलटसुलट बाजूस धावणाऱ्या बसच्या खिडक्या लावून घेतलेल्या दिसत होत्या. आतां पाऊस पडत नव्हता; परंतु नुकत्याच मोठाल्या सरी पडून गेल्या असल्या पाहिजेत. शेकडो कचेऱ्यांतून सुटलेल्या हजारो माणसांच्या गर्दीत कितीकजण तरी छत्र्या आणि रेनकोट सावरीत चालले होते. चौकाच्या मधोमध उंचवट्यावर रहदारीचा पोलीस मेणकापडाच्या पोषाखांत उभा होता. रस्त्याच्या कडेला सुक्या मेव्याची विक्री करणाऱ्या विक्रेत्यांनीं आपापल्या हातगाड्यांवर कापडाचं पांघरूण चढविलं होतं. संध्याकाळचीं पत्रं विकणारे भय्येदेखील खाकेंतला ताज्या अंकांचा गठ्ठा भिजू नये म्हणून मेणकापडांत गुडाळून धरून इकडेतिकडे धावत

होते. मुंबईच्या पावसाळ्याला आरंभ झाला होता. गोपूकाकांनीं वर आभाळाकडे पाहिल थाबलेली पावसाची सर पुन्हा केव्हां सुरू होईल त्याचा नेम नाही हें त्यांना उवड दिसल. त्यांनी झटकन् कोटाच्या आतल्या खिशांतून एक जुन कातडी पाकीट काढल व त्यांतले पैसे मोजले सात रुपये दोन आणे पाकिटांत होते. 'सकाळी घरून निघताना साडेसात रुपये होते कीं ! सहा आणे कमी कसे? कुठ साडले की काय ?' तितक्यात त्यांना आठवण झाली, की गुजरात्याकडे दोन कप चहा पिण्याची आणि पानपट्टीचा खाण्याची चैन आपण आज केली. सात रुपये दोन आणे – बरोबर आहे ! त्यानी पाकीट खिशात घातलं, आणि छत्री विकत घेण्याचा निश्चय करून इमारतीच्या कमानींनी झाकलेल्या फरसबंद पायवाटेवरून ते जाऊ लागले फरशी ओली आणि माणसाच्या वर्दळीनं गलिच्छ झाली होती. कांही ठिकाणी फरशीच्या दगडाच्या खळगीत घाणेरडं पाणी साचल होतं. कुठे रगीबेरगी छोटचा जाहिरातींचे कागद दगडाना लपेटून बसले होते व लोकांच्या पादत्राणां-खाली सापडून फाटत होते. कुठे भुईमुगाच्या शेगाची फोलपट पडलेली होतीं व वाऱ्याच्या झुळकेचा आधार घेऊन उठून उडण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होतीं. कमानीखालून वाहणाऱ्या रहदारीच्या लोढ्यात सामील झालेले गोपूकाका शक्य तेवढ्या त्वरेनं पावलं टाकीत होते. त्याच्या खिशांत सात रुपये दोन आणे होते; छत्री विकत घ्यायचं त्यानीं ठरविल होतं....

छत्र्याचे तीन चार भलेमोठे जुडगे घेऊन उभा राहिलेला एक मलबारी दिसल्याबरोबर ते थाबले. त्या मलबाऱ्यान झटाझट छत्र्या उपसून व त्या उघडून गोपूकाकांपुढे धरण्यास आरंभ केला, आणि "ये लो साब ! बिलकुल अच्छा. सुपिरिअर ! इटालियन कपडा ! एकदम रेनप्रुफ ! " अशी धावती टीका चालू ठेवली गोपूकाकानी किंमती विचारल्या ! "अठरा, सतरा, सोळा ! " गोपूकाका गोंधळले, क्षणभर उभे राहिले आणि मग मान हालवून ते पुढं जाऊं लागले. मलबाऱ्यानं विचारलं, "क्या हुआ साब ? " आपल्या खिशात फक्त सात रुपये दोन आणे आहेत अशी कबुली देण्याची गोपूकाकांना भयंकर लाज वाटली. मलबारी त्यांच्याजवळ आला आणि पुन्हा एक छत्री उघडून जवळ धरून म्हणाला, "अच्छा. दस रुपिया दो. ग्यारा रुपियाका माल दस रुपियामें लो. चलो, निकालो दाम." त्यानं

छत्री फट्दिशी मिटली आणि गोपूकाकाच्या हातांतच जवळजवळ दिली. गोपूकाकांनी झटकन् हात माग घेतले आणि म्हटलं, "नको." मलबाऱ्यानं विचारल, "मग तुमची काय द्यायची इच्छा आहे?" मोठा धीर करून गोपूकाका म्हणाले, "सात रुपये देतो." तो मलबारी हसला व तुच्छतेन म्हणाला, "तुम नलबाजारमे जाव साब. उधर जूना छाता मिलेगा." तो हसला आणि गोपूकाकांवर पाठ फिरवून दूर गेला. स्वतःच्या क्षुद्रतेची भयकर जाणीव होऊन गोपूकाकानी मान खाली घातली आणि ते बसच्या स्टॅन्डवर जाऊन उभे राहिले.

झिम्झिम् पाऊस सुरू झाला. बसमागून बस येत होती, रांकेतले पुढचे लोक घेऊन जात होती. अखेर पुष्कळ वेळान गोपूकाकाचा नबर राकेच्या तोंडाशी आला. आता बस आली की ऐटीत छाती वर करून सगळ्यांच्या आधी बसच्या पायंड्यावर त्याना चढता येणार होतं.... उजव्या अंगाला दूरवर वेगान सरकत येणारा बसचा लाल ठिपका त्याना दिसला. रांगेसाठी तयार केलेल्या लाकडी चक्रव्यूहाच्या दाराशी बस येऊन उभी राहिली कीं आपल्याकडून खोटी होऊ नये अशा विचारान गोपूकाकानी पाऊल पुढे टाकलं. पण तितक्यात मागून त्याची मान खसकन् ओढली गेली आणि पुढें वाकण्यासाठी उचललेला त्याचा पाय हवेंत लटकत राहिला. त्यानी अत्यंत आश्चर्यान वळून पाहिल. एक उण्यापुऱ्या उंचीचा भला दांडगा इसम त्यांना माग ओढून विचारीत होता.

"पुढे कुठ निघाला मिस्टर? सगळ्यांच्या मागून येऊन पुढें घुसतां होय? चला हटा. राकेच्या शेवटी नबर धरा!"

गोपूकाकानी त्या माणसाकडे नजर टाकली. मुसलमान, सिधी, पारशी, मद्रासी यापैकी त्याची जात कोणती होती हे त्यांना ठरविता आलं नाहीं. किंबहुना तो माणसाच्या जातीतला नव्हता! मळकट बुशकोट आणि पॅन्ट घातलेला, इंग्रजी बोलणारा, अवाढव्य शरीराचा तो एक डुक्कर असावा. गोपूकाका चाचरत त्याला सांगू लागले, "महाराज, मी मागून आलों नाहीं अर्धा घंटा रांकेंत उभा होतों...." पण तो मवाली त्यांचं ऐकणार? "अरे हट् अर्धा घंटावाल्या!" असं खेकसून, गोपूकाकांची पुन्हा मानगूट धरून त्यानं त्याना ढकलून दिलं. लाकडी कठड्यावर आपटतां आपटतां

समोर येऊन थडकणाऱ्या बसच्या ब्रेकाचे कर्कश आवाज गोपूकाकांना ऐकूं आले. रांकवाल्या लोकाची झुबड बसच्या दाराकडे धावली, निम्मी अधिक बसनं गिळून टाकली, बाकीची परतली, हॉर्न वाजवून बसचं धूड हालून सरकूं लागलं इत्यादि गोष्टी त्यानी पाहिल्या. स्वतःला सावरून ते पुन्हा राकेत उभे राहिले पण पहिल्या नंबरावर नव्हे, तर राकेच्या शेवटाला ! मघाऱ्या धटिंगणाप्रमाणे दुसरा एखादा धटिंगण आपल्या उजव्याडाव्या बाजूस नसल्याची त्यानी खात्री करून घेतली आणि श्वास सोडला. पण आता बस येते की नाहीं म्हणून उजव्या बाजूला पुढे झुकून मान उंचावण्या- इतका देखील मनाचा ताजेपणा त्यांच्या ठिकाणी शिल्लक राहिला नव्हता. त्यांच्या शरीरापेक्षाहि त्याच मन अधिक कुस्करलं गेलं होत. ऑफिसांत साहेबानी त्याचा बाप काढला होता, शरम काढली होती. ज्यानं फक्त नम्र आवाजात चूक झाली नसली तरी " चुकलो साहेब. माफ करा ! " असंच नेहमी म्हटल पाहिजे अशा गुलामाची भूमिका त्यांनी नेहमी बिनतक्रार पार पाडली पाहिजे याची गोपूकाकांना आठवण करून दिली होती. फूटपाथवरच्या त्या छत्रीवाल्या मलबाऱ्यानं त्याना नळ बाजारात जुनी छत्री विकत घ्यायचा सल्ला देऊन त्याच्या दारिद्र्याचा उपहास केला होता ! आणि आतां अखेर एका रानदांडग्या मवाल्यानं त्याच्या शारीरिक दुर्बलतेची आणि क्षुद्रतेची कठोर थट्टा केली होती ! अधिकार, प्रतिष्ठा, सत्ता, संपत्ति, शक्ति यांपैकी एकहि गोष्ट गोपूकाकाजवळ नव्हती ! दुरुत्तर सोसावीं, उपहास गिळावा लाकडी कठड्यावर ढकललं जावं – हेंच त्यांच्या वाट्याला आलेलं आयुष्य होत .... अगदी कडवट विचारानी भरलेल्या मनानं ते वाट पाहणाऱ्या राकेंत किती वेळ उभे राहले कुणास ठाऊक ! ....

चाळीचा जिना चढून ते आपल्या बिऱ्हाडाच्या खोलीपुढे उभे राहिले. त्यानी दार ढकलल. दाराला आतून कडी होती. त्यांनी बाहेरची कडी वाजविली. दार उघडल गेल नाही. त्यानी पुन्हा कडी वाजविली व थोडी वाट पाहिली. आणि नतर दारावर दोन्ही हाताचे ठोसे लगावीत ते खूप मोठ्या आवाजात ओरडले. ' अरे, सगळेजण मेलांत काय !" आपल्या तोंडून अशुभ शब्द बाहेर पडले याच त्याना मुळीच भान नव्हतं. उलट दारावर जोरजोरान मुठी आपटल्यामुळे आणि मनसोक्त उंच आवाजांत

ओरडल्यामुळें त्यांना एकदम विलक्षण समाधान झाल्यासारखं वाटलं. त्यांच्या मनांत आलं, " या जगांत एक तरी अशी जागा आहे, कीं जिथें माझी सत्ता आहे आणि जिथें हव्या तेवढ्या उंच आवाजांत ओरडण्याचा मला हक्क आहे. जिथें मी अधिकार चालवूं शकतों; जिथें मीं गुलाम नाही, राजा आहे !" या विचारांचं एकदम मिळालेलं समाधान इतकं रुचिकर होतं, कीं त्याचे आणखी घोट घ्यावेत असं त्यांना वाटलं. त्यांनी दारावर पुन्हा मुठी आपटल्या आणि ते ओरडले. " रघू ! चंपे ! ए मने ऽऽ "

आंतून " आलें, आलें " असा मनीचा आजाव त्यांना ऐकूं आला. दुसऱ्याच क्षणी धावत येऊन तिनं दार उघडलं. पुढच्या खोलींत अंधार होता. गोपूकाकानी खेकसून विचारल, " या खोलीत दिवा नाहीं हा काय चावटपणा ! "

मनी म्हणाली, " इथला बल्ब कालच जळून गेला; तुम्हांला आठवत नाही, काका ? "

गोपूकाकांना आठवलं. परंतु जिचे आईबाप मेल्यानंतर आज पांच वर्षं जिला त्यांनी वाढविली होती त्या अवघ्या तेरा वर्षांच्या चिमुरड्या पोरक्या पुतणीनं त्यांना ही आठवण करून द्यावी ही गोष्ट त्यांना आवडली नाहीं. ते गुरगुरून म्हणाले, " मने, तुला उलट उत्तरं करायची सवय लागते आहे बरं का. बल्ब जळला तर दुसरा नव्हता आणतां येत ? घरीं परत यावं तर पुढच्या खोलीत अंधार म्हणजे काय ! नवा बल्ब कां नाहीं आणला ? बोल ! "

मनी हलकेच म्हणाली, " नव्याला पावणेतीन रुपये पडतात. काकू म्हणाली, काही नको आणायला. पगाराच्या तारखेपर्यंत खोलींत अंधार असला तरी चालेल. फार तर मेणबत्त्या आणूं. "

आणखी आणखी रागवावं, वाईट बोलावं, ओरडावं, आपला अधिकार सिद्ध करावा, सत्ता गाजवावी अशी इच्छा गोपूकाकांच्या मनांत बळावत होती; आणि मनी अहेतुकपणें त्यांना संधि देत होती. ते मोठ्यांदा ओरडले, " तूं आणि तुझी काकू दोघीहि गाढव आहांत ! " त्यांनीं अंगावरचा कोट ओरबाडून काढला व खुटीला ठेवला. " दोन्ही पोरं कुठं गेलीं आहेत ? " त्यांनीं रागानं प्रश्न केला.

मनी म्हणाली, " काकूनं त्या दोघांना शेजारच्या भिडेबाईंच्या बरोबर धाडलीं आहेत. "

" कुठें ? "

" सिनेमाला. "

" मला न विचारतां ? भिकाऱ्यासारखं दुसऱ्याबरोबर पोरं सिनेमाला गेलेलीं मला कधीच आवडत नाही. येऊं देत परत, म्हणजे दोघांनाहि फोडून काढतो ! " हातांच्या मुठी वळून गोपूकाका ओरडले. मग त्यांना एकदम आठवण झाली व त्यांनी विचारलं, " आणखी तुझी काकू कुठें गेली आहे ? "

मनीनं उत्तर दिलं, " परांजप्यांच्या वहिनीच्या भाच्याचं लग्न काल झालं. त्यांच्याकडे आज जेवणावळ आहे. त्या काकूकडे मुद्दाम आल्या आणि तिला आग्रहानं जेवायला घेऊन गेल्या. "

तें ऐकल्याबरोबर गोपूकाका एकदम मोठ्यादा ओरडले, " असं काय ! फार वाह्यात झालांत तुम्ही सगळीजण ! मनाला येईल तसं वागूं लागलांत. थांब. येऊं दे तुझ्या काकूला परत म्हणजे .... "

त्यांनी आपल वाक्य पुरं केलं नाही, व त्या अरुंद, अंधाऱ्या खोलीत एखाद्या पिंजऱ्यांतल्या श्वापदाप्रमाणें ते येरझारा घालू लागले. कांही वेळानं ते एकदम थाबले व ओरडले, " मला जेवण मिळणार आहे की नाही आज ? "

मनी म्हणाली, " मी करणार आहे ना. आंत शेगडीच पेटवीत होतें मी. "

" पण मला भयंकर भूक लागली आहे. आत्तां खायला हवं मला. काहीं तयार आहे ? "

" कांहीं नाहीं. "

" दुपारची चपाती भाजी ? "

" मुलांनीं सिनेमाला जाण्यापूर्वीं खाल्ली. "

" मग आत्ता कांहीं नाहीं ? "

" कांहीं नाहीं, काका. पण पांच मिनिटं थांबाल तर –"

गोपूकाकांना एकदम साहेबांच्या शब्दांची आठवण झाली व त्या

शब्दांचाच उच्चार करून ते ओरडले, "पांच मिनिटं थांबू ? मने, मला कोण समजतां तुम्ही ? "

ती गांगरली आणि पुटपुटली, " हें काय विचारणं काका ?"

ते शब्द ऐकल्याबरोबर गोपूकाकांनीं स्वतःचा संताप अनावर होऊं दिला आणि उजवा हात उंच करून त्यांनीं खाडकन् मनीच्या मुस्कुटांत मारली.

" काका ! " मनीनं किंचाळी फोडली.

परंतु त्या निरपराध कोवळ्या मुलीच्या अंगावर आपण दुष्टपणानं हात चालविला म्हणून गोपूकाकांना मुळीदेखील पश्चात्ताप झाला नाहीं. किंवा मनीच्या आर्त स्वरान त्यांचं अंतःकरण द्रवलं नाही. उलट, त्यांनीं तिला आणखी एक थप्पड मारली व ते ओरडले, " बेशरम ! चूप ! " आणखी आवाज उच चढवून ते पुन्हा ओरडले, " बेवकूफ !" स्वतःचा उंच, कर्कश आवाज ऐकण्यात त्याना विलक्षण समाधान वाटत होतं. मनीला दोन मुस्कुटांत मारल्यामुळें त्यांच्या मनाला शांतपणा लाभला होता. आणखी ओरडावं, आदळआपट करावी, बडवावं अस त्यांना वाटत होतं. या घरात आपण मालक आहोंत ! राजे आहोंत ! इथें आपण वाटेल तेवढयादा ओरडूं ! वाटेल तें बोलूं ! इथें आपली अबाधित सत्ता चालली पाहिजे ! ही सत्ता सिद्ध करण्यासाठीं ते आणखी ओरडत बडबडत राहिले. कचेरींत आणि बाहेरच्या दुनियेंत जी गुलामी, उपहास आणि दुबळेपणा त्यांच्या वांटयाला आला होता त्यावर सूड उगविण्याचा हा एकच मार्ग गोपूकाकांसारख्या असंख्य लोकांना उरलेला असतो. दुष्ट जुलमी राजाचं अवसान गोपूकाकांच्या अंगांत शिरलं होतं. मनी घाबरून आंतल्या खोलींत पळून गेली होती. पण गोपूकाका खूप मोठयांदा ओरडतच होते, "पाजी ! बेशरम ! फोडून काढीन साऱ्यांना ! मला कोण समजतां तुम्ही ! "....आणि स्वतःच्या विचकट शब्दांचा आवाज ऐकल्यामुळें दिवसभर सोसाव्या लागणाऱ्या जखमा सुवासिक गुलाबपाण्यानं धुतल्या जात आहेत असं त्यांना वाटत होतं !

# १३ . . . . . . मोहोर

मोटरचा हॉर्न दोनदां वाजवूनदेखील दूर न होणाऱ्या त्या माणसाच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात वसंतरावानी एका सभ्य शिवीचा हलक्या आवाजांत उच्चार केला. " आंधळा आहे, का बहिरा आहे, का दोन्ही ?" असं पुटपुटत त्यानीं पुन्हा हॉर्न वाजविला तो इतक्या जोरानं कीं ज्यानं इतका वेळ हॉर्नच्या आवाजाची दखल घेतली नव्हती तो माणूस एकदम दचकून टुणकन् उडी मारून दूर झाला, आणि त्यानं मान मुरडून मोटारकडे अशा अभिप्रायाची नजर टाकली, की ही काय हॉर्न वाजविण्याची रीत झाली ?....

आणि त्याचं तोंड पाहिल्याबरोबर वसंतरावांनी गाडी पुढें हाकण्याऐवजी अगदी अलगद सरकवीत त्याच्याजवळ नेऊन उभी केली, आणि मोठमोठ्यादा हसत म्हटल, " भले महाराज ! आपण का ते ? माफ करा ह केशवराव." केशवरावानी मोटार हाकण्याऱ्याकडे आश्चर्यान आणि रोषानं पाहण्याची क्रिया संपवली होती. तरीदेखील त्याच्या कपाळावरच्या आठ्या पुरत्या साफ झाल्या नव्हत्या. " ओळखलंत की नाही, केशवराव ? " केशवराव हसले आणि त्यानी झट्कन नमस्कार केला.... " कुठें निघालांत ? घरीच ना ? या. सोडतों तुम्हाला. " वसतरावांनी हात लांब करून दार उघडलं, गादी पंजानं थोपटली आणि केशवराव आत चढून बसल्यावर दार पुन्हा बंद करून गाडी चालू केली. मग ते म्हणाले, " रागानं फार मोठ्यांदा हॉर्न वाजविला; माफ करा हं, केशवराव. पण तुम्ही अगदीं जागचे हलाच ना "

केशवराव म्हणाले, " धक्का लागला असता तर कांहीं बिघडलं नसतं. एका मोठ्या सुप्रसिद्ध दिग्दर्शक-निर्मात्याच्या भारी किमतीच्या गाडीचा धक्का लागायचा म्हणजे देखील कमी भाग्याची गोष्ट नाहीं. "

वसंतराव खूप मोठ्यांदा हसले, कांहीं वेळ गप्प राहिले व मग म्हणाले, " किती दिवसांनी भेटतांहात केशवराव तुम्ही. "

" तुमच्या गाडीला आडवा आलों नसतों तर कांहीं भेट झाली नसती.. बडीं माणसं तुम्ही. "

" आमचा बडेपणा राहू द्या हो. तुमचा पत्ता कुठें आहे आतांशा ? "

" आमचा पत्ता पूर्वींचाच आहे महाराज. टिळक रोड, घर नंबर– "

" तुम्हाला खवचटपणानं बोलायची लहर आलेली दिसते. पण एखादी गोष्ट सांगितली तर त्याच्यावर विश्वास ठेवाल काय ? "

" काय सांगता तें ऐकल्यावर ठरवितां येईल. "

वसतराव म्हणाले, " आज चार दिवस तुमची फार आठवण करतों आहे मी – "

" मेहेरबानी – "

" खोटं नाही सागत. खर. माझं तुमच्याकडे थोडंस काम आहे. त्यासाठी तुम्हांला भेटायचं मनाशी घोकीतच होतों मी. केशवराव, माझ्या बंगल्यावर चला ना. तुम्हांला घरी जायची घाई नाही ना ? फर्स्ट क्लास चहा देतों–"

" म्हणजे आमच्या घरी आम्ही देऊ तो सेकंड क्लास होय ? "

" आतां बस करा बुवा घालून पाडून बोलणं. जाऊं या आमच्या बंगल्यावर. अ ? " वसंतरावानी गाडीचा वेग वाढविला. " तुमच्या घरचा चहा फर्स्ट क्लासच नव्हे तर त्यापेक्षांहि वरच्या दर्जाचा असतो हें मला माहीत नाही केशवराव ? कितीदा मी घेतला आहे तुमच्या घरी चहा, त्याला कांही गणती ? तुम्ही विसराल, पण मी विसरणार नाही. एक वेळ अशी होती की रोज –"

समोरून एक मोठा ट्रक आल्यामुळे वसंतरावांनीं तें वाक्य पुरं केलं नाहीं. परंतु ते काय बोलणार होते तें केशवरावांना ओळखतां येत होतं. ज्या दिवसांचा उल्लेख वसंतरावानी केला होता ते दिवस वसंतरावांइतकेच केशवरावांनाहि आठवत होते. परंतु दोन वर्षांपूर्वींच्या त्या आठवणी केशवरावांना नको होत्या. त्या बुजविण्याचा प्रयत्न त्यांनीं गेलीं दोन वर्षं सतत केला होता. त्या बुजल्यासारखं त्यांना पुष्कळदा वाटे; परंतु कधीं सकारण तर कधी अकारण त्या एकदम खोलांतून उसळून त्यांच्या मनाच्या

पृष्ठभागावर गर्दी करीत आणि मग ते दुःखानं, निराशेनं, चिडीनं असे कांहीं भांबावून जात, कीं भोंवतालच्या जगाची त्यांची जाणीवच नाहींशीं होई ! गर्दीच्या रस्त्यातून ते चालत असले तरी ते आपल्या विचारांत इतके गर्क होत असत, कीं पुढून मागून घाईनं येणाऱ्या लोकांचे धक्के त्यांना लागत. पाठीमागून येणाऱ्या टांगेवाल्याची ललकारी त्यांना ऐकू येत नसे. आज असंच झालं होतं. एका चौकातल्या एका उंच इमारतीवर एका चित्रपटाची खूप मोठी जाहिरात त्यांच्या नजरेस पडली होती. त्या रंगीबेरंगी, भडक जाहिरातीतलं कडेवर मूल घेऊन उभ्या राहिलेल्या तरुण स्त्रीच चित्र पाहिल्याबरोबर दोन वर्षांपूर्वीच्या दिवसाची त्याना एकदम जोरानं आठवण झाली होती.

याच चौकांत, याच भितीवर असंच भडक रंगांत काढलेलं सुलोचनेचं चित्र दोन वर्षांपूर्वीं त्यानी पाहिल होतं. त्या चौकात तें चित्र किती तरी आठवडे राहिल होत. पधरावा आठवडा, विसावा आठवडा, पंचविसावा आठवडा अशा ताबड्या रंगाच्या मोठ्यामोठ्या अक्षरांत छापलेल्या चिठ्या त्या चित्रावर अेकामागून एक लागलेल्याहि त्यानी पाहिल्या होत्या. ज्या चित्रपटात आपल्या मुलीनं पहिल्यादाच काम केलं तो असा कल्पनेपलीकडे यशस्वी झालेला पाहून त्यांना केवढा आभिमान वाटला होता ! त्या चौकांत उभं राहून सुलोचनेच्या चित्राची ती भव्य जाहिरात पाहिली, कीं त्यांचा ऊर समाधानानं आणि अभिमानान भरून येत असे. त्यांना वाटे, सुलोचनेच्या आईच्या विरोधाला गोंजारून, लोकांचे इशारे मनावर न घेऊन, चित्रपटाची दुनिया कशीहि असलो तरी आपण आपलं वर्तन चोख ठेवल कीं धोका नाही आणि ज्याच्या अंगांत गुण आहे त्याला यश मिळालंच पाहिजे असा विश्वास बाळगून, आपल्या एकुलत्या एक लाडक्या मुलीला वसतरावाच्या चित्रपटांत प्रमुख भूमिका करण्याची परवानगी आपण दिली यांत आपल कांहीं चुकलं नाहीं म्हणायचं....

त्या चौकांतल्या जाहिरातीकडे पाहिलं म्हणजे त्यांना खात्री वाटे, कीं आपली सुलोचना स्वतःच्या कलेची नीट जोपासना करील, शहाणपणानं वागेल तर आणखी मोठी होईल. आणखी गायला शिकावं, आणखी नाचायला शकावं या गोष्टी आतां तिला शक्य होत्या. आतां कांहीं ती मध्यम वर्गांतल्या

जेमतेम सुखवस्तु बापाची मुलगी नव्हती. तिला मोठा पगार मिळत होता. ती शिकेल तेवढं थोडं होतं. जितकं मोठ व्हावंसं वाटेल तितकं तिला होतां येणार होतं .... पण –

" **वादा न भूल जाना –** "

एखादी खिडकी एकदम उघडली जावी आणि वाऱ्याचा लोट आंत यावा त्याप्रमाणें वेग दर्शविणारा काटा, पेट्रोलचा काटा, घड्याळ इत्यादि यंत्रं मोटरच्या ज्या भागात होती त्या भागांतून गाण्याचे स्वर एखाद्या फवाऱ्यासारखे अंगावर आल्यामुळं केशवराव दचकले, मोटारीत रेडिओ होता, आणि वसतरावानी तो एकदम सुरू केला होता हें त्यांच्या लक्षांत यायला थोडा वेळ लागला....

" **ओ दूर जानेवाले...** "

वसंतरावांनी विचारलं, " असू दे ना ? " केशवरावांनीं कांहीच उत्तर केलं नाही. " असल्या गाण्याला हल्ली फार भाव आहे, केशवराव. आमचे चित्रपट चालतात ते असल्या गाण्यावर. माझ्या पुढच्या चित्रपटासाठी उत्तम सगीत-दिग्दर्शक मिळविला आहे मी. बी. भालचद्र ! नाव ऐकलं असेलच तुम्ही त्यांचं. मोठा डोकेबाज आहे. म्हणजे गाण्याचं शास्त्र त्याला कळतं असं नाही. पण दुनियेला काय पाहिजे तें त्याला कळतं. मी त्याला किती रुपये देणार आहे माहीत आहे ? " वसंतरावांनी समोरच्या काचेवर पांच, शून्य, असे आकडे बोटानं लिहायला आरंभ केला.

पण पांचावरची सगळी शून्यं केशवरावांनी पाहिलीं नाहींत. ते अंतराळांत कुठें तरी पाहात होते. त्यांची नजर शून्य होती....सुलोचना केवढी मोठी होईल याची किती परोपरीचीं स्वप्नं त्यांनीं मनाशी रंगविलीं होतीं.... आणि त्या स्वप्नांना आकार यायला कांही अडचण होती काय ? पहिल्याच चित्रपटांतल्या अपूर्व यशामुळें सुलोचना खरोखरच मोठेपणाच्या आणि कीर्तीच्या मार्गाला लागली होती. तो मार्ग तिला अगदीं मोकळा झाला होता....पण –

शेखरन् नांवाच्या एका नर्तकाच्या नादीं सुलोचना लागली होती आणि निराळ्याच मार्गानं जाण्याचा विचार ती करूं लागली होती. कांहीं दिवस या गोष्टीचा थांगपत्ता केशवरावांना नव्हता ; पण हळूहळू

त्याना संशय येऊं लागला आणि थोड्याच दिवसांत त्यांची खात्री पटली, कीं शेखरन्शी लग्न करण्याचा सुलोचनेनं बेत केला आहे. त्यांनीं गोडीगुलाबीनं तिला उपदेश करून पाहिला, वसंतरावासारख्या मित्रांकडून चार समजुतीच्या गोष्टी तिला सागून पाहिल्या. या गोष्टीचा उपयोग होईना, तेव्हा शेखरन्ची हजेरी घेऊन पाहिली. पण त्यानं सभावितपणाचा आव आणून कानावर हात ठेवले. " मी कुठे सुलोचनेला म्हणतों आहे माझ्याशीं लग्न कर म्हणून ? तिचाच आग्रह आहे. तिलाच सागा काय तें. " मग एके दिवशी केशवरावांनी सुलोचनेवर रागाचं अस्त्र काढलं होतं. त्यांना वाटलं होत, सुलोचना उलट उत्तर करणार नाही. पण उडाणटप्पू माणसानं नादी लावलेल्या मुली त्याच्या गुणावर भाळल्या, की किती बदलतात त्याचा प्रत्यय त्यांना आला. ते एकपट फाड्फाड् बोलले तर सुलोचना दसपट बोलली. तें ऐकतांना केशवरावांच्या मनात आलं, की "सुलोचनाच का हें बोलत आहे ? आणि मलाच का बोलत आहे ? खचित माझी लाडकी सुलोचना ही नव्हे. हिला कोणत्या तरी पिशाच्यानं झपाटलं आहे. हिच्याशीं नुसता शब्दाचा वाद घालून नाहीं उपयोगी...."

त्यांनी काड् काड् अशा एकामागोमाग एक तीन मुस्कटांत तिला लगावल्या होत्या....तिला घराबाहेर प्रडण्याची बदी केली होती....

दुसऱ्याच दिवशी सुलोचना घरांतून नाहीशी झाली होती ! शेखरन्बरोबर ती कुठें निघून गेली होती कोण जाणे.... गेल्या दोन वर्षांत तिच्या-विषयीच्या केवळ ऐकीव बातम्यांपलीकडे केशवरावांना कांहीं माहिती नव्हती. काही दिवस शेखरन्बरोबर नृत्याचे प्रयोग करीत ती हिंडली होती. तिला मुलगा झाला होता. पुढे शेखरन् तिला सोडून गेला होता. तरी पण ती घरी बापाकडे आली नव्हती. कुठे होती, काय करीत होती, कोण जाणे ! लोकांत दहा प्रकारच्या दहा बातम्या होत्या. खर कांहीच कळण्यासारखं नव्हतं. कळण्याची इच्छाहि केशवरावाना उरली नव्हती. तिचा निश्चित पत्ता काढावा आणि तिला परत बोलवावी अस क्वचित् एखादे वेळेस त्यांच्या मनांत येई; पण आपल्या उजव्या तळहाताकडे पाहिलं, कीं त्यांचा विचार बदले. त्यांनीं त्या हातानं तिच्या मुस्कटांत लगावल्या होत्या. ते मनाशीं म्हणत, हिवाळ्यांत झाडावरची पालवी झडावी, मातीत पडावी, नाहींशी व्हावी

तशी लेकीबद्दलची माझी सारी माया मीं सोडली.... आणि सोडली तेंच बरोबर केलं. सुलोचना मला मेली....मी तिला मेलों.... जाईना का ती दूर....कुठेंहि दूर....

"ओ दूर जानेवाले ...."

गाणं एकदम बंद झालं. केशवराव भानावर आले. गाडी वसंतरावांच्या बंगल्यांत शिरत होती.

चहा पिणं सपेपर्यंत वसंतरावांनी कोणत्या कामासाठीं मुद्दाम आपल्याला आणलं त्याचा पत्ता केशवरावांना लागला नाहीं. चहा केटलींतून कपांत ओतला जात होता, त्या वेळेस केशवराव ज्यांना ओळखीत नव्हते असे दोन इसम नेमके हजर झाले. "या! या! चहा घ्या. बसा." असं म्हणून आपल्या नेहमीच्या स्वभावाप्रमाणे वसंतरावांनीं त्यांचं स्वागत केलं आणि त्यांनाच मुख्य श्रोते समजून ते बोलत राहिले. मधून मधून केशवरावहि बैठकीत सामील आहेत अशा अर्थाची नजर ते त्यांच्याकडे टाकीत होते. परंतु त्यांना उद्देशून बोलत होते एखादं अर्धं वाक्यच. "वसंतराव, मला सोडतां का आतां ?" अस केशवरावांनी एकदा म्हणूनहि पाहिलं, पण "बसा हो" असं म्हणून त्यांची मांडी वसंतरावांनीं दाबली. केशवराव नाइलाजानं बसले. पण त्यांना कळेना वसंतराव आपल्याला मुद्दाम कशासाठी घेऊन आले ते....

वसंतरावांच्या या दिवाणखान्यांत ते पूर्वीं कितीदां तरी बसले होते, चहा प्याले होते. तेव्हा त्यांच्याबरोबर सुलोचना नेहमीं असायची. कितीदां तरी वसंतरावांच्या बायकोनं तिला आग्रहानं ठेवून घ्यावं. वसंतराव कित्येकदां लोकांना सांगायचे, "मला तिन्ही मुलगेच झाले. माझी मुलीची हौस अपुरी राहणार होती, पण या सुलोचनेनं ती पुरी केली. हिचा अभिमान केशवरावांना अर्थातच असेल. पण मला जास्त आहे" .... शेखरनूशीं लग्न करण्याचा हट्ट तिनं धरला तेव्हा वसंतरावांनीं तिला पुष्कळ सांगून पाहिलं, कीं "हा मूर्खपणा करूं नकोस, मी तुला फार मोठीं मोठीं कामं देणार आहे." .... पण तिनं त्यांचंदेखील ऐकलं नाहीं .... तिचं डोकं फिरलं होतं. वसंतरावांनादेखील तिचा हट्ट पाहून दुःख झालं होतं, चीड आली होती. त्यांनीहि तिचं नांव टाकलं होतं. हिवाळ्यांत झाडावरची

पालवी शुष्क होऊन गळून पडते, मातींत मिळते, त्याप्रमाणें तिच्याबद्दलची वसंतरावांचीहि....

वसंतरावांकडे आलेले ते दोन इसम उठले. त्यांना पोचविण्यासाठी वसंतराव दिवाणखान्यालगतच्या गॅलरीपर्यंत गेले. परत आल्यावर ते कोचावर केशवरावांच्या माडीला माडी लावून बसले आणि म्हणाले, " हां आतां आपलं काम. केशवराव, सुलोचना कुठं आहे सांगा. जिथें असेल तिथून तिला आणायचं मी ठरवलं आहे...."

त्यांच तें बोलणं ऐकून केशवराव स्तंभितच झाले !

सुलोचना कुठें आहे ?.... त्याना तरी कुठें माहीत होतं ? माहीत व्हावं अशी इच्छा त्याना कुठें उरली होती ! हिवाळ्यातल्या पालापाचोळ्यागत ती इच्छा गळून नाहींशी झाली होती. वसतराव तरी तिचं नांव पुन्हा कशाला काढीत होते ?....

" मी जो नवा चित्रपट काढणार आहे ना, केशवराव " वसतराव सांगूं लागले, " त्यांतल्या मुख्य भूमिकेला सुलोचना पाहिजे बघा. मी हा नवा बी. भालचद्र आणला आहे ना, तो म्हणतो त्याच्या पंजाबी ढंगाच्या लचकदार चाली जिच्या गळ्यांतून अगदीं बेफाम निघतील अशी सुलोचनेसारखी दुसरी मुलगी नाही. अन् प्लेबॅकच गाणं नको आहे मला. एका बाईनं गायचं आणि दुसऱ्या बाईनं.ओठ हलवायचे – शीः ! माझ्या नव्या चित्रपटांतली नायिका स्वतः गाणारी असली पाहिजे. सध्या बाजारांत ज्या नटीना भाव आहे त्याचे नुसते मुखडे पाहून घ्या ! पंचम लावायला सांगितला तर त्यांच्या गळ्यातूत निघेल बेसूर मध्यम. इति बी. भालचंद्र. तो म्हणतो सुलोचनाच पाहिजे. बस्स सुलोचना ...."

वसतराव आवेशानं बोलत राहिले. केशवराव त्यांच्याकडे बघत होते; पण त्याच लक्ष त्याच्या बोलण्याकडे कुठें होतं ? ते आपल्याच विचारांत गढले होते.... सुलोचना कुठे होती ?.... कुणी म्हणत, शेखरन् तिला सोडून गेला आहे.... कुणी म्हणत तिला मुलगा झाला होता .... पण ती कुठे होती ? कशी राहात होती ? तें माहीत करून घेण्याचा प्रयत्न केशवरावानी कधी केला नव्हता. त्यांची ती इच्छा वाळलेल्या पालवीसारखी .... आणि आता केशवराव म्हणत होते,

" तुमच्याकडे येणार होतों तो याच कामासाठी. आज अनायासें तुम्ही भेटलां, चांगला शकुन झाला. आता माझं काम होणार. सुलोचनेचा पत्ता सांगा म्हणजे तिला आजच्या आज एक्सप्रेस तार करून बोलावतों. सांगा."

केशवराव गप्प राहिले .... त्यांना एकदा वाटलं, कीं वसंतरावांना चक्क सांगून टाकावं....

पण लगेच त्यांच्या मनांत आलं आपण सुलोचनेचं नांव अजिबात सोडलं आहे, तिचा पत्ता आपल्याला माहीत नाहीं, ही गोष्ट वसंतरावाना कळू द्यायची? सुलोचनेनं जें केलं तें आपल्याला अगदीं पसंत नव्हतं, तिच्या वागण्यानं आपल्याला दुःख झालं होतं वगैरे गोष्टी वसंतरावांना माहीत असतील; परंतु ती जिवंत आहे की मेलेली आहे याचीसुद्धां चौकशी आपण केलेली नाही अशी कबुली द्यायची ? वसंतराव खचित म्हणतील, " वा केशवराव, असं वागणं शोभत नाहीं तुम्हांला. किती झालं तरी सुलोचना तुमची पोटची मुलगी. एकुलती एक. झाला असेल तिच्या हातून मूर्खपणा. सगळ्यांच्याच हातून होतो. किती झाल तरी ती लहान बच्ची आहे. तुम्ही मोठे आहांत. तुम्हांला जगाचा अनुभव आहे. तुम्ही तिचे बाप आहांत. तिच्याविषयीची सारी माया हृदयातून काढून टाकणं बरं काय ? आणि ती काढायची म्हणून काढतां येईल अशी तुमची कल्पना आहे कीं काय ? बापाची माया म्हणजे काय झाडावरचं पाखरूं आहे, कीं आपल्या इच्छेप्रमाणें ती राहूं द्यावी किंवा उडवावी ? छे ! छे ? सुलोचना कुठे आहे तें तुम्हाला माहीत नाहीं असं तुम्ही म्हणतां याचं मला आश्चर्य वाटतं ...."

खरी गोष्ट वसंतरावांना चक्क सांगून टाकावी हें केशवरावांच्या मनाला रुचेना. तसं करण्याची त्यांना एक प्रकारची शरमदेखील वाटली. त्यांचा पहिला विचार बदलला. पण त्यांच्या मनांत असंहि आलं, कीं खरी गोष्ट सांगायची नाही तर सागायचं काय ? सुलोचनेचा पत्ता तर त्यांना खरोखरच माहीत नव्हता. तो माहीत असल्याचं सोंग कसं करायचं ? कुठला पत्ता सांगायचा ? मनांतल्या मनांत ते पुन्हा अडून राहिले, सुलोचनेचा पत्ता माहीत नाहीं असं सांगण्याची त्यांना शरम वाटली आणि तिचा पत्ता तर त्यांना माहीत नव्हता ! वसंतरावांना काय उत्तर द्यायचं ? त्यांना कांहीं सुचेना. ते अगदीं गोंधळून गेले. खालीं पाहात

राहिले. पण दुसऱ्याच क्षणीं त्यांना वाट सापडली ! त्यांनी वर पाहिलं आणि म्हटलं, " तुम्ही कशाला तार करतां ! मी करतों. तुम्ही ताबडतोब बोलावलं आहे एवढंच लिहायचं की नाहीं ! मी करतों तार –"

"पण आजच हं. नाही तर विसराल महाराज." वसतराव मोठ्यांदा हंसले.

त्यांच्या हसण्याच्या संसर्गानं केशवरावाना एकदम साऱ्या गोष्टीचा विसर पडला आणि तेहि मोठ्यांदा हसले. त्यांना आनंद झाला किंवा त्यांची करमणूक झाली म्हणून नव्हे. किंबहुना आपल्याला कां हसू येत आहे तें त्याना कळलहि नाही. हसल्यावांचून त्यांना राहवेना म्हणून ते हसले एवढंच. ते म्हणाले " वा ! विसरेन कसा ? माझं नाव केशवराव आहे. आडनांव कांही विसरभोळे नाही."

ते ऐकून वसतराव पुन्हा एकदा हसले आणि मग त्यांच्या खांद्यावर थाप मारून म्हणाले, " बरं चला तुम्हाला पोचवूं ना आतां ? "

घरी परत आल्यावर केशवरावांनी घड्याळांत पाहिलं तों फारसा उशीर झाला नव्हता. दाढी, आंघोळ, जेवण सावकाश आटपून कचेरीची वेळ त्यांना साधता येणार होती. त्यानी कपडे काढले. आपल्या खोलीतल्या खिडकीच्या कट्ट्यावर आरशापुढे दाढीच सारं सामान माडलं, गरम पाणी आणून त्यांत वस्तरा बुडविला, आणि एकीकडे ब्रश आणि साबण घेऊन दोन्ही गालांवर, हनुवटीवर, आणि गळ्यावर साबणाच्या फेसाचा थर चढवीत खिडकींत खालच्या मोकळ्या आवारांतल्या झाडाकडे ते पाहू लागले....

त्या आवारात कडूनिंबाची दोन मोठाली झाडं होती. एका कोपऱ्यांत मांडवावर वेली चढलेल्या होत्या, दुसऱ्या कोपऱ्यांत आंब्याचा जुना वृक्ष होता. या दृश्याकडे केशवरावांनी आजपर्यंत अगणित वेळां पाहिलं होतं.या खिडकीत उभं राहूनच दाढी करण्याचा त्यांचा क्रम होता, आणि दाढी करतांना त्यांची नजर साहजिकच आवारांतल्या त्या झाडांकडे पुनः पुन्हा वळत असे.

निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळी शोभा त्यांच्या दृष्टीस पडे. पावसाळ्यात वेली आणि झाड न्हाऊन निघालेलीं असत, जमिनीवर चिखल झालेला असे, भिजलेल्या काळ्या मातीवर वेलींवरच्या पांढऱ्या स्वच्छ नाजुक फुलांचा थर साचलेला असे. खूप वृष्टि होऊन आवारांत छोटीं छोटीं डबकीं तयार झाली, की त्यांत पक्षी आपल्या इवल्याशा चोची बुडवून पंख

साफ करण्याचा खेळ करीत. पावसाळा संपला कीं हा देखावा हलके हलके बदले आणि दुसरा दिसूं लागे. संक्रांत जवळ आली, कीं सूर्याची दिशा निराळी होई. आवारात प्रकाशाचा झोत निराळ्या बाजूनं शिरलेला दिसे. अंगाला झोंबणारा गार वारा सुटलेला असे. झाडांवरची पानं गळून वाऱ्याबरोबर झोके खात खात खाली पडत, त्याचा थर जमिनीवर साचू लागे. नंतर झाडांच्या फांद्या पूर्णशून्य होऊन जात व त्यांवर पक्षी बसेनासे होत. वाटूं लागे, की आतां या झाडांच्या फांद्या सदाच अशा काटक्यासारख्या राहणार. झडून मातीत मिसळलेली त्याची पालवी गेली ती कायमची गेली. आतां त्या फांद्याना पुन्हा पालवी नाही फुटायची. परतु ऋतु पालटे, सूर्याच्या आणि वाऱ्याच्या निराळ्या हालचाली होऊं लागत, झोपी गेलेल माणूस हलकेच जाग व्हावं तद्वत् झाडांच्या फांद्याना नवी जाग आल्याप्रमाणें वाटे. नव्या कोवळ्या पल्लवाचे ताबूस रग फांद्याच्या अगावर उठू लागत. एके दिवशीं आंब्याला नव्या मोहोराचे कोंब फुटत आणि त्याच्या नाजुक सुगधाचे तरंग हवेंत उठूं लागत ....

गालावरून वस्तरा ओढता ओढता केशवरावांनी नाकपुड्यांनी ' सू ' ' सू ' असा आवाज करून हुगून पाहिलं, आणि आंब्याच्या झाडाकडे निरखून बघितलं. मोहोराचा दरवळ आज प्रथमच त्यांच्या नाकांत शिरत होता. ' अरे, आंब्याला मोहोर आला काय ! ' असं ते मनाशीं आश्चर्यानं म्हणत होते. त्यानी अगदी निरखून पाहिलं तेव्हा आंब्याच्या अंगावर एका जागीं लालसर हिरव्या मऊमऊ चकाकणाऱ्या पानांतून मोहोराचे दोन कोवळे तुरे डोकावत होते ते त्यांना दिसले, त्यांनी प्रसन्नपणानं नाकपुड्यांची हालचाल केली. दाढी करतां करतां ते आंब्याच्या झाडांवरच्या त्या नव्या नवतीच्या आम्रमंजिरींकडे सारखे बघत राहिले ....

त्यांच्या मनांत येत राहिलं, " निसर्गाचा काय चमत्कार पहा ! सृष्टींत जगणंहि शाश्वतचं नाहीं आणि मरणंहि ! जें निर्माण होतं तें कायम टिकत नाहीं आणि जें नाहींसं होतं त्याचाहि कायमचा अंत होत नाही. प्रत्येक गोष्ट नाहींशी होते, आणि नाहींशी होणा ी प्रत्येक गोष्ट पुन्हा निर्माण होतेच. इथें कायमचं कांहीच जगत नाहीं, -पण कायमचं कांहीं मरतहि नाहीं, नाहींसं करतांहि येत नाहीं .... "

त्यांची दाढी आटपली. सारं सामान उचलून ठेवून त्यांनी बायकोला हलक्या आवाजांत ओरडून म्हटलं, "आमच आंघोळीचं पाणी काढता काय ! " त्यानी एक सिगरेट शिलगावली व ती संपवल्यावर ते आघोळीच्या खोलीकडे निघाले. तितक्यात दारावरची घंटा वाजली. त्यांनी दार उघडलं. तारवाल्यान त्याच्या हाती तारेचा लिफाफा व सही करण्याचा कागद दिला. सही करून कागद परत देऊन त्यानी दार बद केलं. लिफाफा फाडतां फाडतां ते मनाशीं म्हणाले, " कुणाची बरं असावी तार ? " कुणाच्याहि तारेची ते अपेक्षा करीत नव्हते.

पाकिटांतला कागद काढून तो वाचल्याबरोबर केशवरावांच्या मनाची जी अवस्था झाली तिचं वर्णन त्याच त्यांनादेखील करता आलं नसतं. त्यांना आश्चर्य वाटलं, की आनंद झाला, की पूर्वींच्या दुःखदायक आठवणी झाल्या हें त्याचं त्यांनाच क्षणभर कळल नाही ! नीट भानावर यायला त्याना थोडा वेळ लागला.

तेवढ्यात त्यांची बायको त्याच्याजवळ आली होती. तिनं विचारलं, " कुणाची तार ? "

" सुलोचनाची " असं म्हणून त्यानी तारेचा कागद तिच्यापुढे धरला.

" काय लिहिलं आहे तारेंत ? "

केशवरावानीं तारेचा कागद उचलून पुन्हा वाचला आणि म्हटलं, "उद्यां सकाळच्या गाडीनं येतें. स्टेशनावर या. "

" कुठून केली आहे तार ? "

कोणत्या गावाची तार आहे हें केशवरावांनीं अजून पाहिलं नव्हतं. त्यानीं कागद पुन्हा वाचला. भुवयांना आठी घालून ते म्हणाले, "गावाच नांव काही नीटस लागत नाही. नांवाच्या शेवटी 'पुरम्' असं कांही तरी आहे. मद्रासकडलं एखाद गांव दिसतय्. "

त्यांनीं पाहिलं तों त्यांच्या बायकोच्या डोळ्यांत पाणी आलं होतं. ते म्हणाले, " पाणी उपसलं आहेस ना ? " त्यांनीं तारेचा कागद आपल्या खोलीत नेऊन ठेवला आणि ते स्नानगृहांत गेले.

दुसऱ्या दिवशी सक़ाळीं ते स्टेशनवर गेले. गाडी सहा वाजून वीस मिनिटांनीं यायची होती. प्लॅटफॉर्मवर दिवे लागले होते, ठिकठिकाणीं

उतारूंचे लहानलहान घोळके बसले होते; परंतु शुकशुकाट असल्यासारखंच वाटत होतं. हलके हलके पावलं टाकीत येरझारा घालतांना केशवराव पुनः पुन्हा मोठ्या घड्याळाकडे पहात होते. सहाच्या पुढे सरकलेला मिनिटकाटा एक एक घर ओलांडीत होता. वाऱ्याची मंद झुळूक सुटली होती. आणि कुठून कोण जाणे आब्याच्या मोहोराचा वास हलकेच येत होता.... त्या दरवळाचा श्वास घेतांघेतां केशवरावाच्या मनांत येत होतं, माणसाच्या भावनासुद्धां झाडावरच्या पालवीसारख्याच म्हणायच्या. प्रसंगानं त्या गळतात, नाहीशा झाल्यासारख्या वाटतात; परतु कालातरान त्या पुन्हा टवटवीत होतात !

वेळेला दोन तीन मिनिटं कमी असतांनाच गाडीच्या एंजिनचा खूप मोठा दिवा स्टेशनच्या यार्डमध्ये शिरून वेगान सरकत येऊं लागलेला दिसला. प्लॅट-फॉर्मवर एकदम हालचाल झाली. तांबडी कुडती घातलेले हमाल धावले आणि ओरडू लागले.दादरालगतच्या एका खाबापाशीं केशवराव उभे राहिले.गाडीचा एक एक डबा त्याच्यापुढून सरकत गेला. गाडी थाबली. खाली उतरण्यासाठी उतारूंची एकच झुबड उडाली. सुलोचना आपल्याला कशी सापडणार अशा चिंतेनं केशवराव नजरेनं शोधू लागले. पुढें मागें धावलेहि. तितक्यांत " बाबा ! " अशी हांक त्याच्या कानावर आली. त्यांनीं पाहिलं तों एका डब्याच्या दारात सुलोचना उभी असलेली त्याना दिसली.ते तिच्याकडे धावले.

तिचं सामान हमालाच्या डोक्यावर देऊन तिला घेऊन ते दादराच्या पायऱ्यांकडे निघाले. त्यांच्या मनात सारखं येत होत, की तिला विचारावं, 'हे काय, मुलाला घेऊन नाही आलीस ?'.... पण ओठांवर आलेले ते शब्द त्यांनीं उच्चारले नाहीत. त्यांना भीति वाटली, कदाचित् त्या प्रश्नाचं उत्तर दुःखदायक असेल. तें उत्तर समजून घेण्याची घाई काय होती ? या क्षणाला महत्त्वाची गोष्ट होती ती एवढीच, कीं त्यांची लाडकी सुलोचना परत आली होती, आणि तिच्याबद्दलच्या मायेची त्यांच्या मनांतली गळलेली पालवी पुन्हा टवटवीत झाली होती ....

सुलोचना म्हणाली, " बाबा, आतां पुण्यांत रिक्षा झाल्या आहेत म्हणे ?"

अगदीच असंबद्ध अशा तिच्या त्या प्रश्नानं केशवरावांना एकदम तितकाच असंबद्ध असा विलक्षण आनंद झाला. ते मोठ्यांदा हसले आणि म्हणाले "होय. आपण रिक्षांतूनच जाणार आहोंत घरीं."

# १४ . . . आरशासारखं स्वच्छ !

"'लोकल' पकडण्यासाठीं प्लॅटफॉर्मकडे मी धावत होतों, तितक्यांत 'शामराव ! शामराव !' अशा हांका आणि मोठ्यांदा वाजविलेल्या टाळ्याहि मला ऐकूं आल्या. माझा ताशी दहा मैलाचा वेग आवरून 'राइट अबाऊट टर्न' करून मी वळलो. माझ्या मागोमाग तितक्याच वेगानं धांवत येणाऱ्या दोन व्यक्ती माझ्या अंगावर येऊन आदळल्या. "बरा भेटलास बाबा !" "तुझा पत्ता कसा काढावा या फिकीरीतच होतों–" असे उद्गार काढीत त्या दोघांनीं माझे हात धरले. खूप आनंद झाल्यावर माणूस हंसतांना जितकी जिव्हणी फांकतो तितकी मी फाकली आणि त्या दोघांचे हात गदागदा हालवीत विचारलं, "तुमच्या स्वाऱ्या इकडे कुठें ? तुम्ही भेटाल ही अगदी कल्पना नाही."

बाळू परांजपे म्हणाला, "अरे या झोन तिकिटाच्या दिवसांत कोण मनुष्य कुठें उपटेल त्याचा कांही नियम राहिला आहे का ? उत्तरेकडचीं माणसं दक्षिणेकडे जात आहेत, आणि दक्षिणेकडचीं उत्तरेकडे ! सारी दुनिया ढवळून निघत आहे. काम असो वा नसो, माणसं आपापलीं घरं सोडून निघालीं आहेत. 'कलेसाठी कला' म्हणतात ना, त्यप्रमाणें केवळ 'प्रवासासाठी प्रवास' चालला आहे माणसांचा. लोकांच्या झुंडीच्या झुंडी प्रवासाला निघालेल्या पाहून आम्हाला दोघांनाहि वाटलं कीं मुशाफरी करावी. काढलीं दोन झोन तिकिटं आणि निघालो आम्ही."

राजा दामले म्हणाला, "जास्तींत जास्त मैलांची मजल मारून तिकिटांचे पैसे वसूल करायचं आम्ही ठरविलं आहे."

मी म्हटलं, "स्तुत्य आहे."

राजानं विचारलं, "तूं कां नाहीं झोनचं तिकीट काढून दिल्लीला गेलास रे ?"

मी बोलण्याच्या आधींच बाळू म्हणाला, "अरे, तो कशाला काढतो झोन तिकीट ? नुकतंच लग्न करून संसार मांडला आहे त्यानं. मिय्या-बिब्बीची अष्टौप्रहर मौज चालली असेल ! झोन तिकिटावर दिल्लीच्या वाऱ्या करण्यांत गंमत वाटायची तुझ्यामाझ्यासारख्या भटक्या ब्रह्मचाऱ्यांना. याचा मधुचंद्र संपायचा आहे अजून. हा कशाला काढतो आहे झोन तिकीट? काय शामराव, मी म्हणतों तें खरं की खोटं ?"

मी हंसून म्हटलं, "अर्धं खरं आहे, अर्धं खोटं आहे. नव्या संसाराला इतकी मजा आली आहे की कुठें जावंसं वाटतच नाहीं, हें तर खरंच आहे. पण दुसरं महत्त्वाचं कारण असं की ऑफिसांतून रजा कांहीं केल्या मिळत नाहीं. आजचंच पहा ना, शनिवार आहे पण रात्री आठपर्यंत कचेरींत बसायला सांगत होता साहेब. एका खोटच्या आत्याबाईला पाडली आजारी, तेव्हां कुठें झाली सुटका !"

"आमचं नशीब म्हणायचं. तुला भेटावंसं फार वाटत होतं, पण तुझी नवी नोकरी कोणत्या ऑफिसांत आहे तेंहि माहीत नाहीं अन् तुझ्या नव्या बिऱ्हाडाचा पत्ताहि माहीत नाहीं. तुझी भेट न घेतां ग्वाल्हेरला परत जावं लागलं असतं तर फार वाईट वाटलं असतं आम्हांला. तूं अचानक भेटलास; फार आनंद झाला."

राजा म्हणाला, "कांहीं गरम थंड देतोस कीं नाहीं आम्हांला ?"

मीं म्हटलं, "काय दरिद्री आहेस लेका ! किती दिवसांनीं तुम्हां दोघां जुन्या दोस्तांची भेट झाली माझी. आणि तुम्हांला इराण्याच्या हॉटेलांत नेऊन ग्लासभर थंड पाणी किंवा कपभर गरम पाणी पाजूं होय ? शोभेल काय मला ?"

बाळू राजाकडे पहात म्हणाला, "दुकानांतल्या चहावर आपली बोळवण करणं याला शोभायचं नाहीं, अन् ती करून घेणं आपल्याला शोभायचं नाहीं. आपण दोघे याचे जुने जिगरदोस्त. आपण याला म्हटलं पाहिजे, 'आम्ही तुझ्या बिऱ्हाडीं येणार, तुझा संसार पहाणार, तुझी बायको पहाणार, फराळावर यथेच्छ हात मारणार, घटकाभर मजा करणार !'

काय शामराव, खर की खोटं ? ''

त्या दोघाना घरी घेऊन जाण्याची माझी इच्छा होतीच. पण बाळू परांजप्याच्या त्या बोलण्यान आणखीच हरबऱ्याच्या झाडावर चढल्यासारखं मला झालं.... ललिता या वेळी घरी असेल की नाही, घरीं असली तरी हे दोन पाहुणे अचानक आलेले पाहून तिला आनंद होईल की नाही, या अस्सल खादाडाना खाऊ घालण्याइतके फराळाचे पदार्थ तयार करतांना ती खुषीत येईल की रुसेल आणि रागावेल, इत्यादि शकानी मी मनांतल्या मनात खर म्हणजे अस्वस्थ झालों होतों. पण बाळू आणि राजा हे माझे दोन जिवलग लंगोटीयार होते. ते भेटल्यामुळें मला फार आनंद खरोखरच झाला होता. आणि शिवाय ज्यानं नुकताच ससार माडला आहे अशा तरुण पुरुषाला आपल्या नव्या सुखाचं प्रदर्शन करण्याची जी इच्छा असते, ती या क्षणी मला ढोशीत होती. इतर चारचौघा पुरुषाची जशी लग्नं होतात तस माझं लग्न झाल असत तरीदेखील मला वाटलं असतं की या दोघां जुन्या दोस्तापुढे आपल्या ससारसुखाच प्रदर्शन करावं आणि त्यांच कौतुक आणि शाबासकी मिळवावी. मग माझ लग्न तर काय, तें सामान्यांतलं नव्हतं. दहा कटकटी आणि अडथळे ओलांडून मी आणि ललिता विवाहबद्ध झालो होतो. लोकानी भाकीत केल होतं, " चार महिन्यात मोडेल लग्न यांच. नटीचा नवरेपणा टिकविणं म्हणजे सोपी गोष्ट नाही "....

एखादा माणूस प्रेमांत सांपडला आणि लग्न करायला निघाला कीं कोठून कोण जाणे, एकदम हितचिंतक उपटतात आणि ते त्याला समजुतीच्या गोष्टी सागूं लागतात. जिच्या प्रेमांत माणूस सांपडतो ती सामान्य मुलींहून जरा वेगळी असली म्हणजे तर कांही विचारूंच नका. जो तो उपदेश करूं लागतो, " बघ बाबा. पुरता विचार करूनच पाऊल टाकलेलं बरं. घाईंत लग्न केलं की सावकाशीनं पश्चात्ताप करायची वेळ येण्याचाच फार संभव असतो.... '' ललिता तर नटी होती. नायिकेची कामं करणारी मोठी नटी नव्हे, पण छोटी दुय्यम कामं करणारी. पण मोठी असो, छोटी असो, नटी म्हटली कीं ती नटीच ना ? माझ्या भोंवतालच्या लोकांनीं उपदेशामृताचे डोसामागून डोस मला फुकट पाजले. ते म्हणत, " तिच्यावर तुझं प्रेम बसलं आहे असं आज वाटतं आहे तुला. पण चार दिवसांत उडेल तुझं प्रेम. आणि

तिचं तर त्याच्याहि आधीं उडेल. मग लागाल एकमेकांवर धुसफुसायला अन् भांडायला. सिनेमांतल्या या नटचा ख्यालीखुशालीला चटावलेल्या असतात. तिची चैन तूं चालवशील तोंवर ती राहील गोडीगुलाबीत. पण तूं काय असा हजार बाराशे रुपये मिळविणारा बडा अंमलदार पडला आहेस? किती दिवस पुरवूं शकशील तूं तिची चैनीची हौस? नटीला बायको म्हणून संभाळणं फार कठीण आहे महाराज ...."

अशा उपदेशामृताचे फवारे 'डी. डी. टी.' च्या फवाऱ्यासारखे अष्टौप्रहर माझ्यावर मित्रमंडळींनी उडविले ! माझं प्रेम कच्चं असतं तर त्याचे जंतू या माऱ्यामुळें केव्हांच गारद झाले असते. परंतु मी आणि ललिता दोघंहि एकमेकांच्या प्रेमांत पक्कीच पडलों होतों. तिच्यासारखी दुसरी स्त्री जगांत सांपडायची नाहीं असं मला वाटत होतं. माझ्यासारखा पुरुष मिळायचा नाही असं तिला वाटत होतं. ती नटी होती म्हणून ती मला थोडीच आवडली होती? तिच्यावरील माझ्या प्रेमाचा आणि तिच्या नटीपणाचा फार थोडा संबंध होता. तिचं बोलणं, चालणं, माणसं पारखण्याचं व पारखून त्यांच्याशी वागण्याचं तिचं चातुर्य, तिचा विचारी स्वभाव, इत्यादि तिचे गुण मला आवडले होते. आणि माझ्या अंगच्या लहान सहान गुणांचं ती कौतुक करी त्यामुळें मी तिच्याकडे अधिकच आकर्षित झालों होतों. मला वाटतं, पुरुषाचा काय किंवा स्त्रीचा काय, अहंकार हा मोठा गुण आहे. त्या अहंकाराची वाढ करणारं माणूस भेटलं की स्त्री–पुरुष प्रेमांत पडतात. ललितेच मी कौतुक करीत होतों; ती माझं करीत होती. आम्ही दोघं एकमेकांवर अधिकाधिक फिदा होत गेलों....ती माझ्या नादीं लागली असं मला जों जों अधिक वाटूं लागलं तों तों मी तिच्या पुरताच नादीं लागलों.

मात्र एकमेकाचं प्रेम जरी आम्ही दोघं ओळखून होतों तरी तिला लग्नाबद्दल विचारण्याचा धीर मला किती दिवस तरी झाला नव्हता. आडून आडून बोलून तिच्या मनाचा अंदाज घेण्याचा प्रयत्न मी करी, परंतु तिच्या उत्तरांनीं माझ्या मनाची खात्री होत नसे. उलट मला वाटे, तिच्या मनांत काय आहे कुणास ठाऊक? सरळ प्रश्नाचा हल्ला चढविण्याचा धीर मला होत नसे. रात्रीं अंथरुणांत पडून विचार करतांना मी स्वतःला म्हणे, 'बेट्या, तूं असाच राहणार संशयांत. एक दिवस दुसरा कुणी तरी पुरुष

तुझ्या ललितेला पटकावून नेईल, अन् मग बसशील ओरडत ! ' या विचित्र अवस्थेंतून मी स्वत:ची सुटका करून घेईन असं लक्षण कांहीं मला दिसेना. ज्या वेळेस माझी सुटका झाली त्या वेळेस माझा मीच आश्चर्यचकित झालों. ललिता माझी झाली हें मला क्षणभर खरंच वाटेना. जें घडलं तें अकस्मात् घडलं !

तिला इतकं काम असे कीं तिची माझी निवान्त भेट क्वचित् होई. एका मैत्रिणीच्या खोलीत ती रहात असे, त्यामुळें तिच्या खोलीवर गेलं की पंचवीस टक्के भाषण करावं लागे तिच्या त्या मैत्रिणीशीं, पन्नास टक्के त्या मैत्रिणीच्या भोचक मावशीशीं, आणि उरलेले जेमतेम पंचवीस टक्के ललितेच्या आणि माझ्या वांट्याला येत असत ! ती माझ्या खोलीवर क्वचित् येई आणि आली तरी बहुधा तिच्याबरोबर ती मैत्रीण बया असेच. प्रेमाच्या गुजगोष्टी बोलण्याची सोय नसे, आणि त्या बोलतां येत नाहींत म्हणून ललितेवर रागावण्याचीहि सोय नसे. माझा कोंडमारा होत असे. मग गांवांतल्या गांवांत तिला पत्रं लिहायचीं एवढंच माझ्या हातांत असे. पण एके दिवशी अगदी अचानक ललिता माझ्याकडे आली.

मी नुकताच उठलों होतों. दाढी केली नव्हती, तोंड धुतलं नव्हतं. मळकट कपड्यांतच होतों. तिला पाहिल्याबरोबर मीं म्हटलं, " हें काय ? सकाळीं सूर्यामागोमाग चंद्र कुठें उगवला ? "

ती खुदकन् हंसली. मी दार लोटलं. " कवि केव्हांपासून झालास रे ? " असं म्हणून तिनं मला हळूच चापट मारल्यासारखं केलं.

मीं तिला म्हटलं, " तूं जरा बसतेस काय ? मी न्हाणीघरांत जाऊन येतों. आगदी ओंगळ दिसत असेन मी, नाहीं का ? " वाढलेल्या दाढीच्या खुंटांवरून मीं हात खसखसा चोळला.

ती म्हणाली, " ओंगळ म्हणजे काय ? "

" घाणेरडा ! "

" म्हणजे काय ? "

" तुझं नाक ! थोडा वेळ बस इथें. मी दाढी करतों, तोंड धुतों. पांचच मिनिटं. "

" अहं !" असं म्हणून तिनं मला आपल्या जवळ ओढलं.

" अग, अग ! जरा सोड " असं म्हणत मी ओढ घेतली आणि उभाच राहिलों. " अशा अवस्थेंत तुझ्या तोंडाला तोंड द्यायची शरम वाटते मला."

ती म्हणाली, " तोंडाला तोंड द्यायला कुणी सांगितलं आहे तुला ? " माझ्याच शब्दावर तिनं केलेली ती कोटी ऐकून मी मोठ्यांदा हंसलो, आणि तीही हसली. " नुसता बस इथें माझ्याजवळ. एका कंपनीशी नवा करार करायचा आहे त्याबद्दल तुझा सल्ला घ्यायचा आहे मला. घाईंत आहे मी. वेळ नाहीं मला.–"

" अग, पण पांच मिनिटांत दाढी आटपून येतों सोड."

" छे ! पांच मिनिटंसुद्धां मोलाची आहेत. बैस." माझ्या हाताशीं तिनं ओढ घेतली.

" अग पण मी घाणेरडा नाही का दिसत ? "

" घाणेरडा ? कुणीं सांगितलं तुला ?"

मी जवळच्या आरशांत तोंड पाह्यसाठीं वाकू लागलों.

ती म्हणाली, " त्या आरशांत नको पाहूंस."

" दुसरा आरसा आहे कुठें माझ्या खोलींत ? "

" अहा रे आंधळ्या ! तुझ्यापुढेच दुसरा आरसा आहे. दिसत नाहीं तुला ? " तिनं आपल्या डोळ्यांवर बोटं ठेवली आणि म्हटलं " बघ ! या आरशांत बघ ! म्हणजे तुला कळेल तुझा चेहरा किती सुदर दिसतो आहे तो."

" होय ? " असा उद्‍गार मीं काढला. मी हंसलो. ती हंसली. त्या बरोबर मी चटकन् वाकून दोन्ही हातांच्या मिठींत तिला धरलं आणि बिचारलं, " ललिता, माझ्याशीं लग्न करशील का ?"

ती हंसली, तिनं डोळे क्षणभर मिटले, पुन्हा उघडले. ती म्हणाली, " पुन्हां विचार."

" माझी होशील का ? "

तिनं मान हालविली आणि हनुवटी उचलून तोंड वर केलं.

अशा प्रकारें माझ्या ध्यानीं मनींहि नसतांना मीं ललितेला लग्नाबद्दल विचारलं.

आम्हीं दोघं एकमेकांच्या प्रेमांत इतकीं सांपडलों होतों कीं हितचिंतकांच्या

इशाऱ्यांचा आमच्यावर परिणाम होईल हें कसं शक्य होतं ? आम्ही लग्न करून मोकळे झालों होतों. आम्ही लग्नानिमित्त थाटाची मेजवानी दिली. ज्यांनी इशारे दिले होते ते मेजवानीला आले. हात मारून गेले. आमचं दोघांचं पटणार नाहीं, लवकरच आम्हीं विभक्त होऊं अशीं भाकितं हे लोक करीत तीं आमच्या कानावर येत. हीं भाकित करणारे आमच्याकडे येऊन चहापाणी व्यवस्थित झोडून जात. आमच्या दोघांच्या प्रेमाचा पुरावा पाहून मनांतल्या मनांत ते खट्टू होत. त्यांना वाटे – अजून यांचं फाटलं नाही, आश्चर्य आहे. आमच्या मागं ते बडबडत, 'अहो लग्न टिकेल टिकेल म्हणजे किती दिवस टिकेल ?'

त्यांच्या या बडबडीचा 'रिपोर्ट' ऐकला की आमची करमणूक होत असे. कारण मी आणि ललिता खरोखरच आनंदांत होतों. आमचं एकमेकांवरचं प्रेम अगदी शाबूत होतं. याचा अर्थ आमची भांडण होत नसत असा नव्हे. मला तर असं वाटतं की जी माणसं नवरा–बायको म्हणून सतत एकत्र राहून कधी भांडत नाहीत तीं माणसच नव्हेत ! भांडणावाचून प्रेमाचा संसार शक्यच नाही. भाडणावाचून त्याला खमंग चव नाहीं.

माझं आणि ललिताचं भाडण निघत असे तें एका ठराविक कारणावरून. ललितेला टापटिपीची आणि व्यवस्थेची आवड होती; त्या दोन्ही गोष्टी कशाशी खातात तें मला माहीत नव्हत ! मी कचेरींतून परत आलों कीं पायांतले बूट पायमोजे, अंगातले कपडे, गळ्यातला टाय कुठे काढून ठेवीन त्याचा नियम नसे. कोटाचे खिसे रिकामे करून पैसे, फौटनपेन, किल्ल्या, वगैरे वस्तू कुठें टाकीन त्याचा नियम नसे. मी ऑफिसांत जायला निघालों कीं ललितेनं विचारावं 'आगगाडीचा पास घेतला आहेस ना ?' मीं म्हणावं, 'हो खरंच !' आणि कोटाच्या दोन्ही खिशांत हात घालून पाहवं तों त्यांत तो नसावा. मग पास शोधून काढण्याची एकच धांदल उडावी. ललितेनं रागावून म्हणावं, 'तुझ्या पासाचा गोंधळ रोजचा ठरलेला आहे. ठराविक जागीं कां ठेवीत नाहींस रे ?' 'मी ठराविक जागींच ठेवतों. पण तू तो तिथें टिकूं देत नाहींस !' तिनं स्वर चढवून रागानं विचारावं, 'मी ?' मीं म्हणावं 'हो. तूं ! तुझं टापटिपीचं बंड आहे ना.' माझं हें बोलणं चक्क अन्यायाचं असे हें मला कळत असे. पण मी खुशाल तसं बोलत असे.

यावर ललिता रागानं लाल होऊन म्हणे, "तुझ्या वस्तू मी नीट उचलून ठेवतें म्हणून पास सांपडतो तरी!" मी म्हणे, "मुळींच नाहीं." ती म्हणे, "बरं बरं. उद्यांपासून तुझ्या वस्तूला हात नाहीं लावायची. मग बसशील दिवसभर शोधीत! किल्ल्या कुठें आहेत, पास कुठें आहे, फाऊन्टन कुठें आहे म्हणून हांका मारीत सुटलास तर मात्र खबरदार!"

परंतु मी माझ्या वस्तू फेकायच्या तशा फेकीच, त्याचप्रमाणें ललिता त्या उचलून ठेवायच्या त्या ठेवीच, आणि काही सापडेनासं झालं कीं "ललिता!—" म्हणून मी हांक मारीच. ती चिडून मला विचारी, "तुझी अव्यवस्थितपणाची सवय जायची कधी रे!" ती घालविण्याच मी तिच्याजवळ कबूल करीत असे. परंतु मला तें कांहीं केल्या जमत नसे. माझ्या स्वत च्या वस्तू तर मी घरभर वाटेल तिकडे टाकीत असेच, पण तिच्याही वस्तू घेतल्या कीं कुठे ठेवीन त्याचा नियम नसे. माझा कगवा आणि ब्रश हवा तेव्हा मला कधीच सांपडत नसे. मग मी तिचा कगवा घ्यावा. तिला तो लागला की सांपडू नये. तिनं आंतून ओरडावं "शाम! माझा कंगवा?" मी चापून खोटं सांगावं, "मी नाही घेतला." हा प्रकार बंद व्हावा म्हणून तिन एकदा रागावून एक डझन कंगवे बाजारांतून आणले आणि ते माझ्या टेबलावर ठेवून मला बजावलं, "आतां पुन्हां माझ्या कंगव्याला हात लावशील तर खबरदार!" परतु बारा कंगवे हरवायला मला कांही बारा दिवस लागले नाहीत, आणि दुसऱ्या दिवशी आंतल्या खोलीतून "शाम! अरे बाबा, माझा कगवा घेतला आहेस का?" अशी ललितेची चिडलेली ललकारी मला ऐकूं आलीच.

पेटी, तबला, व्हायोलीन यापैकीं एकही वाद्य मला धड वाजवितां येत नसे. पण लहर आली कीं त्यांवर मी खुशाल हात टाकी, आणि तीं जागच्या जागीं उचलून ठेवण्याचं माझ्या कधींच लक्षांत राहात नसे. मी फोनोग्राफ काढून बसलों की साऱ्या रेकॉर्डस् इकडे तिकडे पसरून ठेवी. निकामी पिना यंत्रांत टाकण्याऐवजीं सतरंजीवर टाकून देत असे. मी ओढलेल्या सिगरेटचीं थोटकं तर कुठें सांपडतील त्याचा नियम नसे. एकदां जेवतांना बटाटयाच्या भाजींत एक थोटुक मला सांपडलं! एखादा केस सांपडला असता तर मीं खचित आकांडतांडव केलं असतं. पण सिगरेटचं

थोटूक सांपडल्यावर बोलतो काय ? ब्रेड कापण्यासाठीं ललिता स्वयंपाकघरांत गेली. तेवढी संधि साधून मी तें थोटूक खिडकीबाहेर टाकलं आणि साळसूद चेहरा करून बसलों. माझा रेल्वेचा पास देखील एखादे दिवशीं भाजींत सांपडला असता तर मला आश्चर्य वाटलं नसतं ! माझी अव्यवस्थितपणाची संवय टाकायची म्हटली तर मला टाकतां आली नसती असं नव्हे. ती टाकावीशी मला वाटत नव्हतं हेंच खरं. 'अव्यवस्थितपणा हा माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे – ज्यानं लग्नाची बायको घरांत आणली त्याचा तर आहेच !' अशी माझी समजूत होती. टापटीप शिकण्याचा माझा मुळीच बेत नव्हता. अव्यवस्थितपणा खपवून घेण्याचा ललितेचा बेत नव्हता. त्यामुळें कशावरून ना कशावरून तरी आमच्यांत रोज खटके उडत, भाडणं होत, समेट होत, समेटानतर प्रेमाची भरती येऊन जे गोडीगुलाबीचे प्रेमप्रकार व्हायचे ते होत, आणि दुसऱ्या दिवशीं कशावरून तरी पुन्हां भांडण निघत असे....

पण मी आणि ललिता फार सुखांत होतों खास ! आणि बाळू परांजप्यानं जेव्हां गोड गोड बोलून मला हरभऱ्याच्या झाडावर चढविलं तेव्हां सहाजिकच मला जोराची इच्छा झाली कीं ग्वाल्हेरच्या माझ्या या जुन्या दोस्तांना घरीं न्यावं, माझी ललिता किती सुदर आहे तें दाखवाव, माझ्या संसारसुखाचं प्रदर्शन करावं. मनांतल्या मनात अनेक शका येत होत्या मला. त्यांतली एक अशी की ललिता घरी असेल कीं कामासाठीं स्टुडिओंत गेली असेल ? आणि याहूनही अधिक महत्त्वाची दुसरी शंका अशी कीं दोन खादाड मित्रांना घेऊन मी अकस्मात् तिच्याकडे 'दत्त' म्हणून उभा राहिलों तर तिला तें आवडेल कीं नाही ? माझ्या मित्रांशीं ती फार चांगलं वागे आणि त्यांना चांगले चागले पदार्थ करून खाऊं घालण्याची हौसही ती दाखवी. परंतु ती मला नेहमी बजावी की वेळ ठरवून आणीत जा मित्रांना. त्यांना घेऊन अवचित येत जाऊं नकोस. असा आलास की माझी फार धांदल उडते.... या शंकांनी मी मनांतल्या मनात डरलोंच होतों. पण बाळूला आणि राजाला माझी डर मीं दाखवली नाहीं. आमचं बोलणं चालू होतं तेवढ्यांत दोन लोकलगाड्या माणसाच्या झुंडी पोटांत भरून घेऊन निघून गेल्या होत्या. आतां तिसरी येऊन थडकली होती. मीं धांवत जाऊन दोन तिकिटं काढून

आलों आणि माझ्या मित्रांचे हात ओढीत म्हटलं, " चला ! आमच्या घरीं जाऊं या. "

—घरी जाऊन थडकतों तों दाराला कुलुप !

राजा म्हणाला, " हात्तिच्या ! हें रे काय शामू ? तुझ्या राणीसाहेब घरांत नाहींत असं दिसतं आहे. त्याना पाह्यची फार इच्छा होती आमची. "

" तुमच्या नशिबांत असलं तर तुमची इच्छा पूर्ण होईलही. तुम्ही आहांत तोंवर ललिता बहुधा परत येईल. नच आली तर तिचे फोटो दाखवीन तुम्हांला. " एकीकडे हसत हंसत बोलतांना मी सारे खिसे चाचपून पाहत होतों. कुलपाची किल्ली सांपडत नव्हती मला ! ....आतां किल्ली सापडली नाही तर माझा चांगलाच फजितवाडा होणार या कल्पनेनं मी चांगलाच गागरून गेलों. माझ्या अव्यवस्थितपणाचा अगदीं तीव्र पश्चाताप त्या अर्ध्या क्षणांत मला झाला. ' आतां उद्यांपासून जिथली वस्तू तिथें ठेवायची ' अशी मनाशी गंभीर शपथसुद्धां मी घेतली....

सांपडली एकदांची किल्ली ! ज्या खिशांत चार वेळां पाहून 'नाहीं' असं ठरविलं होतं त्याच खिशांत ! माझ्या वस्तूंचे असे चमत्कार वारंवार होत असत....

कुलुप काढलं, दाराला लाथ मारली, आणि दोस्तांना म्हटलं, ' या. '

बाळू आणि राजा आंत आले, आणि चाट पडल्यासारखे उभे राहिले. बाळू म्हणाला, " किती सुंदर आहे रे तुझी खोली ! " राजा म्हणाला, " आणि टापटीप कशी कमालीची ! " मी देखील क्षणभर चाट झालों. खोली कशी आरशासारखी दिसत होती. कोचावर आणि खुर्च्यांवर चिटाचे नवे अभ्रे चढविले होते. बैठ्या टेबलावर फुलदाणीत ताजी फुलं घातलीं होती. कोपऱ्यातल्या टेबलावर मासिकांची चवड होती. माझ्या टेबलावर नवं कव्हर घातलेलं होतं. खालच्या सतरंजीला एकदेखील सुरकुती नव्हती. बाळू आणि राजा दोघेही म्हणाले, " घर असावं तर असं. " मी त्यांना बसविलं आणि भिंतीला लावलेले ललितेचे फोटो तर दाखविलेच, पण शिवाय तिच्या फोटोंचं जाड अल्बमही त्यांच्या हातीं दिलं. ललिता घरांत नाही हें एक प्रकारें बरं झालं, दोन खादाड मित्रांना मीं अवचित आणल्याबद्दल तिचा राग आतां मला बघावा लागणार नाहीं, असं माझ्या

मनांत येत होतं. परंतु त्याबरोबरच मी एका फिकीरीतही पडलों होतों. ललिता घरांत नाही. मग ग्वाल्हेरच्या या दोन खादाडांना खायला काय देऊं मी ? बाजारातून कांही आणीन म्हटलं तर पहिलं हॉटेल माझ्या घरापासून मैलभर लांब होतं. कांहीं करून देईन म्हटलं तर त्या विद्येच्या नांवानं ठणठणाटच होता माझ्याजवळ ! साधं आम्‌लेटदेखील मला कधीं करता आलं नव्हतं ! कधी काळी मी चहा केला की फुळकवणी तरी होत असे किंवा कडू काढा तरी होत असे....भलत्याच फिकीरींत पडलों मी....पण मनाशी विचार केला, सैंपाकघरांतल्या कपाटांत कांही सांपडतं का पाहूं या....एखादे वेळेस....

सैंपाकघरात जाऊन कपाट उघडलं. आणि आनंदानं उडीच मारली मी! जमीन दिसल्याबरोबर कोलंबसालादेखील एवढा हर्ष झाला नसेल ! शिरा, पुऱ्या, बटाट्याची भाजी, चकल्या ! कपाट गच्च भरलं होतं !

भराभरा प्लेटी काढल्या, भरल्या, टेबलावर मांडल्या, आणि बाहेर जाऊन बाळू – राजांना म्हटलं, " चला दोस्त, थोडा फराळ करा ! "

ते दोघे साऱ्या मुलखाचे खादाड ! साऱ्या पुऱ्या आणि चकल्या त्यांनीं फस्त केल्या. शिऱ्याचं आणि भाजीचं भांडं चाटून पुसून टाकलं ! पण ललितेची आणि माझ्या संसारसुखाची त्यांनीं पुनःपुन्हां तोंडभर प्रशंसा केली ती ऐकून मी इतका खूष झालों होतों कीं फराळाची एवढी तयारी ललितेनं कशासाठी केली होती याचाही विचार माझ्या मनाला शिवला नाही, आणि माझ्या दोस्तांनी बकासुराप्रमाणें साऱ्या पदार्थांचा फन्ना उडविला यांतलं सकटही मला कळलं नाही.

फराळ आटपल्यावर भांडीं–बशांनीं गजबजलेल टेबल तसंच टाकून आमच्या तिघांच्या स्वाऱ्या पुढच्या खोलींत आल्या. आमचं धूम्रपान जोरांत सुरू झालं. गिगरेटचीं थोटकं सतरंजीवर चुरगळलीं जाऊं लागलीं. राख ठिकठिकाणी सांडूं लागली. पानांचा डबा निघाला. विड्याच्या पानांचीं डेखं इकडे तिकडे पडलीं. चुन्याचीं बोटं सतरंजीला पुसलीं गेलीं. माझी आणि माझ्या बायकोची तारीफ ते दोघे सारखे करीतच होते. मी खुषीत होतों.

बाळू म्हणाला, " राजा, ग्वाल्हेरला आपण तिघे एकत्र जमलों कीं गाण्याची मैफल झडायची, नाहीं रे ? कांहीं गा कीं लेका. "

राजा आढेवेढे घेणारा गवई थोडाच होता ? त्यानं घसा खाकरला आणि मला विचारलं, " साथीला कांहीं आहे का ? "

" साथीला ? अरे आपल्या घरी काय कमी आहे ? " – मीं छाती फुगवून अभिमानानं म्हटल, आणि आंतल्या खोलीत जाऊन पलंगाखालची पेटी, तबला, व्हायोलीन काढून बाहेर आणलीं.

बाळूनं पेटी ओढून घेतली. मी व्हायोलीनवर दाडी मारली. राजानं तबल्यावर थाप मारून डग्गा घुमवून पाहिला. राजाची मैफल सुरू झाली !

ती किती वेळ चालली होती कुणास ठाऊक ?

पण मनगटावरच्या घड्याळाकडे पाहून बाळू एकदम ओरडला, " राजा, रात्रीच्या गाडीन आपल्याला जायचंय ! त्याच्या आधीं दादरला जाऊन देशपांड्यांना भेटायचं आहे. बाजार करायचा आहे –"

राजानं आपल्या घड्याळांत पाहिल आणि म्हटलं, " बाप रे ! इतका उशीर झाला ! कल्पना नाही अ. "

त्या दोघांनी उठून घाईनं कपडे घातले आणि माझा निरोप घेतला. जातांना ते म्हणाले, " तुझ्या बायकोची भेट झाली नाही. पण तिला आमचे दोघांचे नमस्कार सांग. आणखी म्हणावं, फार आनंद झाला आम्हांला तुझा संसार पाहून. आम्ही कांहीं विपरीतच ऐकल होत. पण तुझं घर किती छान आहे, आणि किती सुखांत आहेस तूं ! आतां तूं ललितेला घेऊन ग्वाल्हेरला यायला हवंस.... " त्यांचं तें बोलणं ऐकून मला अगदों धन्य वाटलं ....

ते दोघे गेल्यावर मी कोचावर बसलों आणि सिगरेट पेटवली.

इतका वेळ दोस्तांच्या संगतींत माझ्या मनातला जो एक विचार खालच्या कप्प्यांत पडला होता तो आतां एकदम वर आला .... सैंपाकघरांतलं फडताळ फराळाच्या पदार्थांनीं भरलं होतं हें कसं काय ? तें भरलं होतं म्हणूनच माझी लाज राखली गेली होती, माझ्या दोस्तांनीं ललितेची आणि माझ्या संसारसुखाची तारीफ केली होती हें खरं. परंतु द्रौपदीची थाळी भरलेली असावी याप्रमाणें कपाट शिरा–पुरी–भाजी–चकल्यांनी भरलेलं कसं होतं ? असं सहसा घडत नसे....मी मनाशीं आश्चर्य करीत राहिलों.

एखादं पुस्तक वाचावं म्हणून तें घेण्यासाठीं टेबलापाशीं गेलों. पाहतों

तों कांचेच्या दडपणाखाली पुस्तकावरच माझ्या नांवाचं एक पत्र होतं. पाकिटावरच अक्षर पाहिल तो तें ललितेचं होतं. पाकिटांतली चिठ्ठी काढली आणि वाचली –

"शाम ! आज मी स्टुडिओंत खरं म्हणजे जाणार नव्हतें म्हणून तुला कांही बोललें नाही. पण स्टूडिओची गाडी आली आहे. म्हणून जात आहे. तूं कदाचित् माझ्या आधी घरीं येशील म्हणून हें पत्र तुला ठेवीत आहे. आधी घरी आलास तर एक मेहेरबानी कर.

कपाटांत शिरा, पुरी वगैरे करून ठेवलं आहे. त्यांतलं तुला हवं तेवढं घेऊन खा. पण टेबलावर बसून मात्र खाऊं नकोस. टेबलावर मी नवी चादर घातली आहे. तिच्यावर डाग पाडू नकोस. बशा इकडे तिकडे टाकू नकोस !

पुढच्या खोलीत बसलास तर सिगरेटची थोटकं सतरंजीवर टाकूं नकोस ! जिथली वस्तू तिथे राहूं दे. मी सारी व्यवस्था लावून आणि बैठक सजवून ठेवली आहे. त्यात बिघाड होईल असं काही करूं नकोस.

माझ्या नव्या पिक्चरचे डायरेक्टर, त्यांची बायको, त्यांची मेव्हणी अशी सध्याकाळी चहाला यायची आहेत. स्टूडिओंत कितीहि काम असलं तरी ती मडळी येण्याच्या आत मी परत येईनच. फराळाचे सारे पदार्थ तयार करून मी कपाटांत ठेवले आहेतच. कपबशांचा सेटही काढून चक्क पुसून ठेवला आहे. त्यांतला कप तू वापरू नकोस. पाहुणेमंडळी आली की त्यांना घर कसं आरशासारखं स्वच्छ दिसलं पाहिजे. साऱ्या व्यवस्थेवर तीं खूष झाली पाहिजेत.

मी जातें आहे खरी. परंतु मला धास्ती वाटत आहे कीं तूं कदाचित् आधीं येशील आणि आलास की माझ्या व्यवस्थेची अव्यवस्था करून टाकशील ! मेहेरबानी कर. कांही घोटाळा करूं ककोस.

शाम ! लाडक्या ! या वेळेस एवढं माझं ऐकलंस तर तुला मोठ्ठं बक्षीस देईन. कोणतं तें सांगायला का हवं ? तें तुला हवं असेल तर आपल्या नेहमीच्या अव्यवस्थितपणाला जरा पायबंद घाल. पाहुण्याना घर आरशा-सारखं दिसलं पाहिजे ! लक्षांत ठेव !

घाईंतसुद्धां तुझीच
ललिता"

त्या पत्राच्या कागदासकट मी हात डोक्यावर मारला आणि सुन्न होऊन उभा राहिलों !

मी आपल्या ग्वाल्हेरकर दोस्तांना घेऊन आलों तेव्हां सारं घर नेहमींपेक्षांही अधिक टापटिपीत आणि आरशासारखं स्वच्छ कां होतं, आणि सैंपाकघरातल्या कपाटात फराळाच्या पदार्थांनी भांडी का भरलेलीं होतीं, या रहस्याचा आता उलगडा झाला होता. पण मी केवढा घोटाळा करून ठेवला होता तेंहि माझ्या लक्षांत पुरतं आलं होतं. माझ्या दोस्तांची प्रशंसा मी मिळविली होती – पण ती फारच जबरदस्त किंमत देऊन ! आतां ललिता घरी आली की संतापानं तिनं मला लाटण घेऊन बडविलं तरी तिची चूक म्हणतां येणार नव्हती मला. फराळाचं सारं सामान खलास झालं होतं ! टेबलावरच्या सुंदर चादरीवर कोंबड्या नाचल्याप्रमाणे डाग पडले होते ! भांडीं, प्लेटी, कपबशा टेबलावर पडल्या होत्या. पुढच्या बैठकीच्या खोलीला तर वेटिंगरूमची अवकळा आली होती. ललिताचे पाहुणे आले तर त्यांना घर आरशासारखं स्वच्छ दिसणार कस ? सारी पुरी, भाजी, शिरा संपविल्यामुळें एका अर्थानं भांडी तेवढी स्वच्छ झाली होती !

मी केलेला हा घोटाळा निस्तरण्याच्या पलीकडचा होता ! माझ्या अव्यवस्थितपणाला चांगलीच कडू फळ येणार होती ! ....

डोकं धरून मी क्षणभर उभा राहिलों !

मग विचार केला, असं उभं राहून उपयोगी नाही.

धावत आत गेलों, झाडू घेतला, धांवत बाहेर आलों. व्हायोलीन, तबला पेटी उचलून आतल्या खोलीत नेऊन पलंगाखालीं ठेवली, आणि सतरंजीवर झाडू मारायला सुरुवात केली !

तितक्यांत दारावरची घंटा वाजली !

मला वाटलं, ललिताचे पाहुणेच तर नाहीं ना आले ?

माझं नशीब शिकंदर खरं ! पाहुणे नव्हते आले. ललिता आली होती....

माझ्या हातांतला झाडू पाहून तिनं विचारलं, " हें काय ? "

माझी चर्या कशी झाली होती तें मला न पाहतांही दिसत होतं. माझ्या तोंडून धड शब्दही उमटेना.

ललितेनं विचारलं, "काय, झालंय काय ? झाडू कशासाठीं घेतला आहेस हातांत ?"

मीं म्हटलं, "तें मग सागतों. आधीं मला हें सांग कीं तुझे पाहुणे फराळासाठीं यायला किती अवकाश आहे ?"

ती म्हणाली, "एक आठवडा !"

"आठवडा ? तूं तर चिठींत लिहिलं होतंस–"

"हो, आत्ता संध्याकाळीच ते येणार होते. पण मी स्टूडिओंत असतांना त्यांचा फोन आला मला. कांहीं कामासाठी त्याना एकदम दिल्लीला जावं लागलं आहे. आतां पुढच्या शनिवारीं येणार आहेत ते–"

माझ्या छातीवरचा धोंडा एकदम दूर झाला ! क्षणापूर्वीं भीतीनं माझी दांतखिळी बसली होती. आतां आनंदातिशयानं बसली.

ललिता म्हणाली, "असा काय पाहतो आहेस माझ्याकडे खुळ्यासारखा?"

तरी माझ्या तोंडून शब्द फुटेना !

ललिता पुटपुटली, "इतकं फराळाचं करून ठेवलं तें मात्र वाया गेलं !"

मीं एकदम म्हटलं, "नाही नाहीं. तूं फराळाचं करून ठेवलंस तें अगदीं सत्कारणीं लागलं !"

"म्हणजे काय ? सगळं एकट्यानं खाऊन टाकलंस कीं काय ?–"

एकटा काय खातों मी ? दहा वेळा बसलों असतों खायला तरी सरवितां आलं नसतं मला ! तिला उत्तर देण्याऐवजीं मी मोठ्यांदा खो खो करून हंसत सुटलों.

तिनं चिडून पण हंसत विचारलं, "अरे सांग ना."

मी हातांतला झाडू टाकला. तिला दोन्ही हातांच्या मिठींत घेतली. आणि पुन्हां हसू लागलों....

तिला अर्थातच कांहींच बोध होईना.

मी तिला म्हटलं, "ललिता, तो झाडू उचलून घेऊन तूं मला बडवावंस असा गुन्हा केला आहे मीं."

ती म्हणाली, "हें काय तुझं बोलणं रे ?"

मीं तिला ओढीत आंत नेली आणि टेबल दाखवून म्हटलं "हें पाहिलंस ?"

टेबलावरचा पसारा पाहिल्याबरोबर तिनं कपाळावर हात मारून घेतला! " शाम, आतां काय म्हणायचं तुला ? " एवढाच उद्‌गार तिच्या तोंडून बाहेर पडला. मग ती मला म्हणाली, " अरे, घर आरशासारखं स्वच्छ दिसायला हवं असं त्या चिठींत मी बजावून लिहिलं होतं ना ? काय, केलंस तरी काय ? कुणाला घेऊन आला होतास ? "

मीं म्हटलं " ग्वाल्हेरचे महाराज आले होते ! "

" म्हणजे काय ? "

मीं तिला पुन्हां मिठीत घेतली आणि खो खो करून हंसत सुटलों ! . . . .

## १५ . . . . . बिंबा देशमुख

त्या दिवशी शनिवार होता. रामची कचेरी लवकर सुटेल या कल्पनेनं मी त्याची चार वाजल्यापासून वाट पाहू लागलें. परतु सहा वाजले तरी तो येण्याचं लक्षण दिसेना. मग मात्र तो घरी आला की त्याच्यावर खूप रागावयाचं आणि कडाक्याच भाडण करायच असं मी मनाशी ठरवू लागले. आमच्या लग्नाला पुरते चार महिनेदेखील लोटले नव्हते, आमचीं उभयतांची प्रेमाचीं लाडकी बोलणी अजून ताजी होती. मी तुझ्यासाठी वाटेल तें करीन, तुझ्यावर माझ फार प्रेम आहे, असं मी रामला दिवसांतून अगणित वेळां सांगत होतें. वाटेल तें म्हणजे काय, तें मात्र राम विचारीत नव्हता. त्यानं विचारलं असत तर मला सांगता आल नसतं. तोही दिवसातून असंख्य वेळां मला म्हणत असे, "तू माझी फार लाडकी आहेस. तुझ्यासाठीं मी काय वाटेल तें करीन." परंतु आतांशा दर शनिवारी त्याला कचेरींतून यायला उशीर होई आणि माझ्या मनांत येई, आठवडयांतून एक दिवस माझ्यासाठी कचेरीतून घरी लवकर येणंसुद्धा याच्यानं होत नाही, आणि म्हणे तुझ्यासाठी वाटेल तें करीन ! नुसत्या शब्दाना काय चाटायचं आहे ? मी किती वाट पाह्यची त्याला काही सीमा ? हे पुरुष मारे तावातावानं सागतात, आम्ही कचेऱ्यात कामं उपसतों, बायका घरीं मजेंत राहतात, चैन आहे यांची, यांनी पुरुषाच्या नावान खडे कशासाठीं फोडायचे ? पण म्हणावं घरी तासन्‌तास वाट पहाण्याचे हाल काय असतात तें बघा एकदा ! अशा प्रकारें चार चार घटका घरी ताटकळत बसण्यापेक्षां कचेऱ्यांतलीं कामं करणं फार सुखाच .... आतां राम घरीं आला कीं त्याच्याशीं भांडण्याचा मला खचित अधिकार होता. "घरीं चार घटका उशीर होण्याचा हा आपला तिसरा शनिवार बरं काय महाराज !" असा सलामीचा बार काढून भांडण

कसं रंगवायचं त्यांचा मी मनांत विचार करूं लागलें ....

सात वाजतां बाहेरच्या दारावरची घंटी रामनं वाजविली. तोंपर्यंत माझी भांडणाची रंगीत तालीम व्यवस्थित पार पडली होती. दार उघडायचं अन् फणकाऱ्यानं आंतल्या खोलीत निघून जायचं, असा बेत मीं मनाशीं पक्का केला होता. परंतु एक गोष्ट मी हिशोबांत धरली नव्हती, आणि रामनं नक्की तीच केली. मी दार उघडल्याबरोबर त्यानं माझा हात चटकन् धरला आणि तो म्हणाला,

" सुशे ! "

" माझ्याशी नको बोलूंस " असं म्हणून मी हात सोडवून घेणार होतें. परंतु त्यानं माझा हात तर घट्ट धरला होताच, पण शिवाय दार लोटून घेऊन त्यानं माझं चुंबन घेतलं आणि तो म्हणाला,

" सुशे, फार आनंदाची बातमी आणली आहे. ओळख पाहूं. "

खरं म्हणजे मी चांगलीच विरघळून गेलें होतें. परंतु थोडासा रुसवा उसना आणून मीं म्हटलं,

" तुझी बातमी ना ? सांगतें कीं ! आज तुझं ऑफिस दोन वाजतां सुटायच्या ऐवजीं साडेसहा वाजतां सुटलं ! बरोबर आहे कीं नाहीं ? "

" चुकलीस, ऑफिस लवकर सुटलं. पण मीच मुद्दाम थांबलों. "

" बरोबर आहे. बायकोची आठवण तुला कशाला राहील ! "

" पुन्हां चुकलीस. बायकोची आठवण तर मला होतीच. पण शिवाय तिला दिलेल्या एका वचनाची देखील होती. तुला घेऊन थंड हवेच्या ठिकाणीं जायचा माझा बेत तुला मी सांगितला आहे की नाहीं ? "

" सांगितला आहेस कीं. आणखी जन्मभर नुसता सांगतच रहाणार आहेस तेंही मला माहीत आहे ! "

" तिसऱ्यांदा चुकलीस. उद्यांच्या उद्यां माझा बेत मी अंमलांत आणणार आहे. माझा रजेचा अर्ज मंजूर होऊन साहेबाची सही झालेली पाहिल्याशिवाय आज घरीं जायचं नाहीं, असा मीं मनाशीं निश्चय केला होता. म्हटलं, सात नाहीं आठ वाजले तरी चालतील, पण आज घरीं गेल्याबरोबर म्हणतां आलं पाहिजे ' सुशे ! उद्यां जायचं आपल्याला '– "

" खरं ? " मीं आनंदानं विचारलं आणि मग एकदम आठवण होऊन

मीं म्हटलं, " पण माझीं पातळं न् चोळया कुठें आल्या आहेत रे परटाकडून ? "

" तें बघतां येईल ग. उद्यां आपण निघायचं एवढं खरं. " त्यानं माझं पुन्हां चुंबन घेतलं. मीही परतफेड करून टाकली. त्यानं माझ्या कमरेभोवतीं हात टाकून मला आंतल्या खोलीकडे नेलं. माझ्या मनांतली भांडणाची रंगीत तालीम फुकट गेली. केव्हां निघायचं, कसं निघायचं, कुठें राह्यचं, किती दिवस राह्यचं याबद्दलचे बेत करण्यापुढे आम्हाला जेवण देखील धड सुचलं नाहीं.

आमचा प्रवास मजेचा झाला. थंड हवेंतले पहिले दोन दिवसही कसे आणि केव्हां निघून गेले कळल नाही. दोन दोन तीन तीन तास गर्द झाडीं-तून रपेट करावी, घरी यावं, खूप खावं, खूप निजावं, पुन्हा भटकावं, निसर्गाची शोभा पोटभर पहावी अशा कार्यक्रमांत दिवस केव्हां उगवत होता आणि रात्र केव्हा पडत होती तिकडे आमचं धड लक्ष देखील नव्हतं. सहल करतांना क्वचित् कोणी जुने मित्र भेटत. नव्या माणसांच्याही ओळखी होत. आमच्या रोजच्या वाटेवर 'योगाश्रम' अशी पाटी एके ठिकाणी होती. तिसऱ्या दिवशी राम म्हणाला,

" योगाश्रम म्हणजे काय भानगड आहे बघूं या तरी ! "

मीं म्हटलं, " बघूं या तरी काय ? ओळख पाळख नसतांना उगीच आंत शिरायचं ? "

तो म्हणाला, " अग, अशा थंड हवेच्या ठिकाणी शिष्टाचाराचीं बंधनं थोडी सैल होतात. आपण आंत गेलों आणि म्हटलं, संस्था पाह्यची आहे आम्हांला तर मालकांना आनंदच होईल. "

त्यानं मला रस्त्यावरून ओढून चढणीवरून योगाश्रमाच्या फाटकापर्यंत नेलं देखील. त्याची ही नेहमींची खोड होती. दुसऱ्याचं म्हणून ऐकायचं नाहीं, आपला हेका चालवायचा ! पण त्यामुळेंच मला तो फार आवडे.

रामचं म्हणणं खरंच ठरलं. आश्रमाच्या मालकांनीं आम्हाला सारे भाग दाखविले, आणि कोणत्या कल्पनेवर आश्रम चालविलेला होता तेंही सांगितलं. असाध्य ठरलेले रोगसुद्धां योगाभ्यासानं बरे करतां येतात, अशी मालकांची श्रद्धा होती, आणि रोगी माणसं खरोखरच आश्रमांतून बरीं

होऊन जातसुद्धां होतीं. आश्रमाचे चालक म्हणाले,

" बायकासुद्धां येऊन राहतात आणखी बऱ्या होऊन जातात."

मीं विचारलं, " होय ? सध्यां आश्रमांत आहेत कुणी बायका ? "

" एक बाई आहेत. "

" काय झाऊंय त्याना ? "

" त्यांचा मेंदू अशक्त झाला आहे. "

" बऱ्या होतील ? "

" का नाही होणार ? जरूर होतील. त्या पहिल्यांदां आश्रमांत आल्या तेव्हां त्यांची दशा फार वाईट होती. आतां किती हुशारी वाटते आहे त्याना ! उद्या आलात तर त्यांच्याशीं तुमचा परिचय करून देईन."

राम म्हणाला, " उद्यां कसं जमणार ? "

आश्रमाच्या चालकांनी विचारलं, " कां ? "

मीं खुलासा केला, " यांना रजा मिळाली आहे ती मोठी चमत्कारिक अटीवर. तीन दिवसानीं परत जाऊन कचेरीचं काम तीन दिवस करायचं आणि मग पुन्हा इकडे यायचं ही गोष्ट यांनी कबूल केली म्हणून तर रजा मिळाली. "

" असं होय ! परंतु हे नसले तर नसले. तुम्ही एकटचा या कीं ! अं ! "

" ठीक आहे. " म्हणून मी रामबरोबर परत निघालें. फाटकांतून बाहेर पडून उतरणीला लागतां लागतां मीं चालकांना विचारलं,

" त्या बाईचं नांव काय ? "

त्यांनीं सांगितलं, " बिबा देशमुख. "

तें नांव ऐकल्याबरोबर मी आश्चर्यानं इतकी दचकलें कीं माझ्या तोंडून एकदम उद्गार गेला " असं ! " माझा तो उद्गार ऐकून राम कांहीं विचारील किंवा आश्रमाचे चालक विचारतील अशी मला भीति वाटली. " बरं. उद्यां येईन मी. " असं सांगून मी चालकांचा निरोप घेतला, आणि रामला हातानं धरून उतरणीवरून रस्त्यापर्यंत ओढीतच नेलं.

वाटेनं चालतां चालतां रामशीं बोलण्यांत मी कसूर करीत नव्हतें. परंतु खरं म्हटलं तर माझं लक्ष त्या बोलण्याकडे नव्हतं. रात्री अंथरुणावर

पडल्या पडल्यादेखील माझ्या मनांत विचार येत होते ते बिंबा देशमुखबद्दलचे. पुन्हां पुन्हां मी मनाशीं उद्‌गार काढीत होते " बिंबा देशमुख ! आणि ती इकडे कुणीकडे ! या योगाश्रमांत कशासाठी !...." तिची ओळख करून घेण्यासाठीं येण्याचं मी आश्रमाच्या चालकांजवळ कबूल केलं होत. त्याना काय कल्पना की माझी आणि बिबाची नुसती ओळखच नव्हती तर अगदी दाट मैत्री होती, त्या मैत्रीचा फार चमत्कारिक रीतीनं शेवट झाला होता, आणि बिबाचं तोडदेखील पुन्हां न पहाण्याचा निश्चय करून मी दूर झालें होतें ! बिंबाचं नांव कळण्यापूर्वी तिला भेटायसाठी आश्रमात पुन्हा जाण्याचं मी कबूल केलं होत. परंतु आतां तिचं नांव कळल्यावर माझं मन द्विधा होऊं लागलं. एकदा वाटे जावं, बिंबाला भेटावं. पुन्हां वाटे, कशाला, जायचं ! भेटून काय करायचं !

रामला पोचविण्यासाठीं मी मोटार स्टॅन्डवर गेलें तेव्हां देखील मनांतले हे उलटसुलट विचार सपले नव्हते. रामची बस सुटली. मोटारीच्या अड्ड्यावरून बाहेर पडून मी मोठ्या रस्त्यावर आले, आणि मग मात्र मन म्हणाल, उजवीकडे वळायचं की डावीकडे ? हॉटेलांतल्या आपल्या खोलीवर जायचं की योगाश्रमांत ?....मी क्षणभर थबकले, घोंटाळलें, आणि मग मनाचा निर्णय होईना तेव्हा पावलांनीच निर्णय घेतला. मीं पाहिलं तों योगाश्रमाच्या वाटेन मी चाललें होतें.... बिबाला मी पुन्हा भेटणार होतें ही गोष्ट शहाणपणाची होती कीं वेडेपणाची तें मला अजूनही सांगतां येण्यासारख नव्हतं, आणि तरी देखील मी तिच्याकडे निघालें होतें खरी....

एकीकडे मी रस्त्यानं पावलं टाकीत होतें. दुसरीकडे बिबाच्या आणि माझ्या शेवटच्या भेटीचा प्रसंग मला आठवत होता. आणि त्या प्रसंगाच्या आठवणीचे हात धरून आणखी पूर्वीच्या आठवणी माझ्या मनांत येत होत्या. आतां योगाश्रमांत जाऊन मी चालकांना म्हणणार होतें, द्या माझी आणि बिंबा देशमुखची ओळख करून. परंतु खरं म्हणजे एक वेळ अशी होती कीं " जिथे सुशी तिथें बिंबा, आणि जिथें बिंबा तिथें सुशी " असं कॉलेजांतल्या आमच्या समवयस्क मैत्रिणींनीं संस्कृत सुभाषित चेष्टेनं रचलं होतं. आम्हां दोघीपैकी कुणी एक दुसरीवांचून एकटी लोकांना दिसली असं क्वचित् होत असे, आणि तसं झालं कीं लोक विचारीत, " हें काय ? आज जोडी फुटली

कशानं ? " बिबा किंवा मी जर चेष्टेनं सांगितलं, आमचं भांडण झालं, तर ऐकणारांना तें खरं वाटत नसे. ते म्हणत, " हॅं ! तुमचं दोघींचं भांडण होईल हें शक्यच नाही. "

आम्हा दोघींनाहि असंच वाटत होतं कीं, आमच्यांत भांडण तर राहोच परंतु मताचा बेबनाव देखील कधीहि व्हायचा नाही. आम्ही अगदी अशाच जिवाभावाच्या मैत्रिणी राहूं....

त्यामुळें एके दिवशी बिबा आणि मी एकमेकींना जरा वाकडं आणि कठोर बोललों तेव्हां मला जितकं आश्चर्य वाटलं त्याच्याहून अधिक वाईट वाटलं. बिबालाहि तसच वाटलं असल पाहिजे. कारण ती मला म्हणाली,

" किती ग वाईट वाईट बोललीस मला तू ? पुन्हा कधीं अस बोलूं नकोस बाई ! " तिनं माझ्या गळ्यात हात घातला आणि मला जवळ ओढलं.

मीं तिला म्हटलं, "अन् तू काय मला कमी वाईट बोललीस ग ? आणखी बोललीस त्याला निमित्त तरी किती क्षुल्लक ? "

ती म्हणाली, " आज तें क्षुल्लक दिसतंय, पण उद्यां तें क्षुल्लक राहणार नाही. "

" वाटेल ती शंका काय घेतेस माझ्याबद्दल ? "

" तू स्त्री आहेस. वयानं लहान आहेस. मनानं कोवळी आहेस. तुला गाण्याचं वेड आहे –"

" म्हणून काय झालं ? मला माझं बरं वाईट कळतं कीं ! "

" माणूस पागल झालं कीं त्याला बरं वाईट कळेनासं होतं ! "

" म्हणजे मी पागल आहे ? "

" आज नाहींस, पण व्हायला वेळ नाहीं लागायचा. " असं म्हणून बिबानं मला पुन्हा जवळ ओढून घेत म्हटलं, " पण आतां जाऊं दे तें भांडण. मला एक वचन दे म्हणजे झालं. "

" कसलं ? "

" त्याला पुन्हां भेटणार नाहीस असं. "

मीं तिला एकदम विचारलं, " इतका वाईट आहे तो ? "

ती म्हणाली, " मला नक्की सांगतां येत नाही. परंतु लोक त्याच्याविषयीं फार वाईट बोलतात. लोकांचीं सारीं बोलणीं खरीं नसतीलही, पण

मुळाशीं थोडं तरी सत्य असेलच. आपण संभाळून असावं हें चांगलं. विषाची परीक्षा कशाला पाह्यची ? म्हणून म्हणतें वचन दे – ”

मी चटकन् म्हटल, “ वचन नाही देणार. पण एवढं मात्र सांगतें कीं त्याची सगत मी टाळीन. ”

“ बघ ह ! ” बिबा म्हणाली. तिच्या त्या उद्‌गारांत असा ध्वनि होता की जणु जे मी करीन म्हणत होते ते माझ्या हातून घडेल असं तिला वाटत नव्हत.

पण मी मनाशी प्रामाणिक निश्चय केला, अरविंदची संगति टाळायची. त्याच्याविषयी मला विलक्षण आकर्षण वाटूं लागल होत. चित्रपटांतलीं त्याची प्लेबॅकची गाणी ऐकून मी त्याच्यावर फिदा झालें होतें. मला वाटत, माझ्या वयाच्या हजारों मुलीना तो आवडत असेल. त्याचं खरं सबंद नांव होतं अरविद बेदरकर ! परतु सिनेमातल्या नव्या फॅशनप्रमाणें त्यानं आपल्या आडनावाचा फक्त ‘ बी ’ या एका अक्षरांत संक्षेप केला होता, आणि चित्रपटाच्या दुनियेत बी. अरविंद म्हणून तो प्रसिद्ध होता. कित्येक दिवस त्याला प्रत्यक्ष न पहातां मी त्याच्यावर प्रेम केलं होतं. त्याची गाठभेट आणि ओळख मला फार हवीशी वाटली होती. आणि एका मैत्रिणीच्या घरीं तो जेव्हा मला अकस्मात् भेटला, तेव्हां मी अगदीं संपूर्णतः बावरूनच गेलें. त्यानं आपल्या गाडीत मला घरी पोचविलं, आणि अधिक परिचयाची इच्छा दर्शविली. तेव्हां तर मला वाटलं, मी हवेंतच तरंगतें आहे.

मी एकदां अरविंदबरोबर फिरायला म्हणून गेलें. आणि दुसऱ्या दिवशीं हिज मास्टर्स व्हॉईसच्या स्टूडिओंत त्याच्या गाण्याचं रेकॉर्डिंग होतं, तें ऐकण्यासाठीं त्याच्या आग्रहाखातर गेलें तेव्हा तिकडून परत यायला मला तीन तासांचा उशीर झाला.

बिबाचं आणि माझं पहिलं भांडण झालं तें या प्रसंगामुळें. मी तिला परोपरीन सागितल की रेकॉर्डिंग खरोखरच तीन तास चाललं होतं आणि तें ऐकण्याखेरीज मी दुसरं काहीं केलं नाहीं. परंतु ती माझ्यावर विश्वासच ठेवीना. नाही त्या शका घेऊं लागली. तिच्या बोलण्याचा मला फार राग आला . . . . आम्ही दोघी खूप भांडलों.

पण आमचं तें पहिलं भांडण शेवटचं ठरावं अशी माझी फार इच्छा होती. बिबावर माझं नुसतंच प्रेम नव्हतं; भक्ति होती. ती माझ्याहून तीन वर्षांनीं वडील होती. ती मला जें कांहीं सांगेल तें माझ्या बऱ्याकरतांच सांगेल याची मला खात्री होती .... म्हणून मी जरी तिला वचन दिलं नाही तरी मनातल्या मनात अगदी प्रामाणिक निश्चय केला कीं अरविंदची संगति वाढवायची नाही.

याच सुमारास अरविंद कामासाठीं गांवाला गेला. त्याची माझी गांठभेट झाल्यावांचून चांगले वीस दिवस गेले. मला वाटलं, माझा निश्चय पार पाडणं सोपं आहे.

पण अरविंद ज्या दिवशीं गांवाहून परत आला त्याच दिवशी त्यानं माझ्या निश्चयाची अगदी वावडी करून टाकली. मी घरी आलें तों माझी वाट बघत तो बसला होता. मला पहातांच तो जागेवरून उठला आणि म्हणाला, "तुला न्यायला आलों आहे. चल." माझ्या अंगांत प्रतिकार किंचित्‌देखील उरला नाही. मी त्याच्याबरोबर गेलें.

अर्थात् दुसऱ्या दिवशी माझं आणि बिबाचं पुन्हां एकदां जोराचं भांडण झालं.

आणि मी जों जों अरविंदच्या प्रेमांत सांपडून त्याच्या अधिक अधिक नादीं लागलें तों तों बिबाच्या आणि माझ्या भांडणांना फारच वाईट स्वरूप येऊं लागलं. ती अरविंदचं असं कांही काळंकुट्ट चित्र काढी कीं जणूं तो एक पाषाणहृदयी दुष्ट पशु होता ! मी त्याच्या कलेबद्दल बोलूं लागलें कीं बिबा म्हणे, "चुलींत घाल त्याचा गोड गळा आणि गाणं !" तिच्या असल्या बोलण्यानं मी चिडत असे; संतापत असे. कलावन्त या दृष्टीन अरविंदाचा मोठेपणा सिद्ध करण्याची गरजच नव्हती. परंतु त्याचा सज्जनपणा, प्रामाणिकपणा, एकनिष्ठा हे गुण ज्यायोगें सिद्ध होतील असं कांहींच मला सांगतां येत नसे. आणि त्याची मला चीड येई. त्या चिडीच्या भरांत मी बिबाला वाटेल तें बोलत असे. उलट ती मला म्हणे, "तूं मला कितीहि वाईट बोललीस तरी तुला या माणसापासून वांचविण्याचा माझा निश्चय ढळायचा नाही."

एकदां मी तिला संतापानं विचारलं, "एवढा तुझा काय अधिकार

माझ्यावर ? तूं कोण ? तूं कोण ? "

बिबा म्हणाली, " मी तुझी मैत्रीण ! वडील बहीण ! "

मी ओरडून म्हटलं, " नाही नाहीं ! तूं माझी वैरीण आहेस ! "

ती म्हणाली. " आज तुला असं वाटतय. परन्तु केव्हां तरी अशी वेळ येईल कीं माझे आभार मानशील तूं. "

" तुझे आभार ! " असं उपहासानं म्हणून मी मोठमोठ्यांदां हसूं लागलें.

माझे वडील आजारी पडले नसते तर नंतरच्या महिनाभरांत माझं आणि अरविंदचं लग्नच झाल असतं. परंतु बाबाची तब्येत एकाएकीं बिघडल्याची तार आली आणि मला गावीं जाव लागलं. गावी आल्यानंतर जवळ जवळ महिनाभर आमच्या घरांतली आम्ही सारीच माणस फार चिंतेंत होतों. एका महिन्यानतर बाबा थोडे बरे झाले. परन्तु त्यानी मला घरीं राह्यचा आग्रह केला. नंतर उन्हाळ्याच्या सुटीत कॉलेज बंद झालीं .... गांवी आल्यानंतर प्रथम कांही दिवस मी आणि अरविंद एकमेकांना मधून मधून पत्रं लिहीत होतों. परन्तु हळू हळू पत्रावाचून बरेच दिवस जाऊं लागले. आणि शेवटी तर जवळ जवळ तीन आठवडे अरविंदकडून मला कांहींच पत्र आलं नाहीं .... आतां सुटी संपून कॉलेज पुन्हां सुरू होईल, मग आपली व अरविंदची पुन्हां गाठभेट होईल, सगळं ठीक होईल, असा विचार मनाशीं करून सुटीचे शेवटचे दिवस मी मोजीत राहिलें....

ज्या दिवशीं मी गांवाहून निघणार होतें त्याच्या आदल्याच दिवशीं एक सुंदर जाड लिफाफा माझ्या पत्त्यावर आला. पाकिटावरचं बिबाचं अक्षर मीं ताबडतोब ओळखलं. तिचंहि फार दिवसात मला पत्र आलं नव्हतं. त्यामुळे तिच्या अक्षराचं हें सुंदर पाकीट पाहून मला फार आनंद झाला. आणि पाकीट फोडल्याबरोबर त्या साऱ्या आनंदाचा चक्काचूर झाला ! – कारण पाकिटांत लग्नपत्रिका होती ! बिबाचं आणि अरविंदचं लग्न ठरलं होतं !

ठरलं होतं कसल ? – ज्या घटकेला माझ्या हातीं ही पत्रिका पडत होती त्या घटकेला त्या दोघांचं लग्न होऊन चोवीस तास झाले होते सुद्धां !

मला वाटलं, उठावं आणि ती पत्रिका चुलींत घालावी !

माझ्या अंगाचा संतापानं भडका उडाला होता. आणि त्या संतापाच्या

भरीला मनांत असं येत होतं कीं बिबानं वरून मैत्री दाखवून कपटानं माझा गळा कापावा ? अरविंदची संगति मी सोडावी असं ती एवढ्या अट्टाहासानं कां सांगत होती तें एकदम माझ्या लक्षांत आलं. अरविंदच्या नादापासून मला परावृत्त करण्यांत बिबाचा उद्देश मला वांचवण्याचा नव्हता. तिला वाटेंतली अडगळ दूर करायची होती. अरविंद तिला स्वतःला हवा होता. मला सावध करण्याचा देखावा करून तिला आपला मतलब साधायचा होता. आणि तिचं सुदैव असं कीं तिचा मतलब साधला होता. माझ्यापासून माझा अरविंद तिनं हिरावून घेतला होता. माझ्या सुखाचा बळी घेऊन तिनं आपलं सुख साधलं होतं....बिबा या वेळीं माझ्यापुढे असती तर तिच्या फडाफड थोबाडीत मारायला मीं कमी केलं नसतं !

कॉलेज सुरू झालं. बिबानं कॉलेजांतलं नांव काढलं होतं. तिचा पत्ता काढून मी तिच्या घरीं गेलें. अरविंद घरांत नव्हता. कुठें परगांवीं गेला होता. मला पाहिल्याबरोबर बिबा शरमिंधी होईल असं मला वाटलं होतं. पण तिच्या चर्येवर तसं काहींच दिसलं नाहीं. मी तिला वाईट वाईट बोलूं लागलें. परंतु तरी ती वरमली नाही. "मला फसवून माझी चोरी केलीस तूं !" असा मी आरोप केला त्यावर देखील ती एवढंच म्हणाली,

"असं चालायचंच जगांत. दुसऱ्याचा घास काढून घेतल्याखेरीज आपलं पोट नाहीं भरतां येत !"

तिच्या त्या निर्लज्ज उत्तरानं माझा तोल सुटला. मी तिला फडाफड दोन चार मुस्कटांत मारल्या, आणि 'पुन्हां कधीं तुझं तोंड पहाणार नाहीं !' असं म्हणून मी तिच्या घरांतून बाहेर पडलें.....

आणि त्याच बिबाला भेटण्यासाठीं मी आतां योगाश्रमाकडे निघालें होतें !

तिची भेट घेण्याचं माझ्या मनानं कां ठरविलं तें मला धड सांगतां येत नव्हतं. पण माझीं पावलं आश्रमाच्या वाटेनं पडत होती खरीं.

आश्रमाची चढण मी चढूं लागलें तेव्हां माझ्या मनांत आलं, मी तिला काय म्हणूं ? ती मला काय म्हणेल ? ती कोणत्या अवस्थेंत मला दिसेल ? .... मी स्वतः सुखांत होतें. अरविंदचा मला विसर पडला होता. माझं रामशीं लग्न झालं होतं. त्या लग्नाच्या नवतीच्या पहिल्या आनंदांत मी होतें. .... बिबा मला कशी दिसेल ? सुखांत कीं दुःखांत ?....

....२४

खोलींत पाऊल टाकून कॉटवर पडलेल्या बिबाकडे पाहिल्याबरोबर मी क्षणभर जागच्या जागी उभीच राहिलें. ती इतकी आजारी असेल अशी माझी कल्पना नव्हती. आणि तिचा निस्तेज चेहरा पाहून माझ्या मनांत आलं, हीच का बिबा ! माझी आणि तिची पूर्वीची ओळख असल्याचं आश्रमाच्या चालकाना मी आधीच सागितल्यामुळे ते मला फक्त तिची खोली दाखवून गेले. मला पाहिल्याबरोबर बिबानं मला ओळखलं असलं पाहिजे. परंतु या ठिकाणी मी भेटल्यामुळे तिला आश्चर्य वाटणं साहजिक होतं. तिच्या मुद्रेवर तें आश्चर्य मला दिसल. 'बिम्बा !' असं म्हणून मी पुढें झालें आणि तिचा हात धरून कॉटच्या कडेवर बसलें.

"किती अवचित भेटलीस !" अस म्हणून ती उठून बसूं लागली. परतु मी तिला म्हटलं, "उठूं नकोस, तुला बरं नाही –"

तिन माझ ऐकलं नाही. बसली राहून ती म्हणाली, "बरं नसायला काय झालं ? आता पुष्कळ बरं आहे. तू अशी भेटलीस त्यामुळें तर एकदम बरं वाटल." ती हसली.

मी म्हटलं, "फार बिघडली होती काय तुझी तब्बेत ?"

"चालायचंच" अस म्हणून तिनं तो विषय टाळण्याचा प्रयत्न केला.

कांही वेळानं मी म्हटलं, "बिबा, खरं म्हणजे तुझी क्षमा मागण्यासाठी मी तुझ्याकडे आले."

"क्षमा मागायसाठी कीं क्षमा करायसाठी ?" तिनं विचारलं. "मी तुझी चोरी केली असं तुला वाटलं होतं ना ? माझं पुन्हा कधी तोंड पहाणार नव्हतीस ना ?"

माझ्या मनांत आलं, ती आजारी आहे तेव्हां तिच्या मनाला लागेलसं कांही बोलूं नये. परंतु पुन्हा वाटलं की मनातल्या गोष्टी मनांत ठेवण्यांत काय अर्थ आहे ? विषय निघालाच आहे तर खरं काय तें सांगून टाकावं. मी म्हणालें, "तुझ्या माझ्या शेवटच्या भेटीत मी तुला फार वाईट बोललें आणि तुझ्या अंगावर हात टाकला याबद्दल मला आतां खेद होतो, आणि म्हणून मला तुझी क्षमा मागायची आहे. पण माझ्याशीं तूं जें कपटाचं वर्तन केलस तें तूं करायला नको होतंस असं मला अजूनही वाटतं."

तिनं विचारलं, "म्हणजे तुझं आणि अरविंदचं लग्न मी होऊं द्यायला

हवं होतं असं तुझं म्हणणं ? ''

मी म्हटलं, '' मला आतां अरविंदचा विसर पडला आहे अन् माझं लग्नही दुसऱ्याबरोबर झालं आहे. पण तरीसुद्धां मला असं वाटतंच कीं तं जर माझा घात केला नसतास तर मी अरविंदशीं आनंदानं लग्न केलं असतं.

तिनें एकदम विचारलं, '' तूं सुखी झाली असतीस ? ''

मी तिला तितक्यांत एकदम प्रश्न केला. '' तूं सुखी झाली नाहींस काय ? ''

ती म्हणाली, '' मी इथें पडलें आहे यावरून समज काय तें. हीच तुझी अवस्था झाली असती. ''

'' म्हणजे काय ? ''

'' सुशे, माझ्या अवस्थेचा पाढा मी तुझ्याजवळ कधींच वाचणार नव्हतें. किंबहुना तूं मला पुन्हां कधीं भेटशील अशी कल्पनाहि मला नव्हती. पण आतां भेटली आहेस तेव्हां सगळं सांगतें. ऐक. '' लग्न झाल्यापासून जें जे घडलं तें तें ती सांगूं लागली. अरविंद प्रथम कांहीं दिवस तिच्याशीं नीट प्रेमानं वागला होता. परंतु तें त्याचं वागणं लवकरच संपलं होतं. आणि नंतर त्यानं जें स्वरूप प्रगट केलं होतं तें फार भयंकर होतं. प्रेमाचं सोंग देखील तो करीनासा झाला होता. सिनेमाच्या धंद्यांत पैसा आणि नांव दोन्ही त्याला मिळत होतीं, आणि सदाचाराचीं सारी बंधनं तोडून वागण्याचा आपल्याला हक्क आहे असें तो समजत होता. कित्येक दिवस आणि कित्येक रात्रीं तो घरी फिरकत सुद्धां नसे. प्रथम कांही दिवस तो तिला.सबबी तरी सागत असे. पण नंतर तिनं कांहीं विचारल्याबरोबर त्यानं दुरुत्तरं करावीत किंवा वेळप्रसंगी तिला मारावं, धाक दाखवावा, काडीमोड करण्याच्या गोष्टी बोलाव्या .... ''

तिची ती एकंदर हकीगत ऐकून माझ्या डोळ्यांतून आंसवं वाहूं लागलीं होतीं. मी तिला विचारलं, '' मग तू कां घेत नाहीस काडीमोड ? या अवस्थेपेक्षां तें पुरवलं. ''

ती म्हणाली, '' तुझं म्हणणं एका अर्थी बरोबर आहे. परंतु काडीमोड झाली कीं तो स्वतंत्र होईल. एका मुलीला त्यानं नादाला लावलंच आहे.

तिच्याशीं त्याला लग्न करतां येईल. आणि त्याला हें स्वातंत्र्य न देण्याचा तर माझा निर्धार आहे! "

मी आश्चर्यानं विचारलं, "म्हणजे काय बिबा? त्याच्यावर तुझं फार प्रेम आहे काय? इतकं झालं तरी? अजूनसुद्धा?"

बिबा हसली आणि म्हणाली, "अजूनसुद्धा? म्हणजे माझं कधीं तरी त्याच्यावर प्रेम होतं अशी तुझी कल्पना आहे कीं काय?"

"अर्थातच आहे. मला फसवून तू त्याच्याशी लग्न करून बसलीस तें काय तो तुला फार आवडल्यावांचून? त्याच्यावर तुझं प्रेम असल्यावांचून? वरकाती तू त्याला शिव्या मोजीत होतीस, मला त्याचा नाद सोडायला सांगत होतीस, पण अखेर माझ्या गैरहजेरीचा फायदा घेऊन तू स्वतः त्याच्याशी लग्न केलस, या गोष्टीचा एकच अर्थ होतो तो हा की मनांतून तो तुला हवा होता. त्याच्यावर तुझं प्रेम होतं. तूं माझ्याशी कपट केलंस—"

बिबा म्हणाली, "सुशे, मी तुझ्याशी कपट केलं हें खरं. पण माझं अरविंदवर प्रेम होतं ही कल्पना चुकीची आहे." ती थोडीशी थांबली आणि नंतर म्हणाली, "सगळ्याच गोष्टी सांगण्याची आज वेळ आली म्हणून सागते. अरविंदशी लग्न करण्यांत मी कपट केलं तें तुझ्यापेक्षां अरविंदशी जास्त होत. त्याला मी नादीं लावल. खोटं प्रेम दाखवलं."

मी एकदम् म्हणालें, "तूं अरविंदवर कधीं प्रेम केलं नाहीस?"

ती म्हणाली, "कधीदेखील नाही."

"प्रेम नसतांना तू त्याच्याशी लग्न केलंस?"

"होय."

"कशासाठी?"

"तुला वांचवण्यासाठी सुशे! माझं हें सांगणं त्या वेळेस तुला खरं वाटलं नसतं. आतां आज वाटेल म्हणून सांगतें. मी तुला कितीहि परावृत्त केलं तरी तूं अरविंदचा नाद सोडीनास. तेव्हां अखेर तुझ्या मार्गांतून त्याला दूर करण्याचा एकच उपाय मला दिसूं लागला. तुझं त्याचं लग्न होऊं नये यासाठीं मीच त्याच्याशीं लग्न करणं हा सगळ्यांत उत्तम उपाय होता. तो उपाय मीं केला. त्या लग्नामुळें कोणत्या प्रकारचं आयुष्य माझ्या वाट्याला येणार तें मी ओळखून होतें. मी अरविंदशीं लग्न केलं तें प्रेमासाठीं नव्हे

हें जितकं खरं तितकंच सुखाच्या आशेनं केलं नाहीं हेंही खरं. माझ्या मनांत प्रेमही नव्हतं आणि सुखाचा खोटा हिशोबही नव्हता. लग्नानंतर ज्या गोष्टी मला भोगाव्या लागल्या त्या मला आधींपासून दिसल्या होत्या. त्या तुझ्या वाट्याला येऊं नयेत एवढी एकच माझी इच्छा होती. " ती क्षणभर स्तब्ध झाली आणि नंतर म्हणाली, " नाहीं, या इच्छेच्या जोडीला आणखी एक इच्छा होती. मी अरविंदशी लग्न केल्यावर तू जर कदाचित् लग्नावांचून बरेच दिवस राहिलीस आणि मला टाकून तुझ्याशीं प्रेमाचे चाळे करण्याचं आणि तुला फसविण्याची त्याला इच्छा झाली तर त्याचा मार्ग खुला नसाव। अशी माझी आणखी एक इच्छा होती. म्हणून मी त्याच्याशी लग्न केल तेव्हांच मनाशीं ठरविलं, याला काडीमोड म्हणून कधीं द्यायची नाहीं. तुला अरविंदचं जें वेड लागलं होतं तें इतकं आंधळं आणि मूर्खपणाचं होतं की माझ्याशीं केलेलं लग्न मोडून अरविंद पुन्हां तुझ्याकडे आला असता तर त्याच म्हणणं खरं मानायला तूं तयार झाली असतीस. मी म्हणतें तें खोटं काय ?.... "

मी चटकन् कांहीच उत्तर दिलं नाहीं. तिन मला काहीं प्रश्न विचारला होता याचं धड भानही मला नव्हतं....केवळ मला वांचवायसाठीं तिनं अरविंदशीं लग्न केलं होतं हें तिच्या तोंडचं वाक्य ऐकल्याबरोबर मी इतकी चकित होऊन गेलें होतें कीं तिचं बाकीचं बोलणं ऐकण्याची मला शक्तीच राहिली नव्हती. आणि गरजहि उरली नव्हती....माझं आयुष्य दुःखाचं होऊं नये म्हणून तिनं स्वतःला दुःखी करून घेतल होतं. इतकंच नव्हे तर मी तिच्यावर विश्वासघाताचा आणि कपटाचा आरोप केला तो तिनं मुकाट्यानं सहन केला होता....तिच्यावर हात टाकून मी तिला म्हटलं होतं, 'तूं माझी वैरीण आहेस !' अन् आतां मला कळून आलं होतं कीं ती माझी वैरीण नव्हतीच, पण लाखांत एक नसेल अशी मैत्रीण होती !.... तिनं माझा गुन्हा केला नव्हता, मीं तिचा केला होता ! .... मी रामशी लग्न करून सुखी झालें होतें ! ती अरविंदशीं लग्न करून दुःखांत पडली होती ! कायमची ! तिचे माझ्यावर केवढे उपकार होते ! .... मी तिचा केवढा गुन्हा केला होता ! ....

तिच्याशी काय बोलावं, मला कळेना. बोलण्याजोगा एक शब्द देखील

सुचेना. पश्चात्तापानं आणि शरमेनं मला अगदीं मेल्यासारखं झालं....मी फक्त क्षणमात्र तिच्याकडे अगदीं रोखून पाहिलं. नंतर ' बिम्बा ! ' अशी अगदीं फार प्रेमानं हांक मारली. आणि ती हांक ऐकतांच तिच्या मुद्रेवर जो भाव दिसला त्यामुळें गेलेल्या, जुन्या दिवसांची एकदम तीव्रतेनं आठवण होऊन मला रडूं आलं. कांहीं विचार न करतां मी खुशाल मोठ्यांदा हुंदका दिला. तिला मिठी मारली. आणि माझ्या तोंडून शब्द बाहेर पडले, " ते दिवस कायमचे गेले का ग ? "

माझ्या त्या उद्‌गाराचा अर्थ बिंबाला कदाचित् कळलाही नसेल....

परंतु कां कोण जाणे, तो उद्‌गार तोंडावाटे काढल्यामुळे माझं दुःख थोडं हलकं झाल्यासारखं मला वाटलं.... इतकंच नव्हे तर मला असंही वाटलं की एक प्रकारें माझ्या गुन्ह्याचाच उच्चार मीं केला, आणि अगदीं अल्प कां होईना माझ्या गुन्ह्याबद्दल मी प्रायश्चित्त घेतलं !....

समाप्त

## आमचीं पुस्तकें

| | | | |
|---|---|---|---|
| २६ | जंगलांतील छाया – | आचार्य भिसे | ५–०–० |
| २७ | रक्तहीन क्रांति – | बा. ह. सातोस्कर | ३–८–० |
| २८ | मॅनेजिंग डायरेक्टर – | ,, | २–८–० |
| २९ | रंगरावाचें रहस्य – | नाडकर्णी | ५–०–० |
| ३० | देशद्रोही – | कॉ. यशपाल | ६–०–० |
| ३१ | मखमालीचा पडदा – | व. शां. देसाई | ७–८–० |
| ३२ | पॅरीसच्या परी – | र. धों. कर्वे | ३–०–० |
| ३३ | गांधीजींच्या सान्निध्यांत – | दिवाण | ४–०–० |
| ३४ | गांधीप्रणीत अर्थयोजना – | प्रो. अग्रवाल | ३-१२-० |
| ३५ | अहिंसेचें अर्थशास्त्र – | कुमारआप्पा | १–०–० |
| ३६ | समाजवादाकडे – | पां. वा. गाडगीळ | ३–८–० |
| ३७ | तिसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमि – | ,, | ४–०–० |
| ३८ | मार्क्स कॅपिटल सारग्रंथ | ,, | १५-०-० |
| ३९ | खग्रास प्रभाकर – | ,, | ३–०–० |
| ४० | अहिंसा विवेचन – | किशोरलाल मश्रूवाला | २–०–० |
| ४१ | गांधींची विलायत यात्रा– | महात्मा गांधी | २–०–० |
| ४२ | श्रद्धांजलि – | ,, | २–०–० |
| ४३ | जीवन सरिता – | पाळंदे | २–८–० |
| ४४ | बर्लिनच्या बातम्या – | वैशंपायन | ३–८–० |
| ४५ | डॉ. केतकरांचें सान्निध्य | य. रा. दाते | २–०–० |
| ४६ | डॉ. बेझंट चरित्र – | रा. स. भागवत | ५–०–० |
| ४७ | राजयोगाचीं मूळतत्त्वें – | ,, | ३–०–० |
| ४८ | माडखोलकर व्यक्तीवाङमय- | मा. का. देशपांडे | ५-०-० |
| ४९ | लाटांचें तांडव – | काका कालेलकर | २–०–० |
| ५० | विनोबा विचारदर्शन – | विनोबा भावे | २–०–० |

**महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४.**